# अनुक्रमणिका.

# मंगलाचरण.









( वस्त्रहरणप्रसंगीं द्रौपदीनें केलेला धांवा. )

लाऊनियां नेत्रपातीं । हृदयीं चिंतिली कृष्णमूर्ती ।
म्हणे " धांव धांव गा श्रीपती ! । ये आकांतीं स्वामिया ॥ १२
पाय स्पर्शोनियां मुरारी । शिळा केली दिव्य नारी ।
तिये अहल्येचिये सरी । मज उद्धरी श्रीरंगा ! ॥ १२७ ॥
सहस्र व्याघ्रांमाजी गाय । सांपडतां जवीं बोभाय ।
तेवीं तूतें मोकलिली धाय । कृष्णा धांवे म्हणवूनी ॥ १२८ ॥
कृष्णा ! तूंचि जनक जननी । वित्त गोत्र चक्रपाणी ।
तुजवेगळा न दिसे कोणी । मज निर्वाणीं सोइरा ॥ १३१ ॥
कौरवसभापाणीथडी । नक्रदुःशासनें घातली आढी ।
काया करोनि कडोविकडी । ओढीताडी पीडियेलें ॥ १३३ ॥
तयालागिं तूं घाल गा उडी । फेडीं दीनाचीं सांकडीं ।
धांवें पावें गा ! तांतडी । कृपाळुवा गोविंदा ॥ १३४ ॥
दुःशासनशंख वहिला । स्मरतां संतोषवेद हारविला ।
कौरवसागरीं बुडविला । तो कवणातें न काढवे ॥ १३५ ॥
मत्स्यरूपिया नारायणा ! । धावें पावें मधुसूदना ! ।
विभांडूनि याचिया वचना । समाधान मज द्यावें ॥ १३६ ॥
माझा स्वधर्ममंदरागिरी । कौरवसमुद्रीं पडिला फेरीं ।
तया बुडतया उद्धरीं । कांसव होईं केशवा ॥ १३७ ॥
कांसवदृष्टी विलोकावें । मातें पाठीसीं घालावें ।
पाय पोटीं न धरावे । धांवें पावें ये काळीं ॥ १३८ ॥
माझी लाज हे धरित्री । रसातळा नेतो वैरी ।
यज्ञवराहरूपिया हरी । दाढें धरी प्रतापें ॥ १३९ ॥

माझा भाव तो प्ऱ्हाद । निष्ठुरीं गांजितां पावला खेद ।
शत्रुअहंकार–स्तंभभेद । करुनियां प्रगटे पा ॥ १४० ॥
कौरवअहंता महीतळीं । वामनरूपिया वनमाळी ।
दाटी त्रिपादपायांतळीं । बळीबंधना पावावें ॥ १४१ ॥
माझा भाव आणि भक्ती । तेचि जमदग्निरेणुकासती ।
कुशब्दशस्त्रीं कौरवदैत्यीं । संत्रासिलीं अवनियें ॥ १४२ ॥
ते निवटूनि धराभारा । फेडी भार्गवपरशुधरा ।
द्रौपदीसती वसुंधरा । पांडवद्विजां अर्पी का ॥ १४३ ॥
लाज हरिली दुःशासनें । तेचि सीता या रावणें ।
हरिली ते तुवां रघुनंदनें । प्रतापरुद्रें रक्षावी ॥ १४४ ॥
आतां कृष्णा ! आठविया । तूंच आमुच्या विसांविया ।
कौरवअहंकार–काळिया । पायांतळीं रगडीं पा ॥ १४५ ॥
बौद्धरूपिया जगदीशा । कौरवीं मांडिली माझी हिंसा ।
करुणाकरा कृष्णा परेशा । प्राणरक्षक मज होईं ॥ १४६ ॥
वळंघोनि प्रतापाचा घोडा । परजीं सुदर्शन काळखंडा ।
कौरवम्लेंच्छ वधूनि होडा । निष्कळंक मज करीं ॥ १४८ ॥
कौरवदुरुक्ती शिळाधारीं । मेघवृष्टी होतसे भारी ।
अचळकृपेचा गोवर्धनागिरी । मजवरी धरीं गिरिधरा ॥ १४९ ॥
माझें मानससरोवर । प्रेमकल्हारीं सुमनहार ।
राजहंसरुक्मिणीवर । सदास्वानंदें क्रीडतु ॥ १५० ॥
सगुणउपासकाचे पूजे । कीं योगियांचे समाधिसेजे ।
विश्रामलीस ह्मणोनि माझें । स्मरण तूतें नव्हेचि? ॥ १५३ ॥
धांवा करितां तुझा । हृदयस्फोट झाला माझा ।
कंठ शोषला अधोक्षजा । तुज बाहतां आकांतीं ॥ १५४ ॥
तरी आतां नोव्हेसी माये ! । सांग आतां मी करूं काये ! ।
प्राण सांडूं द्वारावतिये ? । प्रेत ओपूं पापिया ? ॥ १५५ ॥
सर्वां सर्वत्र तुझे कान । सर्वदेखणे तुझे नयन ।
आज नायकसी वचन । एवढें व्यसन देखसी ! ॥ १५६ ॥
कृष्णा ! तूं स्नेहाळ माउली । तूंचि कृपेची साउली ।

तुवां उपेक्षा जरी केली । तरी मग जिणें कायतें ? ।। १५८ ।।
वस्त्रें हिरोनियां अवकळा । येथें झालिया गोपाळा ।
तुझे पाय याचि डोळां । कोण्या मुखें विलोकूं" ।। १६२ ।।

*　　*　　*　　*

ऐसा द्रौपदीमुखयंत्रीचा । यंत्रगोळा उसळला साचा ।
करुणातेजें सुतेजाचा । बाळभानू ज्यापरी ।। १६३ ।।
तो झगटोनि कृष्णश्रवणीं । आदळला हृदयभुवनीं ।
तेणें सुखनिद्रेचिये सदनीं । जागरोनी खडतरला ।। १६४ ।।
वैराग्यवसंताचें स्थान । चिन्मयप्रकाश देदीप्यमान ।
श्रीकृष्ण स्वानंदाचें सदन । जेवीं कां मन शिवाचें ।। १६६ ।।
मंगळाचें मंगळागार । कीं सुकृततरूचा सुखागार ।
मुक्तिदासी राखिती द्वार । तें मंदीर हरीचें ।। १६७ ।।
तेथें सुखनिद्राविश्रामें । पहुडे श्रीकृष्ण आरामें ।
शांतिरुक्मिणी पायपद्में । संवाहितां विश्रामली ।। १६९ ।।
अंगीं चंदन सुपरिमळें । तळवा लोपूनि पाणितळें ।
मर्दन करितां कुचयुगुळें । सुखानंदें निवतसे ।। १७४ ।।
इंद्रगोपवर्णीवास । चांदवा दावी सुप्रकाश ।
झळकती मुक्ताफळांचे घोस । कृत्तिकापुंजासारिखे ! ।। १७५ ।।
उद्धव भक्तराज जवळा । अवलोकून चरणकमळा ।
विश्वरूप घनसांवळा । अभेदभक्तो अर्चितु ।। १७६ ।।
ब्रह्मवीणा ब्रह्मकुमर । घेऊनि नाद ब्रह्माकार ।
निःशब्दीं गायन सुस्वर । ब्रह्मानंदा रिझवित ।। १७८ ।।
निजभाव एकनिष्ठें । गरुड सर्वदा सादर तिष्ठे ।
तंव द्रौपदीकरुणेचा झगटे । नाद श्रवणीं पडियला ।। १७९ ।।
कीं ते सुशब्दराजहंसी । उड्डाण करूनि चिदाकाशीं ।
रिघोनि कृष्णाच्या मानसीं । निद्रामृत डहुळलें ! ।। १८० ।।
बाप ! भक्तांची आवडी मोठी । लगबग धांविन्नला जगजेठी ।
मदंट म्हणोनि परते लोटी । मना आणि गरुडातें ।। १८६ ।।

मन पवन गरुड तिघे । सत्वर करिती पाठिलाग ।
तरी नाटोपे श्रीरंग । टाकोटाकीं पातला ! ।। १८७ ।।
—सभापर्व अ० १५

## २

### गोपाळाची भूपाळी.

उठिं रे गोपाळा ! उघडी स्वरूपलोचना ।
सरलि अविद्याराती उदय झाला रविकिरणा ।।
इंद्रियगोधनें नेईं निर्गुणकानना ।
सुटलीं मानसवत्सें तुजविण नाकळतां कोणा ।। ध्रु० ।।
प्रबोधपहांट झाली सरलें तिमिरतमरज ।
गुरुकृपेचा अरुण दावी सुरंगसम तेज ।
आत्मादिनकर पाठी प्रकटे तात्काळिक सहज ।
जिवचंद्राचें मंडळ तेणें झालें निस्तेज ।। १ ।।
दृश्यभासचांदणिया असते ठायिंच लोपलिया ।
लिंगदेहकमळिंचे मधुकर सुटले आपसया ।
बुद्धिबोधचक्रवाकें मिनलीं आपणिया ।
देहबुद्धिकुमुदिनी सुकोनि गेलीसे विलया ।। २ ।।
योगविद्येच्या पंथें साधकवृंदें चालियलीं ।
उपनिषद्भागार्थ शब्द केला कोकिळीं ।
वाग्वादाचे उलूक निघती मौनाच्या ढोलीं ।
विकल्पअटवी साहीं चोरीं सांडियलीं ।। ३ ।।
विरागरश्मीजवळीं धरितां चित्तरविकांत ।
आत्मावन्हि प्रकटे विषयवन हें जाळीत ।
तृष्णेच्या श्वापदावरी प्रळय अद्भुत ।
विश्व हें लटिकें मूढां मृगजळवत ।। ४ ।।
जारव्यसनीं झाला जिव हा उदमीं सुविचार ।
वासनाकुंटिणिचा सहजें खुंटला व्यापार ।
लीलाविश्वंभरस्वामी उठला सत्वर ।
चाले मुक्तीश्वर संगीं धरूनियां कर ।। ५ ।।

# प्रस्तावना.

—***—

धर्मार्थकाममोक्षेषु वैचक्षण्यं कलासुच ।
करोति कीर्तिं प्रीतिंच साधुकाव्यनिषेवणम् ॥ १ ॥

१ कविश्रेष्ठ मुक्तेश्वराच्या सुधामधुरवाणीचा प्रथम परिचय मला इ०स० १८९५ सालीं झाला. फर्ग्युसन कॉलेजचा विद्यार्थी असतांना त्यावर्षी महाराष्ट्रकाव्यार्णवांत मीं पहिली बुडी मारली व या पहिल्या बुडींत रामदास तुकाराम व मुक्तेश्वर हीं तीन सत्कविरत्नें माझ्या हाताला लागलीं. त्याच्या आधीं चार दोन वर्षे कालिदास, भवभूति, बाणभट्ट व जगन्नाथ पंडित ह्या संस्कृत कवीश्वरांच्या संगतींत सरस्वतिविलसिताचा रसास्वाद मीं कॉलेजांत व घरीं बराच घेतला होता. आमच्या फर्ग्युसन कॉलेजाच्या डिबेटिंग क्लबांत मराठी भाषेचा प्रवेश करण्यासाठीं दोन शनिवार मी माझे विद्यालयीन सुशील मित्र ( आतां शिक्षणखात्याचे दिवाण, नामदार ) रघुनाथराव परांजपे यांच्याशीं झगडलों व शेवटीं माझ्या पक्षाला यश येऊन क्लबाच्या व्याख्यानमालेंत मराठीचा शिरकाव झाला ! त्याप्रसंगीं 'कालिदास व भवभूति' या विषयावर १५ दिवसांत मी शंभर पृष्ठांचा निबंध लिहून वाचला होता. आमचे सर्व कॉलेज लोटलें होतें व त्या निबंधामुळें कॉलेजांत बरीच चळवळ झाली व माझ्या विद्यालयीन व बाहेरच्याही अनेक तरुणांच्या स्नेहाचा मला लाभ झाला. ही गोष्ट १८९४ च्या अखेरीस झाली असावी. शेक्स्पीअर, मिल्टन, बायरन, शेले, वर्डस्वर्थ, टेनिसन इ०प्रसिद्ध कवींच्या काव्यांवर माझ्या इतर तरुण मित्रांप्रमाणें तेव्हां मीही झुलत होतों. तथापि कळूं लागल्यापासून माझा जीवात्मा जें अनिर्वाच्य सुख शोधीत होता तें मला महाराष्ट्र सत्कवींच्या संगतींत मिळेल असें वरील तीन मराठी सत्कविरत्नें प्रथम हाताला लागल्यापासून वाटूं लागलें. संस्कृत व इंग्रजी ललित वाङ्मयावर माझें तेव्हां प्रेम होतें व अजूनही मीं त्या वाङ्मयाची गडी फू केली नाहीं. त्यांतही अनेक प्रकार-

च्या मौजा आहेत, तथापि १८९५ सालीं मराठी कवितेवर माझें जें प्रेम जडलें तें उत्तरोत्तर वाढतच गेलें. कॉलेजच्या अभ्यासाला हा मराठीचा अभ्यास परिपोषक होता असें नाहीं, उलट या छंदामुळें तिकडे दुर्लक्षच झालें! माझ्या विद्यार्थीबांधवांना मराठी कवींचीं नांवेंगांवेंही माहीत नव्हतीं व कॉलेजांत नेमलेल्या पुस्तकांबाहेर पाहण्याची प्रवृत्ति विद्यार्थ्यांत सामान्यतः कमीच, किंवहुना मुळीच नाहीं, असा प्रकार तेव्हां असे. कॉलेजांत जीं पुस्तकें शिकविलीं जात किंवा ज्यांच्या वाचनापासून परीक्षेचे प्रश्न अधिक चतुराईनें सोडविण्यास साह्य होण्याचा संभव असे तेवढींच पुस्तकें विद्यार्थ्यांच्या हातीं दिसायचीं असा प्रकार तेव्हां होता व अजूनही आहे. परंपरा खंडित झालेली, दारिद्र्य वाढत चाललेलें, समागमाचा अभाव, कोणत्याच प्रकारचें प्रोत्साहन नाहीं, अशा प्रतिकूळ परिस्थितींत पोटार्थी विद्यार्थ्यांचा सर्वत्र सुकाळ असायचा यांत नवल नाहीं. विद्येची साहजिक आवड, ज्ञानार्जनाची तृष्णा, जन्मसाफल्याचा मार्ग शोधण्याची बुद्धि व तशा प्रकारचा समागम या गोष्टी सर्वकाळीं दुर्लभच आहेत. रामदास, तुकाराम, मुक्तेश्वर, मोरोपंत, वामन यांचे ग्रंथ माझ्या अभ्यासाच्या खोलींत इतस्ततः विखुरलेले, व त्यांच्या निवडक वचनांचे बोर्ड खोलींत भिंतीला टांगलेले असायचे. त्यांच्यांतील मनोहर पद्यें आपल्या मनाशींच गुणगुणत पाठीमागील बागेंत किंवा खोलींत मी आनंदानें स्वेच्छ विहरत असे. हे प्रकार पाहून प्रेमामुळें माझ्या मित्रांना माझी कींव येई, रागही येई व क्वचित् उपहासबुद्धीचीहि छटा त्यांच्या चेहऱ्यावर उमटे. अशा मित्रांपैकीं आमचा एक मित्र 'बाबा' एकदां मजकडे आला व ह्मणाला 'कायरे! तूं मूर्ख तर नाहींस?' मी विनोदानें उत्तर केलें: 'मूर्खपणाचे पुष्कळ प्रकार मजजवळ आहेत; पण त्यांतला कोणता मूर्खपणा तुला त्रास देत आहे हें तर सांगशील!' यावर मराठी ग्रंथांकडे तिरस्कारानें पाहत बाबा म्हणाला:—"ह्या मराठी ग्रंथांत आहे काय वाचण्यासारखें? तो गोसावडा रामदास कीं शिवाजी राजा शिष्य मिळाल्यामुळेंच ज्याचें नांव थोडेसें ऐकूं येतें, तो बायकापोरांना उपाशीं ठेवून टाळ कुटीत डोंगरावर भटकणारा तुकाराम, तो भाषांतऱ्या मोरोपंत, तो यमक्या वामन—छट्! कसले हे मराठी कवि! या बेट्यांना काव्यशास्त्र म्हणजे काय हें तरी माहीत होतें? हें कांहीं तरी बडबडले

आणि तुझ्यासारख्या भोळ्या बावळट लोकांनीं यांचे देव्हारे माजवून ठेवले ! या गाथ्यांतून कांहीं ज्ञान आहे कां कवित्व आहे, कां सृष्टिवर्णन आहे, कां मनुष्यस्वभावाचे नानाविध प्रकार आहेत, कां आहे तरी काय ! शेले, बायरन, वर्डस्वर्थ, शेक्स्पीअर हे खरे कवि. या मोळवटांची कविता वाचण्यांत दिवसरात्र घालवून तूं आपलें आयुष्य मात्र व्यर्थ घालवीत आहेस. परीक्षेला यांतलें कांहीं उपयोगी पडायचें नाहीं व यांत कांहीं अर्थही नाहीं ! " बाबाचें वक्तृत्व आणखीही बरेंच वाहवलें. मीं त्यास विचारलें " बाबा ! अरे ! तूं मराठी कवितेचीं दहा पानें तरी वाचलीं आहेस रे ! धडाकून मत ठोकून मोकळा होतोस, पण इंग्रजीबरोबर थोडी मराठी कविता रोज वाचीत राहण्याचा तूं कांहीं वर्षें अभ्यास ठेवशील तर तुझे हे पूर्वग्रह पुष्कळसे पालटतील व मराठी कवितेंतले अनेक गुण तुला कळून येतील. परीक्षेला मराठी ग्रंथ नेमल्याशिवाय तुम्ही कांहीं ते वाचणार नाहीं ! इंग्रजी कवितेंतले अनेक सुंदर प्रकार तुझ्याप्रमाणें मलाही आल्हादप्रद वाटतात, पण मराठी कविता नादान व टाकाऊ नाहीं इतकेंच काय पण कांहीं बाबतींत ती इंग्रजी कवितेवरही ताण करील असें मला वाटतें. इंग्रजी कवितेंतले कांहीं रचनाविशेष मराठींत नाहींत, तर मराठींतलेही विशेष प्रकार इंग्रजींत नाहींत. पाश्चात्यांच्या व आपल्या समाजरचनेंत, धर्मसमजुतींत, राहणींत सर्वच बाबतींत अतिशय फरक असल्यामुळें त्यांचें वाङ्मय त्यांच्या दृष्टीनें वाचावें व आपलें वाङ्मय आपल्या दृष्टीनें वाचावें हा न्याय नाहीं का ? त्यांचे ग्रंथ त्यांच्या संस्कृतीचे निदर्शक आहेत, आपले ग्रंथ आपले विचार घेऊन उठले आहेत. तूं आपल्या दृष्टीनें आपले ग्रंथ वाच आणि मग तरी आपलें मत बनीव. " असें म्हणून मीं बाबाला मुक्तेश्वराच्या आदिपर्वांतले चार दोन उतारे वाचून दाखविले. ते त्याला आवडलेसे दिसलें व एल. एल. बी. झाल्यावर मी मराठी ग्रंथ अवश्य वाचीन असें तो म्हणाला. या गोष्टीस २७ वर्षें झालीं आहेत, पण त्याच्या राहणीवरून त्यांनीं चार दोन तरी मराठी ग्रंथ वाचले आहेत असें दिसत नाहीं. वकीलीच्या धंद्यावर बाबाचें आज पोट वाढलेलें आहे व याबद्दल मला समाधानही वाटतें; पण ' विद्यार्थीदशेंत असतांना विद्येची गोडी जर लागली नाहीं तर संसारचक्रांत सांप-

डस्यावर ती लागण्याचा संभव फार कमी' या न्यायास बाबा कांहीं अपवाद नाहीं. बाबा बूट, स्टॉकिंग, नेकटाय, तीन डझन सदरे व दोन डझन शर्ट यांच्या व्यवस्थेंतच दंग आहे! मीही इकडे मराठी कवितेच्या व्यासंगानें परमार्थाच्या मोकळ्या मैदानांत उतरलों असून परमात्मसुखविलासांत दंग होऊं पाहत आहें. बाबासारखेच माझे अनेक मित्र ' धर्मभोळेपणा व चिकित्सक बुद्धीचा अभाव ' याबद्दल माझा उपहास करणारे तेव्हां होते व आज अशा सुशिक्षितांची संख्या गणितश्रेढीनें वाढलेली दिसत आहे! मला मात्र माझ्यांत हा भोळसरपणा अजून पुरा बाणला नाहीं याबद्दलच खेद वाटत असून चिकित्सकपणा वगैरे अनेक बुद्धिगुणांचा—पंढरीच्या वाळवंटांत प्रेमपंडिभरानें लोळण घेत असतांना—पूर्ण लय व्हावा असें मनापासून वाटत आहे!! भक्तिभावाच्या पूर्णोदयांत बुद्धिगुणांचीं नक्षत्रें लोपावींत यापरतें दुसरें देवापाशीं कांहींच मागावयाचें उरलें नाहीं. ज्या ब्रह्मगिरीच्या उत्तुंग शिखरावरून महाराष्ट्रकाव्यतरंगिणीचा उदय झाला त्यावर आरूढ होऊन त्या मूलनिर्झरांत स्नानदानपानादि सत्कर्मे घडल्याशिवाय कोणासही मराठी कवितेचें वर्म केव्हांही समजणार नाहीं. ज्या उच्च भूमिकेवरून ही दिव्य प्रासादिक कविता प्रसृत झाली त्या भूमिकेच्या समानांतर उंचीवर गेल्याशिवाय तिचें यथार्थ स्वरूप आकळतां यावें तरी कसें? सत्कवि सद्वस्तूशीं तन्मय होऊन तिचें वर्णन करितो म्हणून या जातीचा तन्मयानंद हृदयांत नाचूं लागण्यासारखें हृदय पाहिजे तरच रसानुभव होईल, एरव्हीं होणार नाहीं. तन्मयतेचें सुख ज्यानें त्यानें आपल्या भाग्यानुसार भोगावयाचें आहे. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, रामदास, तुकाराम ह्या मुनिराजहंसांची कीर्ति महाराष्ट्रांत स्थिर झाली आहे. हजारों मुमुक्षु जीवांस त्यांनीं आपल्या प्रासादिक वाणीच्या बळावर मूळ निर्झराजवळ नेऊन सोडलें आहे. त्यांच्या दृष्टीनें मुक्तेश्वरकवीचा अधिकार किती होता हें समजण्यास पुरेसें साधन नसलें तरी ह्या नाथांच्या नातवाच्या वाणीला परतत्वस्पर्श झालेला आहे यांत संशय नाहीं. मुक्तेश्वराची जी कविता उपलब्ध झाली आहे त्या कवितेवरून त्याची महाकवींत गणना करण्यास कोणतीच हरकत नाहीं व अनेक रसिकांनीं व कवींनीं ती केलेलीही आहे. जगांत परमश्रेष्ठ कवींत मुक्तेश्वराची

पदवी थोर गणली गेली आहे व महाकवि या दृष्टीनेंच मी पुढील प्रबंधांत त्याकडे पाहणार आहे. आमच्या 'बाबा' सारखे बाबा अजून पुष्कळ आहेतच व 'बाबावाक्यं प्रमाणं' हा न्याय प्रसिद्धच आहे! तथापि मुंबई युनिव्हर्सिटीनें नुकाच कॉलेजच्या शिक्षणक्रमांत मराठी भाषेचा प्रवेश होऊं दिल्यामुळें पुढील १०।१५ वर्षांत मराठीच्या संघट्टणानें तरुण विद्यार्थ्यांच्या विचारांतही इष्ट क्रांति होण्याचा संभव आहे. तरुण विद्यार्थ्यांस व सर्वसाधारण वाचकांस मुक्तेश्वराची व त्याची कवितेची ओळख करून द्यावी व आपण ह्या थोर सत्कवीच्या ऋणांतून अंशतः मुक्त व्हावें अशा दुहेरी हेतूनें प्रस्तुत प्रबंध मी महाराष्ट्रीयांस सादर करीत आहें.

२ मुक्तेश्वरी भारताचीं चार पर्वें इ० स० १८९३ ते ९८ पर्यंतच्या पांच वर्षांत प्रसिद्ध काव्यभक्त वामनरावजी ओक यांनीं मार्मिक व विपुल टीपा देऊन प्रसिद्ध केलीं. १८९८ सालीं फिरतीवर असतां सिंहगडच्या पायथ्याशीं असलेल्या कोंडणपूर गांवीं जुनीं दप्तरें शोधतांना मला मुक्तेश्वराच्या 'सौप्तिक' पर्वाची एक हस्तलिखित प्रत सांपडली व मुक्तेश्वर आणि मोरोपंत यांचा कुलस्वामी जो 'सुवर्णपुरीचा भैरवनाथ' त्याच्या गांवीं मुक्तेश्वरानें रचलेल्या ५।६ आरत्या व ५।६ पदेंहीं मिळालीं. ही सौप्तिक पर्वाची प्रत व त्या आरत्या आणि पदें मीं काव्यसंग्रहाकडे प्रसिद्धीसाठीं पाठविलीं व त्यांचा 'मुक्तेश्वराचीं स्फुटकाव्यें' या पुस्तकांत काव्यसंग्रहानें उपयोग करूनही (१९०६) घेतला आहे. 'उठि रे गोपाळा उघडीं स्वरूपलोचना' ही रूपकात्मक सुंदर भूपाळी ज्ञानेश्वराची म्हणून काव्यसंग्रहानें छापली होती, पण मला ती पंढरपुरास बडव्यांच्या जुन्या दप्तरांत मुक्तेश्वरनामांकित अशी सांपडली. मुक्तेश्वरी रूपकाचा ह्या भूपाळीवर उघड छाप आहे. मी प्रसिद्ध केल्यापासून ती सर्वांनीं मुक्तेश्वराची म्हणूनच स्वीकारली आहे. याप्रमाणें इ० स० १८९५ मध्यें मुक्तेश्वराच्या काव्यभूमीची पाहणी झाल्यापासून ह्या रम्य भूमीकडे मनोविनोदार्थ वारंवार जाण्याचा मला मोह सुटला नाहीं. त्यांतील रम्य स्थळें पुनः पुन्हां पाहावींशींच वाटतात. त्या दिव्य भूमीचें थोडेंफार संशोधनही १८९८ सालीं घडलें. इ० स० १९०४ मध्यें 'महाभारताचें मराठी अवतार' नामक छोटासा निबंध लिहून मी 'श्रीसरस्वतिमंदिर' मासिकांत प्रसिद्ध केला.

त्यांत महाभारतावर मराठी भाषेत कोणी कोणी ग्रंथरचना केली ते सांगितलें असून मुक्तेश्वरी भारताचें समीक्षण केलें होतें. मुक्तेश्वरी काव्यभूमीवर ही १८ वर्षांपूर्वी मी बांधलेली झोपडी अपुरी होती व तीही पडून-झडून गेल्यामुळें आतां तिच्या जागीं तिच्या तिप्पट मोठें व अधिक रमणीय असें हें छोटेंसें मंदिर उभारून आज सर्वांस खुलें करीत आहें!

३ महाराष्ट्रकवितादेवीचा भूप्रदेश अत्यंत विशाळ, रमणीय, प्रशांत व परमपावन आहे. ह्या प्रदेशांत विविध रसांचीं सुंदर सरोवरें आहेत. सर्व रसांत भक्तिरसाचा दिव्य सुगंध मिसळून गेला आहे. ह्या प्रदेशांत निरंतर संचार करण्याचें व्यसन लागल्यामुळें सर्व कवींच्या काव्यभूमींचे विशाळ पट्टे पाहण्यांत, संशोधण्यांत, त्यांची मशागत व लागवड करण्यांत आयुष्याचीं वर्षें मोठ्या आनंदांत जातात. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, मुक्तेश्वर, तुकाराम, रामदास, वामन, श्रीधर, मोरोपंत व महिपति व आणिकही संत आणि कवि यांच्या काव्यभूमींचे पट्टे एकमेकांला लागलेले असून सर्वांत सामरस्याचें समाधान भरलेलें पाहून संसारश्रांत जीवांना येथें विश्रांति मिळत असते. या प्रदेशांत ज्ञान, वैराग्य, भक्ति, अहिंसा, सत्य, आस्तिक्य, नैष्कर्म्य इ० दैवी गुणांची मोठमोठालीं दांगें लागून राहिलीं आहेत. येथें ब्रह्मविद्येचें साम्राज्य आहे तरी शृंगारवीरकरुणादि सर्व भावांना शारदादेवी सख्या भावांप्रमाणें वागवीत आहे. येथें विरोधाचें नांव नाहीं. हिंसाद्वेषमत्सरादि कांटेरी कुंपणें कोठेंही दिसत नाहींत. सर्वत्र धांवणारे निर्झरादिकांचे पाट पाहून कोणालाही समाधान वाटतें. येथें विशाळ पर्वतांच्या दरी व उत्तुंग गिरिशिखरें दोन्ही असून स्वच्छ संचार करण्याची सर्व जीवांस मोकळीक आहे. येथें भेद नाहींत पण कोणालाही अमर्यादेनें वागण्याची बुद्धिच होत नाहीं. असुरांच्याही ठिकाणीं येथें सद्भावनाच जागृत होतात. येथें विषयलंपटांना वैराग्य प्राप्त होतें, भ्यारूंचे वीर होतात. बद्धांचे मुमुक्षु, मुमुक्षूंचे साधक व साधकांचे सिद्ध बनविणाऱ्या मोठमोठ्या पाठशाळा येथें आहेत. अशा या दिव्य प्रदेशांत पूर्णभाग्योदयानें ज्ञानभक्तीचा सुगंध शीतळवारा खात निर्भ्रम होऊन स्वेच्छ भ्रमण करण्याचा छंद सभाग्य जीवांना लागत असतो. वडिलांच्या पुण्याईनें या पुण्यप्रदेशांत माझा प्रवेश झाला

आहे व माझ्या अनिरुद्ध संचारास कोणी प्रतिबंध करीत नाहीं; इतकेंच काय पण संतसज्जनांच्या कृपापांगांमुळें, सप्रेम मधुरस्मितामुळें, अधिक धिटाई करण्याचें बळ अंगीं संचरत आहेसें वाटतें ! माझ्या अपात्रतेचें स्मरण पूर्ण जागृत आहे. भुकाळू मनुष्यास श्रीमंतांच्या घरचीं नानाविध पक्वान्नें पाहून जसें वाटतें तसें या सर्व प्रदेशांत संचार करीत असतांना मला "किती खाऊं आणि किती नाहीं " असें होऊन जातें. ही ज्ञानेश्वरी, हें नाथभागवत, हा दासबोध, ही तुकोबांची अभंगवाणी, हे वामनीश्लोक, ही पंताची आर्या, हीं मुक्तेश्वराची वाणी—हीं सारीं अविट पक्वान्नें आहेत. यांच्या ठायीं अलंबुद्धि होत नाहीं. पुन्हा जन्म घ्यावा आणि या संत-कवींच्या प्रदेशांत त्यांच्या मधुरध्वनीनें अंतरांत प्रवेश करून आत्मरूपीं जागृत केलेल्या मनोवृत्तिरूप तारांच्या समरसतेनें उभ्या केलेल्या रासांत देहभान-विवर्जित होऊन अखंड नाचावें ! असो. ह्या महाराष्ट्र सत्कवींच्या रम्य प्रदेशांत रममाण होतां होतां प्रत्येकाच्या पट्ट्यावर त्याच्या उपकाराचें अंशतः उतराई होण्यासाठीं त्याच्या गौरवार्थ एकेक मंदिर उभारावें असें वाटून हीं चरित्रमंदिरांचीं कामें मी मोठ्या हौसेनें व आवडीनें चालविलीं आहेत. मोरोपंतांचें मंदिर १९०८ मध्यें उभारलें गेलें, ज्ञानेश्वरांचें १९१० मध्यें, नाथांचें १९१२ मध्यें, व तुकोबारायांचे १९२० मध्यें. याप्रमाणें चार सुंदर मंदिरें उभारलीं गेलीं असून आतां समर्थांच्या प्रांतांत पाहाणी सुरू झाली आहे, मालमसाला तयार होत आहे. दरम्यान मुक्तेश्वरांचें हें छोटें मंदिर आज सर्वांस खुलें होत आहे ! साधुसंतांच्या काव्यभूमीवर, त्यांच्याच साह्यानें उभारल्या जाणाऱ्या या मंदिरांत माझ्या पदरचें फार काय असणार ? 'सामुग्री धनगासि दे, करि धनी त्याच्या गृहीं भोजना ' त्यांतलाच हा प्रकार आहे. या मंदिरांत उत्कृष्ट इंजि-निअरांच्या दृष्टीनें कांहीं दोष असले किंवा वादक, निंदक व छलक हे पिछा पुरविण्यास पाठीशीं खडे असले तरी विद्वान् रसिक व भाविक पथिकांना येथें थोडीफार विश्रांति मिळत आहे ही गोष्ट मात्र निर्विवाद आहे. ही सत्कवींची सेवा संतसज्जनांना मान्य होवो.

पुणें, मुमुक्षु कचेरी.
भीष्माष्टमी शके १८४३ } लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.

# १ मुक्तेश्वराचें चरित्र.

१ मुक्तेश्वराच्या चरित्राविषयीं म्हणण्यासारखी माहिती उपलब्ध नाहीं. त्यानें आपल्या स्वतःसंबंधानें आपल्या ग्रंथांत कोठेंकोठें जे पुसट उल्लेख केले आहेत तेवढ्यावरच आपण समाधान मानून राहिलें पाहिजे. मुक्तेश्वर हा पैठणचे सुप्रसिद्ध महाभक्त श्रीएकनाथमहाराज यांच्या मुलीचा मुलगा. 'मातृजनक जनार्दनी। एकनाथ नमियेला' असें त्यानेंच स्पष्ट लिहिलें आहे ( आदि० १–७७ ). याचें उपनाव मुद्गल, सूत्र आश्वलायन, गोत्र अत्रि, गुरु लीलाविश्वंभर, उपास्य दत्त, वसतिस्थान पैठण–इतक्या गोष्टींचा त्यानें आपल्या ग्रंथांत उल्लेख केला आहे. आपण मुक्तेश्वराच्याच तोंडून या गोष्टी ऐकूं:—

( १ ) सुचिरसहजवासें गौतमीच्या तटाकीं
अतुट भजनपंथें पंथ टाकीत टाकी।
द्विजवर कविनामा मुद्गलू अत्रिगोत्री
विमळवचनमुक्तें लेववी संतश्रोत्रीं ॥ ४७० ॥

—संक्षेपरामायण, उत्तरकांड.

गौतमीच्या तटाकीं ह्म० अर्थात् पैठणक्षेत्रीं–' सुचिर ' ह्म० दीर्घकाल व 'सहज' ह्म० नाथांचा नातु असल्यामुळें नाथांनीं गाजविलेल्या महाक्षेत्रीं साहजिकपणें —माझा वास झाला असें स्वतःमुक्तेश्वरकवि म्हणतो. दीर्घकाळ आजोळीं कोणी राहत नाहीं व राहिला तरी तें राहणें सुद्धां 'सहज' असत नाहीं; पण मुक्तेश्वराच्या बापाला–चिंतामणीला उर्फ विश्वंभराला–नाथांनीं घरजावई करून पैठणकर बनविल्यामुळें पैठण हेंच मुक्तेश्वराचें गांव झालें. दुसरें असें कीं नाथासारखा गर्भश्रीमंत व सर्वत्र गाजलेला महापुरुष भाग्यानें पैठणास ' मातृजनक ' या नात्यानें लाभलेला असतांना त्याचा सहवास सोडून मुक्तेश्वरासारखा रसिक, विद्वान् व प्रेमळ नातु त्याला किंवा त्याच्या दिव्यचारित्र्यानें भारलेल्या महाक्षेत्राला सोडून कोठें जाईल? या दोन्ही कारणांमुळें गोदातटाकीं माझा ' सहज ' वास झाला असें तो

म्हणतो. मुद्गल हें आडनांव देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांत प्रसिद्ध आहे. कृष्णदास मुद्गल नामक दुसरा एक मराठी कवि झालेला आहे. तोही याच घराण्यांतला असावा. ' आमुची देशभाषा मराठी । वास्तव्य प्रतिष्ठान गोदातटीं ' असें त्यानें आपल्या रामायणाच्या युद्धकांडांत म्हटलें आहे.

( २ ) विश्वंभरश्रीगुरुच्या प्रसादें । आनंदवाचा वदलों विनोदें।
भक्तीन मुक्तीश्वर सार बोले।आकर्णितां सज्जनचित्त डोले॥

हा रामायणाच्या शेवटला श्लोक आहे. मुक्तीश्वर व मुक्तेश्वर एकच होत, हस्तलिखित प्रतींत दोन्ही नावें सांपडतात. मुक्तेश्वरानें कोठें विश्वंभर, कोठें लीलाविश्वंभर या नांवानें गुरूला जागजागीं वंदन केलें आहे व तें दत्तभावनेनें केलें आहे. एकनाथ महाराजांना हरिशास्त्री नामक एक पुत्र व गोदा व गंगा नांवाच्या दोन कन्या अशीं एकंदर तीन अपत्यें होतीं. गोदा वडील व गंगा धाकटी. मौज अशी कीं गोदावरीचें सासरचें नांव गंगाबाई हेंच होतें, व नाथ प्रेमानें तिलाच'लीला' नांवानें संबोधीत; म्हणजे गोदा हें तिचें पाळण्यांतलें नांव, गंगा हें सासरचें नांव व लीला हें नाथांनीं ठेवलेलें आवडीचें नांव. चिंतामणिशास्त्री यांस लीला दिली होती. नाथांनीं चिंतामणिशास्त्री यांस घरजावई करून ठेवलें होतें व तेच त्यांचा परामर्ष घेत. पैठणास नाथांच्या वाड्याशेजारींच चिंतामणिशास्त्री यांची समाधि आहे व पैठणकर लोक अद्याप तिला ' ही नाथांच्या जावयाची समाधि ' म्हणून ओळखतात. नाथांनीं आपल्या कन्येला भगवंताची लीला आठवून ' लीला ' हें नांव ज्या परमार्थभावनेनें ठेवलें त्याच भावनेनें लीलेच्या पतीला ते ' विश्वंभर ' म्हणूं लागले. ' लीला कोणाची? विश्वंभराची!'याप्रमाणें चिंतामणिशास्त्री यांचें नांव विश्वंभर पडलें! याप्रमाणें मुक्तेश्वराच्या आईचें नांव लीला व बापाचें नांव विश्वंभर. चिंतामणि तेच विश्वंभर. या नांवाविषयीं कोणाकोणाला शंका वाटते, पण शंका बाळगण्याचें कारण नाहीं. आदिपर्वाच्या उपसंहारांत मुक्तेश्वरानें आपणास ' चिंतामणिभूदेवकुमर ' असें म्हटलें आहे, व विश्वंभराच्या आरतींत शेवटल्या चरणांत ' शरण मी तुज आतां । पायीं ठेवियेला माथा । संतोषें सुत रक्षी । गुरु विश्वंभरनाथा ॥ ' असें स्पष्ट सांगितलें आहे. या [illegible] चिंतामणि तेच विश्वंभर व तेच मुक्तेश्वराचे गुरु होते

याविषयीं संदेह राहत नाहीं. मुक्तेश्वराला दत्तोपासना त्याच्या पित्याकडूनच मिळाली. नाथांना दत्तोपासना त्यांचे गुरु जनार्दनस्वामी यांजकडून मिळाली होती व नाथांनींच आपल्या नातवाला दत्ताचा बीजमंत्र सांगितला असला पाहिजे. मुक्तेश्वरांनीं आपल्या ग्रंथांत 'लीलाविश्वंभर' पदानें आपल्या गुरूचा उल्लेख जागजागीं केला आहे. यांत आई आणि बाप या दोघां-च्याही नांवांचा आयता उच्चार होतो. लीलाविश्वंभर हे गुरु व दत्त हें उपास्य. गुरु व उपास्य यांची अभिन्नता हें गुरुपरंपरेचें वर्म ध्यानीं आणतां लीलाविश्वंभरपदानें गुरूचा व दत्ताचा उल्लेख मुक्तेश्वरानें केला आहे हें युक्तच आहे. आईबाप गुरुस्वरूपच आहेत, त्यांतही बापच संप्रदायगुरु असल्यामुळें आईबापांचाही नामोच्चार गुरुपदांत झाल्यानें दुधांत साखर पडल्यासारखाच प्रकार झाला आहे.

( ३ ) श्रीदत्तांघ्रिपद्मभ्रमर । विनवी कवी मुक्तेश्वर ।
ग्रंथ चाले तो बडिवार । संतमहंतकृपेचा ॥ आदि० अ० ११ ॥
(४) अवधूतपदजलसरोवरीं । मुक्तेश्वर सप्रेम शफरी ॥ आदि. अ. २९
(५) चिन्मूर्ति लीलाविश्वंभरू । दत्तात्रेय जगद्गुरु ।
याचेनि नामें मुक्तेश्वरु । कथा बोले भारती ॥आदि०अ०॥३३॥
(६) लीलाविश्वंभर सद्गुरु । सकळ सिद्धांचे ईश्वरु ।
बोलती तितुकें मुक्तेश्वरु । निरूपीत भारतीं ॥ आदि० अ० ४९

गुरुप्रेरणेनें मी भारतग्रंथ बोलत आहें, येथें मी 'स्वतंत्र नोहे विचारा' आदिपर्वाच्या उपसंहारांत कवि म्हणतोः—

प्रसिद्ध महाराष्ट्रदेशीं । गोदावरीतटनिवासी ।
अत्रिगोत्र पवित्रवंशीं । जन्म जाहला जयातें ॥ ६ ॥
तो चिंतामणिभूदेवकुमर । श्री दत्तांघ्रिपद्मभ्रमर ।
श्रोतया विनवी मुक्तेश्वर । क्षमा कीजे समस्तीं ॥ ७ ॥
करवीरलक्ष्मी विष्णुभाजा । भैरव सुवर्णपुरीचा राजा ।
उभय कुळदैवतीं माजा । मस्तक पायीं स्पर्शिला ॥ ८ ॥
तेणें बळें परमसुखी । श्लाघ्यता पावलों उभयलोकीं ।
सद्गुरुकृपा—मातृअंकीं । योग्य झालों बैसावया ॥ ९ ॥

येथें मुक्तेश्वरानें महाराष्ट्राला 'प्रसिद्ध' म्हणून गौरविलें आहे व रामायणां

तही महाराष्ट्रभूच्या वीर्यवत्तेचा उल्लेख केला आहे, यावरून आपल्या महाराष्ट्रीयत्वाचा त्याला अभिमान वाटत होता हे स्पष्ट दिसतें. शिवरायाचा प्रतापसूर्य क्षितिजावर येण्यापूर्वींचा हा कविकृत महाराष्ट्रगौरव इतिहाससंशोधकांनीं विचार करण्यासारखा आहे. मला पवित्र वंशीं जन्म मिळाला, मी भगवत्प्रसादानें उभयलोकीं श्लाघ्यता पावलों, सद्गुरुप्रसादाला मी पात्र झालों असे जे उद्गार कवीनें काढले आहेत ते ध्यानांत धरण्याजोगे आहेत. असें धन्यतेचे उद्गार त्यानें अन्यत्रही काढले आहेत. मुक्तेश्वराच्या काव्यांत इतर रसांप्रमाणें शृंगाररसाचेंही प्रसंगोपात्त वर्णन आहे. क्वचित् एकाद्या दुसऱ्या ओवींत किंवा वैराग्यवर्णनांत (शुकरंभासंवाद पहा ) अधिकउणा शब्द आला असला तर तेवढ्यावरून कवीच्या व त्याच्या बापाच्याही उज्ज्वल चारित्र्यावर शिंतोडा उडविण्याची जी एक चमत्कारिक तऱ्हा अर्वाचीन चिकित्सकांत दिसते तिचा निषेधच केला पाहिजे (महाराष्ट्र सारस्वत पृ. १४९) रा. भावे यांनीं तुकोबारायांच्या चारित्र्यावरही असाचअविचारमूलक आघात केला आहे ( अस्सल गाथा भाग २ प्रस्तावना ).मुक्तेश्वराच्या कवितेंत दृग्गोचर होणाऱ्या दिव्य प्रतिभेचें, त्याच्या ग्रंथांत सर्वत्र विखुरलेल्या उज्ज्वल नीतितत्वांचें,पवित्राचार विभूतींवर असलेल्या त्याच्या निष्कामप्रेमाचें, पैठणक्षेत्रस्थ महानुभाव नाथमहाराज यांच्या सांनिध्याचें व तज्जनित पवित्र वातावरणाचें, स्वतः मुक्तेश्वराच्या विमलस्फूर्तीचें व भगवद्भक्तीचें—या एकंदर निष्पाप वृत्तसमुच्चयाचें स्मरण झालें म्हणज त्याच्याविषयीं अमंगल कल्पनाच कोणाही सज्जनाच्या मनांत वास्तविक येऊं नयेत. एखाद्याच्या मनांत त्या आल्याच तर हा त्या पुरुषाचा स्वभावदोष किंवा मतिविकार आहे असेंच समजणें भाग आहे. तुकाराम काय किंवा मुक्तेश्वर काय महाप्रतिभावान् महापुरुष आहेत. त्यांच्यासारखी दिव्य प्रतिभा भलत्या भूमींत स्फुट व्हायची नाहीं. ' न प्रभातरलं ज्योतिरुदेति वसुधातलात् ' हें कालिदासाचें म्हणणें यथार्थ आहे. शुद्धाविषयीं अशुद्ध कल्पना करणें हा महादोष आहे, हा विनिपात आहे.' तपोधनसंवर्धितोऽनभिज्ञोऽयं जनः कैवतस्य'(अभि.शाकुंतल अंक५)असें मुक्तेश्वराविषयींही म्हटलें पाहिजे.असो. सभापर्वाच्या मंगलाचरणांत कवीनें आपली कुलस्वामिनी कोल्हापूरची महालक्ष्मी व कुलदेव सोनारीचा (बार्शीजवळ) भैरव यांस सविनय वंदन करून को-

ल्हापूरची विश्वजननी—'तिचा लाहोनि वरदहस्त। संतसभेसी झालों स्वस्थ' असें म्हटलें आहे. लीलाविश्वंभर जो ' दत्तात्रय जगद्‌गुरु ' त्यांस नमस्कार करितांना हरिहररविगणेशशारदा हें पंचायतन मी तद्रूपच पाहतों असें सांगितलें आहे.

मुक्तेश्वराचा श्रीगुरु । दत्तात्रेय हा अवतारु ।। सभा० ८–११८ ।।
गुरुनामभजनानें पवित्र झालेल्या माझ्या पवित्र वदनांतून पवित्रकथाच निघत आहेत:

पवित्रकथानिरूपण । परिसती पवित्रांचे श्रवण ।
पवित्र मुक्तेश्वराचें वदन । विश्वंभरगुरुनामें ।। सभा० १४-१७१

सभापर्वाच्या उपसंहारांत कवि म्हणतो:—

गोदावरीतटनिवासी । अत्रिगोत्री पवित्रऋषी ।
चिंतामणि गुणैकराशी- । पासाव जन्म जयाचा ।। २ ।।
तो मुद्गल चिंतामणिसुत । लीलाविश्वंभर जगविख्यात ।
व्यासभारतीचा अर्थ । महाराष्ट्र बोलिला ।। ३ ।।

२ मुक्तेश्वराविषयीं साक्षात् त्याच्याच ग्रंथांत जी माहिती मिळते ती एवढीच आहे. त्याचें शिक्षण पैठणांतच झालें. काव्यादर्शकार दंडी यानें म्हटल्याप्रमाणें नैसर्गिक प्रतिभा, निर्मल श्रुत ( ज्ञान ) व आनंदाभियोग या गुणांच्या समुच्चयामुळें त्याच्याठिकाणीं काव्यशक्तीचा प्रादुर्भाव झाला. उपासनाबळानें त्याच्या प्रतिभेला शुचित्व प्राप्त झालें. भवभूतिप्रमाणेंच मुक्तेश्वरही विद्वान् कवि होता. विद्वत्त्व आणि कवित्व यांचें वांकडें आहे अशी कोणाकोणाची समजूत असते, पण ती यथार्थ नाहीं. जगांतील बहुतेक नामांकित कवि अत्यंत विद्वान् होते. मुक्तेश्वराचें शास्त्राध्ययन दांडगें होतें, काव्यनाटकाप्रमाणेंच वेदांतमीमांसादि शास्त्रें पैठणच्या विद्वत्समाजांत त्यानें चांगलीं पाहिलीं होतीं. त्याच्या ठिकाणीं रसिकत्व उपजतच होतें, यामुळें तो वेदाभ्यासजड झाला नाहीं. त्याची बुद्धि सूक्ष्म,प्रतिभा उज्ज्वल, व रसिकता ईश्वरदत्त अशी असल्यामुळें आणि त्यांतच काव्यनाटकादि ललितवाङ्मयाच्या व वेदांतादि गहनवाङ्मयाच्या अध्ययनाची व त्या काळीं सार्वत्रिक असलेल्या प्रवासप्राप्त व्यवहारज्ञानाची

भर पडल्यामुळें त्याच्या बुद्धींत महाकाव्योचित गुणांचा उदय झाला व त्याचें सुंदर फळ महाराष्ट्र वाङ्मयास मिळालें.

रामायणाच्या उपोद्घातांत मुक्तेश्वर म्हणतो:—

श्रीमद्रामपदांबुजं हृदि सदा ध्यातुर्भवाब्धेर्भिया
मुक्तेशस्य विराजते सुरुचिरा वाणी गुणग्राहिणी ।
नानानाटकभावपद्यरचना संदोहसांद्रीकृता
सुश्राव्या सुजनैर्मनोहरतरा संसारदुःखापहा ॥ १ ॥

संसारभयानें श्रीरामचरणांचें ध्यान करणाऱ्या मुक्तेश्वराची वाणी सुरुचिरा आहे, गुणग्राहिणी आहे, काव्यनाटकादि पद्यरचनेच्या प्रेमामुळें तो आर्द्रता व म्हणून मनोहरता पावली असून सज्जनांना सुश्राव्य आहे;ती ज्यांच्या कानांवर पडेल त्यांच्या संसारदुःखांचें हरण होईल. कवीनें पुढें शारदेला ‘ चातुर्यरत्नाकरराजहंसी । साहित्यशब्दाक्षरमुक्तराशी ’ अशा गोड विशेषणांनीं आळविलें आहे. येथें कवीनें आपली साहित्यप्रीति सूचित केली आहे. महाभारताच्या मंगलाचरणांत त्यानें ‘ नेटका वेदांती’ व्यास, जैमिनीवसिष्ठादि मीमांसक, नैयायिक गौतम यांस ‘ सद्भावें दंडप्रणाम ’ केला आहे;सांख्याचार्य कपिलमुनि,शेषावतार पतंजलि यांना वंदन केलें आहे; शंकराचार्य व त्यांचे गुरु गौडपादाचार्य तसेच ‘ टीकाकारांमाजी चतुर ’ असे श्रीधर यांना ‘ गुरुरूपें नमस्कारिले ’ आहे ( ७३-७५ ) मुक्तेश्वर वेदशास्त्रसंपन्न होता याबद्दल त्याच्या भारतांतहि अनेक प्रमाणें सांपडतात. प्रसंगानें त्यानें—मूळभारतांत कांहींहि उल्लेख नसून—नैय्यायिक, मीमांसक, वैशेषिक, चार्वाक, सांख्य व वेदांती यांच्या मतांचें निदर्शन केलें आहे ( आदि० अ० १५). शुकरंभासंवादही पहा. असो. प्राकृतकवींपैकीं ज्ञानेश्वर व एकनाथ यांना मुक्तेश्वरानें वंदन केलें आहे.

प्राकृतकवीश्वराचार्य । ज्ञानदेव ज्ञानैकवर्य ।
जयाचे बुद्धीचें गांभीर्य । अगाधसिंधूसारिखें ॥ ७६ ॥
त्याचे चरण चिंतिले मनीं । तेणें पावन झालों जनीं ।
मातृजनक जनार्दनी । एकनाथ नमियेला॥७७॥ ( आदि० अ.१)

वनपर्वाच्या मंगलाचरणांतहि नाथांबद्दल पुढील ओवी आली आहे:—

मुक्तेश्वरें एकनाथु । यातें साष्टांग प्रणिपातु ।
गुरुस्वरूप म्हणोनि हेतु । ग्रंथारंभीं वंदावा ॥ ४ ॥

३ मराठी संतकवींपैकीं त्यानें ज्ञानेश्वर व एकनाथ यांशिवाय कोणाचाही नामोल्लेख केला नाहीं. त्याच्यापूर्वीं भारतावर मराठींत पद्यरचना करणाऱ्या कवींचे त्यानें मोघम उल्लेख केले आहेत, पण कोणाचेंही नांव सांगितलें नाहीं. ज्ञानेश्वरांना त्यानें ' प्राकृतकवीश्वराचार्य ' ही यथार्थ पदवी देऊन त्यांच्या ' अगाधसिंधूसारख्या बुद्धिगांभीर्याचें ' गौरव केलें आहे. त्यानें केलेल्या ज्ञानेश्वरांच्या आरतींत ज्ञानेश्वर हे विष्णूचा अवतार आहेत असें म्हटलें असून कार्तिक वद्यांत आळंदीस भरणाऱ्या त्यांच्या समाधिमहोत्सवाचा उल्लेख केला आहे. ' सकळ सिद्धगणांमाजी तूं श्रेष्ठ ' असें त्यांचें वर्णन करून ' मुक्तेश्वरीं न धरे प्रेमाचा लोट ' याप्रमाणें आपल्या ज्ञानेश्वरभक्तीची उत्कटता व्यक्त केली आहे. मुक्तेश्वरानें एकनाथांवर २।३ आरत्या केल्या असून ९४ ओव्यांत त्यानें त्यांचें चरितही गाइलें आहे. चरित्रांत मुख्यतः ' श्रीखंड्याख्यान ' वर्णिलें असून शेवटीं ' चरित्र देखोनि मुक्तेश्वर बोलिले देवभक्ताचा विचार ' असा उद्गार काढला आहे. ' देखोनि ' या पदावर मी जरा स्तब्ध झालों. नाथांच्या चरित्रांतला तो दिव्य प्रसंग झाला तेव्हां मुक्तेश्वर हयात होते काय ? त्यांनीं तो प्रसंग खरोखर ' देखिला ' होता काय ? नाथांचें प्रयाण शके १५२० मध्यें झालें हें मी आपल्या श्रीएकनाथचरित्रांत सप्रमाण सिद्ध केलें आहे. नाथांचा जन्म शके १४५० च्या सुमारास झाला, म्हणजे त्यांचें सर्व चरित्र ७० वर्षांत घडून आलें. मुक्तेश्वराला कांहीं वर्षें तरी नाथांचा सहवास घडला होता यांत शंकाच नाहीं. मुक्तेश्वर जन्मतः मुका होता व त्याच्या आईनें तो ३ वर्षांचा झाला तेव्हां त्याला नाथांच्या पायांवर घालून ती सद्गदित वाणीनें ह्मणाली, ' साऱ्या जगावर तुह्मी उपकार करतां, हजारों लोकांचे दुःखक्लेश निवारितां आणि माझ्या मुक्या मुलाकडे मात्र पाहत नाहीं ! ' यावर नाथांनीं लीलेचा मुलगा जवळ घेतला, त्याच्या सर्वांगावरून आपला वरदहस्त फिरविला व म्हणाले,—' लीले ! हा मुलगा बोलेल बरें, हा फार चांगलें बोलेल व सारें जग मान डोलवील असें बोलेल. ' लीलेला तें ऐकून समाधान झालें. लीले-

चा मुक्तेश्वर वैखरीनें बोलूं लागला आणि वयांत आल्यावर इतकें उत्कृष्ट बोलला कीं त्याच्या बोलकेपणामुळेच आपल्याला त्याचें प्रस्तुत चरित्र गाण्याचा सुयोग आला आहे ! वरील आख्यायिकेला मुक्तेश्वराच्या नाथां-वरील एका आरतींत ' कोण मुक्याहातीं रामायण वदवी ? ' याप्रमाणें आधारही मिळत आहे.नाथांचा मुक्तेश्वराला किती वर्षें सहवास घडला होता हें जाणण्यास कांहीं गमक नाहीं, तथापि त्याचें ' भजा हो भजा माझ्या एकनाथासी ' हें पद बारकाईनें पाहतां सदर पद नाथांच्या हयातींत झालें नसलें तरी नाथांच्या चरित्रांतल्या ठळक गोष्टी डोळ्यांसमोर घडत असल्याप्रमाणें मुक्तेश्वर येथें गात आहे असें वाटतें. नाथांच्या प्रयाणकाळीं मुक्तेश्वर २५ वर्षांचा होता असें मानलें तर मुक्तेश्वराचा जन्म शके १४९५ च्या सुमारास येतो. शके १५६६ ते ७१ पर्यंतच्या तुकोबा, समर्थ व शिवाजी यांच्या संघट्टणाच्या काळापूर्वी मुक्तेश्वरी भारत झालें असावें असें खास वाटतें. याची चर्चा पुढें होईलच. तूर्त एवढेंच सांगणें अवश्य वाटतें कीं, शके १५४०–५० च्या दरम्यान मुक्तेश्वरी भारत झालें असून शके १४९५ते१५६०पर्यंतचा६५वर्षांचा काळ मुक्तेश्वराच्या हयातींचा दिसतो. पांच वर्षें आगेमागें धरिलीं तरी मुक्तेश्वराचें आयुष्य सुमारे६०वर्षांचें असून महाराष्ट्र स्वराज्योन्मुख झाल्यावेळीं हा देदीप्यमान तारा महाराष्ट्राच्या क्षि-तिजावर उगवलासें दिसतें.नाथ,मुक्तेश्वर, तुकाराम,व समर्थ यांच्या प्रासादि-क वाणीचा प्रसाद महाराष्ट्राला एकामागें एक असा मिळाला.भगवत्प्रसादाची गंगा महाराष्ट्रावर लोटली ती या चार प्रभावशाली गायमुखांतून शें सव्वा-शें वर्षें सतत वाहत होती ! या सरस्वतीचा ओघ शके १४८०ते१५२० पर्यंत नाथांच्या मुखांतून, शके १५३० ते १५५० मुक्तेश्वरांच्या मुखांतून, १५५५ ते १५७१ तुकोबांच्या मुखांतून व शके १५७० ते १६०० समर्थांच्या मुखांतून वाहिला असा क्रम सांगितल्यास यांत बहुधा चूक न व्हावी असा मला भरंवसा वाटतो. हें शतक संतकवि व वीरमुत्सद्दी यांनीं गजबजून गेलेलें असें महाराष्ट्राच्या इतिहासांत प्रसिद्ध आहे. असो, नाथां-च्या घराण्यांत, नाथांच्या कृपाछत्राखालीं वाढलेल्या मुक्तेश्वराचा नाथांविषयीं अत्यंत प्रेमा प्रगट व्हावा यांत नवल नाहीं. नाथांच्या चरित्रांत' शमदम-करुणेची सीमा । पूर्ण गरिमा वाढली ' ही गोष्ट विश्वविख्यात आहे.

नाम एकोबाचें गोड आवडे मना ।
नावडे आणीक मज कांहीं त्याविना ॥
थकलें माझें चित्त पुरले मानिंचे मनोरथ ।
थयथय नाचे मुक्तेश्वर ह्मणे मी जालों कृतार्थ ॥

याप्रमाणें नाथभक्ति कवीनें व्यक्त केली आहे. थकलें=थक्कित झालें, चमत्कारलें.

निर्मळ गोदातटीं मुनिराजहंस ।
निर्गुणप्रतिष्ठानीं केला रहिवास ॥

अशा त्या 'भक्तिभावें सकळांसी मैत्री करुनी' पैठणास नांदणाऱ्या व सत्कीर्तीनें सारा ब्रह्मगोळ भरून टाकणाऱ्या गोदातीरस्थ मुनिराजहंसाच्या पायीं 'मुक्तेश्वरें तेथें धरियेला प्रेमा' यांत कांहीं नवल नाहीं. मुक्तेश्वराची बुद्धिमत्ता, प्रतिभा व कवित्वशक्ति एवढी दांडगी होती कीं त्याच्या पूर्वीं होऊन गेलेल्या मराठी संतकवींपैकीं ज्ञानेश्वर व एकनाथ हे दोघेच त्याच्या प्रेमादरास पात्र झाले. दोघांचाही त्याच्या विचारांवर व भाषेवर परिणाम झालेला त्याच्या कवितेवरून दिसतो. काव्यनाटकादि ललितवाङ्मयाच्या अभ्यासानें वाणीला मार्दव येतें व रसिकतेचें उद्दीपन होतें; वेदशास्त्राध्ययनानें भाषेला आणि विचारांला प्रौढी व गांभीर्य प्राप्त होतात; देशाटन केल्यानें बुद्धींतला एकलकोंडेपणा जाऊन विविध प्रकृतींच्या लोकांशीं संघट्टण झाल्यामुळें व्यवहारचातुर्य उत्पन्न होतें आणि सत्सहवासापासून दयाक्षमाशांत्यादि सत्वगुण अंगीं जडून धर्मनीतींचीं रहस्यें उलगडतात व भगवंतीं अपार प्रेम जडतें. मनुष्याचें शिक्षण पूर्ण होण्यास या चारही गोष्टी अवश्य आहेत. मनुष्य यांपैकीं एकाच अंगावर ज्यास्त टोंकेल तर त्या अंगाच्याच गुणधर्माचा अधिक विकास होईल. मुक्तेश्वराचें शिक्षण या चारी अंगांनीं पूर्ण झाल्यामुळें त्याच्या परिपाकाचा संस्कार त्याच्या वाणीवर उत्कृष्ट झालेला आहे व म्हणून त्याची कविता सर्वांना मोहून टाकण्यासारखी सरस उतरली आहे.

४ मुक्तेश्वराचे वंशज कुरुंदवाडापासून एक मैलावर पंचगंगेच्या तीरीं तेरवाड येथें राहतात. ते तेरवाडचे इनामदार म्हणून प्रसिद्ध आहेत. मुक्तेश्वर दत्तोपासक असल्यामुळें कृष्णातीरीं असलेल्या नरसोबाची वाडी, व

औदुंबर ह्या दत्तक्षेत्रीं त्याचें जाणेंयेणें बरेंच होतें. एकवार असाच यात्रेच्या निमित्तानें तो इकडे आला असतां त्याचा तेरवाडास काल झाला.त्या ठिकाणीं त्याचें वृंदावन बांधलें असून त्यांत दत्तमूर्ति स्थापिली आहे. तेरवाडकर इनामदारांच्या घराण्यांत सोनारीच्या भैरवाला ओवरयात्रा नेण्याचा प्रघात अजून चालत आहे. राजवाडे यांनीं मुक्तेश्वराची वंशावळ व त्यापासून चौथा पुरुष मुक्तेश्वर ( तेरवाडसंपादक ) यास मिळालेल्या दोन सनदा इ० स० १९०२ सालीं ग्रंथमालेंत छापल्या आहेत. त्या दोन्ही कोल्हापूरच्या शमू छत्रपतीनें त्यास दिल्या होत्या. एक राजशक ५४ ( इ० स० १७२८) व दुसरी राजशक ८५ (इ० स० १७५९) या सालची आहे.

### वंशावळ.

भुजंगपंत ( अत्रीगोत्री ) एकनाथस्वामी.
|
चिंतोपंत ( विश्वंभर )= गोदा उर्फ गंगा उर्फ लीला.
|
मुक्तेश्वर ( कवि ).
|
निरंजन
|
आकाण्णा गोसावी
|
मुक्तेश्वर ( तेरवाडसंपादक )
|
निरंजन ( तेरवाडसंपादक जो मुक्तेश्वर त्याची कन्या बकूबाई इचा मुलगा—( दत्तक )

पहिल्या सनदेंत " राजश्री मुक्तेश्वर गोसावी बिन्न आकाण्णा गोसावी, गोत्र अत्रि ) वास्तव्य मौजे कुरुंदवाड—आपले पणजे राजश्री थोरले मुक्तेश्वर गोसावी हे श्रीएकनाथस्वामींची कन्या गंगाबाईचे पुत्र यांचें वृंदावन मौजे तेरवाड येथें आहे " अशीं अक्षरें आहेत. पुढील मजकूर मामुली आहे. दुसऱ्या सनदेंत अशींच अक्षरें आहेत, फक्त 'गोत्र आश्वलायन' अधिक आहे.हा सर्व मजकूर आपण पूर्वीं दिलेल्या हकीकतीशीं जुळता आहे.

# मुक्तेश्वराची कविता.

तो चातुर्याचा दिनकर । कां विवेकसागरीं पोहणार ।
तो कवि प्रसिद्ध मुक्तेश्वर । तयासी नमस्कार सद्भावें ।।

—महिपति.

१ मुक्तेश्वराची एकंदर कविता आज उपलब्ध आहे ती येणेंप्रमाणें:-

| | | |
|---|---|---|
| १ संक्षेपरामायण ( श्लोकबद्ध )— | संख्या | ६६१ |
| २ मुक्तेश्वरी महाभारत ( ओवीबद्ध ):... | | |
| ( मु ) आदिपर्व | ... ... ... | ७१२३ |
| ( क्ते ) सभापर्व | ... ... ... | २७०० |
| ( श्व ) वनपर्व ... | ... ... ... | २७६५ |
| ( र ) विराटपर्व | ... ... ... | ९९१ |
| * * | * * | |
| ( श्री ) सौप्तिकपर्व | ... ... ... | ५०० |
| | | १४०७९ |
| ३ स्फुट प्रकरणें:— | | |
| (श्री ) हरिश्चंद्राख्यान ... | ... ... | ६०८ |
| ( द ) शतमुखरावणवधाख्यान | ... | १३३ |
| ( त्ता ) मूर्खाचीं लक्षणें ... | ... ... | ११३ |
| ( त्र ) भगवद्गीता | ... ... ... | ७०८ |
| ( या ) शुकरंभासंवाद ... | ... ... | ४६७ |
| ( य ) किरकोळ ४।५ प्रकरणें ... | ... | २७० |
| ( न ) श्रीएकनाथचरित्र | ... ... | ९४ |
| ( म: ) पदें व आरत्या ... | ... ... | १७ |
| | एकूण | १७१५० |

२ याप्रमाणें पाहतां मुक्तेश्वराची एकंदर कविता सरासरीनें १७ हजार आज उपलब्ध असून ती मुंबईच्या 'काव्यसंग्रहांत' प्रसिद्ध झालेली आहे.

मुक्तेश्वराच्या भारताचीं मात्र पांचच पर्वें उपलब्ध व प्रसिद्ध झालीं आहेत. त्याचें संपूर्ण भारत अमुकाजवळ आहे, अमक्यानें पाहिलें आहे, शांतिपर्व अमुक गृहस्थ छापणार आहे, इ० गोष्टी आज २५वर्षांत अनेकवार प्रसिद्ध झाल्या आहेत व ऐकण्यांत आहेत; पण त्या तूर्त जमेत धरण्यांत बिलकूल अर्थ दिसत नाहीं. मुक्तेश्वरी भारत कोणीं दुष्टानें मत्सरानें जाळून टाकलें व नाथांच्या सांगण्यावरून कवीनें तें स्वतःच गोदावरींत बुडविलें अशा दोन दंतकथा प्रचलित आहेत, पण त्या दोहींतही कांहीं राम आहे असें मला वाटत नाहीं. मुक्तेश्वराचें रामायण सामान्यांतलें आहे, इतर स्फुटकवितेंतही दोन तीन प्रकरणांशिवाय विशेष स्वारस्य आहे असें नाहीं. ती बऱ्यापैकीं आहे इतकेंच म्हणतां येईल. मुक्तेश्वराची मुख्य कीर्ति त्याच्या भारतावर आहे व त्यांतही पहिलीं चार पर्वें हीं त्याच्या कीर्ति-मंदिराला आधारभूत आहेत. मुक्तेश्वराचें काव्यगुणसर्वस्व ह्या चार पर्वांत प्रगट झालें आहे व चार पर्वांपुरतें पाहतां भारतीकथा लिहिणाऱ्या सर्वच महाराष्ट्र कवींत मुक्तेश्वर अग्रगण्य ठरतो यांत शंका नाहीं. कवित्वाचे सर्वोत्कृष्ट गुण ह्या चार पर्वांत पाहण्यास मिळतात व विद्वानांचीहि मुक्तेश्वरावर जी प्रीति आहे ती याच चार पर्वांमुळें आहे. हरिदासांच्या भारती आख्यानांला मुक्तेश्वरी ओवी व मोरोपंती आर्या या दोन्हींचा सुंदर मिलाफ बसतो तो याच पर्वांमुळें.मुक्तेश्वरानें आपलें भारत पूर्ण केलें नसावें असें म्हणतांच येत नाहीं. सौप्तिक पर्व ज्या अर्थीं सांपडलें आहे त्या अर्थीं त्या पूर्वींचीं पर्वें त्यानें लिहिलीं असलीं पाहिजेत व कदाचित् अधिक कसोशीनें संशोधन झालें तर यापुढें तीं उपलब्धही होतील, नाहीं कोणीं म्हणावें ? विराटपर्वाच्या अखेरीस या पुढील कथाभाग 'करुणाकर संत परिसोत पुढें' असें आश्वासन दिलें आहे. अठरापर्वांतलें सौप्तिक पर्व हें अकरावें आहे व यावरून पाहतां पूर्वींचीं १० हीं पर्वें यथाक्रम झालीं असावीत असें दिसतें. सौप्तिक पर्वाच्या आद्यंतींच्या ओव्या पहा किंवा पुढील २।३ ओव्या पहाः—

व्यासगुरूच्या कृपादृष्टीं । मुक्तेश्वर अधिकार भारतसृष्टीं ।
पावला, जैसा क्षीरार्णवतटीं । उपमन्यू लाधे क्षीरातें ।। सौ० १--१३०।।
यानंतरें निरूपण । अग्र ( पुढील ) प्रसंगा चामके ।। सौ० २–१३७।।

विश्वंभरांघ्रिपदभ्रमर । विनवी मुक्तेश्वर कविकिंकर ।
कथा चाले तो बहिवार । संतसज्जनसंगतीचा ।। सौ० ३-९८ ।।

यावरून ११ व्या सौप्तिक पर्वापर्यंत मुक्तेश्वरी भारतच्या रचनेला कांहीं खंड पडला होता किंवा विघ्न आले होतें असें दिसत नाहीं. मग मुक्तेश्वरी भारताचीं बाकीचीं पर्वें गेलीं कोठें ? हें अजून तरी खरोखर कोडेंच आहे. माझ्या प्रवासांत जेथें जेथें मुक्तेश्वरी भारताच्या पोथ्या माझ्या पाहण्यांत आल्या तेथें तेथें पाहिलीं चारच पर्वें आढळलीं किंवा कोठें पुढील पर्वें आढळलींच तर तीं दुसऱ्या कोणा कवीचीं आढळलीं. फक्त सौप्तिक पर्व मला अधिक सांपडलें त्याचा उल्लेख प्रस्तावनेंत केलाच आहे. सौप्तिक पर्वाची दुसरी एक प्रत प्रिं. राजवाडे यांसही मिळाली होती असें काव्यसंग्रहावरून दिसतें. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं मुक्तेश्वरानें सबंध भारत लिहिलें यांत शंका नाहीं, तथापि पांच पर्वांशिवाय बाकीचीं पर्वें अजून उपलब्ध झालीं नाहींत, मग त्यांचे काय झालें हें एक मोठें गूढच आहे. मुक्तेश्वराचें संपूर्ण भारत वाचण्याची मला अनेक वर्षांची अत्युत्सुकता आहे व ती अनेकांस असेल यांत शंका नाहीं. मुक्तेश्वराचें संपूर्ण भारत उपलब्ध होईल तर महाराष्ट्र वाङ्मयांतला कोहिनूर मिळाला असें सर्व रसिक काव्यभक्तांस वाटल्यावांचून राहणार नाहीं. आतां आपण मुक्तेश्वरी भारताचाच सर्वांगानें विचार करूं.

# १ मुक्तेश्वरी महाभारत.

—*❋*—

श्रीविश्वंभरलीलायोगो मुक्तेशमूर्तिमातनुते ।
याहि महाभारतरणसमुद्यमे प्राकृतान्सतृष्णयति ॥

विठोबा आण्णा.

## १ महाभारताचे मराठी अवतार.

१. महाराष्ट्राच्या अर्वाचीनकाळच्या इतिहासांत म्हणजे एकनाथस्वामींच्या जन्मापासून तों मोरोपंतांच्या मृत्यूपर्यंत(शके १४५०–१७१६) सुमारें अडीचशें वर्षांच्या अवधींत आपल्या मराठी भाषेत लहानमोठे शें-दीडशे ग्रंथकार झाले आहेत. सामान्यत: असें म्हणतां येईल कीं, प्रत्येक मराठी संत कवि आहे, पण प्रत्येक कवि मात्र संत नाहीं. पदें, अभंग, स्तोत्रें, आरत्या यांतून कांहीं सुद्धां ज्यानें मागें ठेविलें नाहीं असा संत विरळाच सांपडेल. अभंग, पदें, श्लोक, स्तोत्रें, आरत्या, कटाव, पोवाडे, लावण्या, गाणीं एवढाच भाग एकत्र छापला तर सुमारें दोन लाख मराठी कविता निघेल. ही बहुतेक कविता प्रासंगिक, अनुभविक, प्रेमळ व अगदींच स्वतंत्रपणें रचलेली किंवा हृदयवृत्तींच्या लाटांबरोबर बाहेर आलेली असल्यामुळें या कवितेची मातब्बरी मराठी वाङ्मयांत पुष्कळच मोठी गणली पाहिजे. मोठमोठे मराठी ग्रंथ, बहुधा रामायण, महाभारत व भागवत या तीन ग्रंथांच्या आधारानें झालेले आहेत, तरी तेही प्राय: स्वतंत्रबुद्धीनें रचिलेले आहेत.या काळांत रामायणावर जे अनेक ग्रंथ झाले, त्यांपैकीं एकनाथांचें भावार्थरामायण अत्यंत प्रासादिक व प्रेमळ असल्यामुळें आजमितीपर्यंत त्याच्याइतकें कोणतेंच रामायण लोकांच्या वाचनांत आलेलें नाहीं. रामदासांचें रामायण त्रुटित पण वीररसात्मक आहे, त्यांत युद्धकांड व सुंदरकांड हीं दोनच कांडें आहेत. भागवतासंबंधानें पाहिलें तरी एकनाथी भागवताची सर कोणालाही येणार नाहीं. भक्तिमार्गाचे प्रधान ग्रंथ दोन; गीता आणि भागवत. गीता ज्ञानेश्वरांनीं व भागवत एकनाथांनीं मराठींत आणून भागवतधर्माची भक्कम दुखांबी इमारत महाराष्ट्रांत उठविली. राहतां राहिलें महाभारत,त्याचा थोडा विचार अंमळ विस्तारानें करूं.

२ महाभारतावर आजपर्यंत मराठींत १८–२०तरी ग्रंथ झालेले आहेत. शिवाजी महाराजांच्या पूर्वी ७५।८० वर्षांपासून महाराष्ट्रांतील लोकांच्या मनांत स्वधर्म व स्वदेश याविषयींच्या कल्पना खास खेळत होत्या:—

गाई ब्राह्मणांसी जाण । पीडा करिती दारुण ।
क्षेत्रवित्तदाराहरण । स्वार्थे प्राण घेताती ॥ स्कंध १०–५८८॥

याप्रमाणें नाथांनीं आपल्या भागवतांत मुसलमानी अमलाचें वर्णन केलें आहे. रामदासांनीं ७५ वर्षांनंतर–

तीर्थें क्षेत्रें तीं मोडलीं । ब्राह्मणस्थानें भ्रष्ट झालीं ।
सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ॥ २ ॥

अशीच ओरड शिवाजीरायापाशीं केली. नाथ–शहाजींच्या वेळीं जमीन भाजण्याचें काम चाललें होतें पण पेरणीची वेळ आली नव्हती, ती रामदास-शिवाजींच्या वेळीं आली. मालोजीच्या जन्मकाळापासून तों महादजी शिंदे यांच्या मृत्यूपर्यंत महाराष्ट्रांत वीरही अनेक निर्माण झाले. शिवाजीचे वडील शाहाजी राजे कांहीं सामान्य प्रतीचे वीर व मुत्सद्दी नव्हते. शहाजी, शिवाजी, तानाजी मालुसरे, मोरोपंत पिंगळे, बाजी प्रभु, धनाजी व संताजी, बाजीराव व राघोबादादा, राणोजी शिंदे, मल्हारराव होळकर, रघूजी भोसले, गोविंदपंत बुंदेले, रत्नाकरपंत आप्पा, विठ्ठलराव विंचुरकर, महादजी शिंदे, पटवर्धन वगैरे पराक्रमी वीर या अडीचशें वर्षांच्या काळांत निर्माण झाले. तसेच शहाजी, शिवाजी, रामचंद्रपंत व प्रल्हाद निराजी, बाळाजी विश्वनाथ, नानासाहेब, सखारामबापू, नाना फडणीस, रत्नाकरपंत आप्पा, पाटीलबोवा वगैरे बुद्धिवंत मुत्सद्दीही उत्पन्न झाले. वीरांचे हात व मुत्सद्द्यांची डोकीं, या तीनशें वर्षेपर्यंत राष्ट्रकार्य साधण्यांत गुंतलीं होतीं. सर्वच राष्ट्रास वीरश्री चढली होती. या मराठेशाहीच्या काळांत कार्यक्षम मंडळीला प्रेरणा करून त्यांच्या मनांत स्वधर्मबुद्धि नेहमीं जागृत ठेवणारे व सामान्य जनतेला कर्तृत्वाची दिशा दाखविणारे संतकविही निर्माण झाले. महाराष्ट्रांत वाग्वीर्य व बाहुवीर्य यांचा युगपत् उदय झाला. हा मुख्यत स्वराज्योत्कर्षाचा—शौर्याचा व मुत्सद्दीपणाचा—काळ असल्यामुळें अश काळाला धर्मप्रधान राजकारणाचें उत्कृष्ट शिक्षण देणारा हिंदुराष्ट्राचा महाग्रंथ महाभारत इकडे लोकांचें लक्ष गेलें. द्रोणार्जुनांच्या पराक्रमाच्या गोष्टी व भीष्म

कृष्णांच्या जनहितपर मुत्सद्दीपणाच्या गोष्टी प्राकृत भाषेंत सामान्य जनसमूहास शिकविणारे राष्ट्रीय शिक्षक पाहिजे होते व ते भगवत्प्रेरणेनें निर्माणही झाले. महाभारतांतील शूरांच्या गोष्टी ऐकून शिवाजीमहाराजांना वीरश्री चढली; मिरजेच्या वेढ्यामुळें व एकंदर प्रतिकूळ काळामुळें हताश झालेल्या गोपाळराव पटवर्धनाला धीर द्यायाला आमच्या मुक्तेश्वराचें हरिश्चंद्राख्यान कारण *झालें. मराठी कवींच्या वाणींत जीवंतपणा होता व त्याचा राष्ट्रांतील कर्त्या पुरुषांवरही परिणाम पुष्कळ झाला. मराठी संतकवींची वाणी, मराठी योद्धयांचे हात, मराठी मुत्सद्यांचीं डोकीं हीं स्वधर्मस्वदेशस्वभाषांच्या अभिवृद्धयर्थ एकमतानें काम करीत होतीं. असो; या तीनशें वर्षांत महाराष्ट्राच्या क्रियेंत जो वीररसाचा पूर आला, त्यामुळें बिंबप्रतिबिंबन्यायानें मराठी कवींच्या ग्रंथांतही वीररसाला भरतें चढलें व मुख्यतः महाभारताकडे सार्वजनचित्त वेधलें. वीरश्रीच्या काळांतच वीरश्रीच्या गोष्टी आवडतात. ' शूर मर्दाचा पोवाडा शूर मर्दानें ऐकावा ' असें अगीनदास शाहीर तानाजीच्या पोवाड्यांत म्हणतो. रावबाजीच्या वेळीं लावण्यांतमाश्यांना ऊत आला हेंही स्वाभाविकच झालें ! महाभारतांतील लहानमोठीं आख्यानें, व उपाख्यानें घेऊन त्यांवर अनेक मराठी कवींनीं काव्यें केलीं आहेत. पण सबंध महाभारत किंवा भारताचीं पर्वें यांवरही कित्येकांनीं प्राकृत ग्रंथ केले आहेत. महाभारतानें मराठी पेहराव २० । २५वेळ घेतलें असें आपणांस मुक्रर म्हणतां येतें. पण यांपैकीं मुक्तेश्वरी भारताचीं चार पर्वें, श्रीधराचा पांडवप्रताप, व मोरोपंती भारत हीं मात्र आपल्या अंगच्या गुणांमुळें लोकांच्या वाचण्यांत फार आलीं आहेत. आज ज्यांचीं नांवेंही कोणास माहीत नाहींत असे भारतग्रंथ यापुढेंही कदाचित् उपलब्ध होतील, असा संभव आहे. जे ग्रंथ अजून प्रसिद्ध झाले नाहींत किंवा एखाद्या दुसऱ्या शोधकाजवळ असून सर्वांना माहीत झाले नाहींत, असे महाभारतवर कांहीं मराठी

---

* गोपाळरावांचे वडील त्यांस लिहितात.–' हरिश्चंद्राख्यान प्राकृत आम्हीं पुण्याहून पांच अध्याय लिहून आणलें होतें. संग्रहीं होतें. तुम्हांस वाचावयास पाठविलें. पांच सात वेळ पारायण करणें. ( इतिहासिक लेखसंग्रह. ले. १९८ ) हरिश्चंद्राख्यानाची प्राकृत पंच्याध्यायी मुक्तेश्वराचीच होय याविषयीं शंकाच नको.

ग्रंथ आहेत. आजपर्यंत मला जे उपलब्ध झाले व माझ्या वाचण्यांत आले किंवा ऐकून व पाहून मला माहीत झाले असे मराठी भारतग्रंथ २०।२५ तरी आहेत. हे सर्व ग्रंथ छापले जातील, किंवा सर्वच छापण्यालायक आहेत असें म्हणवत नाहीं. ग्रथांचीही शर्यत चालू असते, प्रासादिक ग्रंथ शर्यतींत पुढेच राहतात व किरकोळ ग्रंथ मागे पडतात.

खालील महाराष्ट्र भारतीग्रंथ उपलब्ध आहेतः—

१ मुक्तेश्वरी भारत ( पहिलीं चार पर्वें व सौप्तिक पर्व ).

२ विष्णुदासनामाकृत भारत .( आदिपर्व पंढरपुरीं व भीष्मपर्वाच्या पुढलीं पर्वें कांहींजणांजवळ आहेत. ).

३ गोपाळकृत भारत ( हें मला पंढरीस एका जुन्या दप्तरांच्या ढिगांत मिळालें. )

४ मुरारिकृत भीष्मपर्व ( पंढरीसच एका वैश्याचे घरीं सांपडलें. )

५ शुभानंदकृत उद्योगपर्व ( काव्यसंग्रहांत छापलेलें व ( भीष्मपर्व ).

६ माधवकृत समग्र भारत ( मुंबईस रा. तेंडुलकरांनीं पाहिलें होतें. त्यांजकडे छापण्यास आलें होतें असें मला त्यांजकडूनच कळलें. )

७ श्रीधरकृत पांडवप्रताप ( सुप्रसिद्ध आहे )

८ वामनकृत विराटपर्व ( काव्यसंग्रहांत छापलेलें. )

९ नरहरि मोरेश्वर ( अक्कलकोट येथें 'विनायकराव सरदेशमुख' यांजवळ कांहीं द्रोणपर्वादि पर्वे आहेत ( केसरी ता. २४।३।०३ ) व शिवाय 'माधवानुजा'नीं काव्यसंग्रहकारांकडे उद्योग व कर्णपर्व हीं पाठविलीं आहेत ( केसरी २५।११।०२. ) कांहीं भाग छापला आहे.

१० रामचंद्रबोवा रामदासीकृत—"साग्र भारताचें मराठी काव्य दीड लक्षांवर ओव्या असून तें रसाळ, भक्तियुक्त न्यायदृष्टांतांनीं पूर्ण आहे. भीष्मपर्व अ. ९० शके १६२७ आश्विन शु. ३, कर्णपर्व अ.५० शके १६२८ वैशाख शु. १४ रवौ; शांतिपर्व अ १४० शके १६२९ वैशाख शु. ३ बुधवारीं सर्वजित् संवत्सरीं पूर्ण." ( केसरी ता. ११।४।०३ महानुभाव यांचें पत्र ).

११ मोरोपंतकृत महाभारत ( सुप्रसिद्ध आहे ).

१२ उमरावतीस रा. खापर्डे यांजवळ एक रूपकात्मक वर्णिलेलें भारत

आहे तें आपण पाहिलें व त्याबद्दल रा. खापर्डे यांचें व आपलें भाषण झालें, असें एका आषाढींत ह. प. भिंगारकरबोवा यांनीं सांगितलें. होतें. कर्ता ' शिवकल्याण ' असावा.

१३ पैठणास जीवाशिवा यांनीं रचिलेलें एक भारत आहे म्हणून माझ्या ऐकण्यांत आलें. जीवा व शिवा हे दोघे भाऊ होते.

१४ मालुनाथकृत भारत. हा ग्रंथ पांडवप्रतापापेक्षां मोठा असून ह.प. भिंगारकरबोवांनीं पैठणास पाहिला होता.

१५ कृष्णदास मुद्गलकृतही एक भारत आहे असें ऐकण्यांत आहे.

१६ चंद्रात्मजरुद्रकृत उद्योगपर्व.

१७ मोरेश्वरकृत उद्योगपर्व.

१८ भैराळकृत विराटपर्व. इ० इ०

यावरून भारतावर १८–२० कवींनीं आपली वाणी खर्चिली हें स्पष्ट दिसतें.

हे इतके ग्रंथ आजवर कोणाही एका व्यक्तीच्या पाहण्यांत आलेले नाहींत. पण महाभारतावर २०।२५ कवींनीं—पूर्ण किंवा अपूर्ण ग्रंथ केले आणि तेही फार विस्तृतपणानें केले हें उघड आहे. या वरील भारतांशिवाय आणखीही कांहीं भारतग्रंथ कोठें कोठें सांदीकोपऱ्यांत अजून पडले असतील ! हे सारे भारतग्रंथ एकत्र वाचावयास मिळाले पाहिजेत, निदान संग्रहित तरी झाले पाहिजेत. या सर्व भारतग्रंथांत उत्कृष्टत्वामुळें सर्वश्रेष्ठ असें मुक्तेश्वरी भारतच होय, व याविषयीं विद्वानांचें मतैक्यही आहे.

---

## २ मुक्तेश्वरी भारताचा रचनाकाल.

३ ( १ ) आदिपर्व ( अ. १५ ) व सभापर्व ( अ. ८ ) यांत अनेक परकीय लोकांचा मुक्तेश्वरानें उल्लेख केला आहे. त्यांत ' क्रूर फिरंगी" ह्मणजे जुलूम करणारे पोर्च्युगीज लोक ' व ' रक्तरंगी इंग्रज लोक ' यांचाही त्यानें उल्लेख केला आहे. इंग्रजांना त्यानें ' जळतस्कर, मांसाशी, विघ्नकर्ते, दंडेल ' वगैरे विशेषणे लावलीं आहेत. इ. स. १६६० च्या सुमारास इंग्रज लोक १६३०।४० पेक्षां थोडा अधिक सभ्यपणा व माणुसकी दाखवूं लागले होते, यावरून वरील दंडेल वगैरे विशेषणें इंग्र-

जांना ज्या अर्थीं मुक्तेश्वरानें लाविलीं आहेत, त्या अर्थीं इ. स. १६६० च्या पूर्वीं त्यानें भारत रचिलें असावें.

( २ ) आदिपर्व अ. ३१ मध्यें मराठ्यांच्या युद्धपद्धतीचें वर्णन करितांना ते ' सूडसाधनीं विशाळ पैज ' मारणारे, ' सतेज करवाळांनीं ' लढणारे व ' खंडितांही न खंडले ' जाणारे आहेत म्हणून म्हटलें आहे शिवाजीनें १६६० च्या पुढें गलबतें, तोफा, घोडे, गड, वाघनखें, तलवारी, भाले, तिरकमठे या सर्वांचा उपयोग केला आहे. अफझुलखानाच्या वधप्रसंगीं मुक्तेश्वर असता तर त्यानें दिलें आहे यापेक्षां निराळें वर्णन दिलें असतें; कारण " त्यानें भरतखंड स्वदृष्टीनें पाहिलें असून निरनिराळे देश व परदेशांतील म्लेंच्छ लोक यांचीं वर्णनें, प्रसंगीं सहेतुक विशेषणांचा उपयोग करून देण्याइतकें त्याचें मन संस्कारक्षम होतें. "

( ३ ) मुक्तेश्वर जसा इंग्रज, पोर्च्युगीज, उजवेख, पठाण, डच वगैरे परकीयांचा उल्लेख करितो तसा तो फ्रेंच लोकांचा एकदांसुद्धां करीत नाहीं. फ्रेंचांची पहिली वखार इ. स. १६६८ मध्यें सुरतेस स्थापिली गेली. फ्रेंचांचा उल्लेख नसल्यामुळें मुक्तेश्वरी भारत ते इकडे येण्यापूर्वीं रचिलें गेलें असावें

( ४ ) रामदासांच्या पुढ्यांतल्या कवींचीं नांवें मुक्तेश्वरी भारतांत नाहींत ; तुकारामाचाही नामोल्लेख नाहीं ; फक्त ज्ञानेश्वर, एकनाथ व त्यांचे गुरु जनार्दनस्वामी यांचेच केवळ उल्लेख आहेत. तुकोबा इ० स० १६४९ सालीं स्वर्गस्थ झाले व त्यांची कीर्ति पैठणपर्यंत जाण्यापूर्वींच मुक्तेश्वर आटोपले होते.

या चार कारणांवरून मुक्तेश्वरी भारताचा काल इ. स. १६५० होय, असा रा. राजवाडे यांनीं निर्णय केला आहे, व तो बहुतांशीं योग्य आहे असें माझेंही मत आहे. या निर्णयाला इतक्या झडापटीही नको होत्या. एकनाथस्वामींची समाध व रामदास, तुकाराम, यांचे जन्म यांत १० वर्षांचें अंतर आहे. रामदासांच्या पुढ्यांतले कवि बहुशा रामदासांनंतर जन्मले. तेव्हां एकनाथांचा नातू—मुलीचा मुलगा—मुक्तेश्वर, कीं ज्यानें आपलें बाळपण नाथाच्या संगतींत व शिक्षणाखालीं घालविलें, तो रामदासादिकांपेक्षां वयानें वडील असून त्याची ग्रंथरचनाही त्यांच्याआधीं झाली असली

पाहिजे, इतकें अनुमान अगदीं उघड उघड कोणासही करितां येण्यासारखें आहे. एकनाथांच्या वृद्धपणीं कुमारावस्थेंत असणारा मुक्तेश्वर रामदासादिकांच्या कुमारावस्थेंत चांगला प्रौढ असून तेव्हांच त्यानें भारत केलें असलें पाहिजे. मुक्तेश्वरी भारताची रचना इ. स. १६४०–१६५० या काळांत झाली असली पाहिजे.

४ शिवाय, मुक्तेश्वराचा कालनिर्णय करतांना आणखी एका महत्त्वाच्या मुद्याकडे वाचकांचें लक्ष वेधणें अवश्य आहे. तो मुद्दा असा. **मुक्तेश्वराचें भारत आपला महाराष्ट्र स्वराज्योन्मुख झाला त्या वेळचें आहे, व त्या वेळीं महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांच्या हृदयांत ज्या उच्च मनोवृत्ति उचंबळत होत्या त्यांचें प्रतिबिंब त्याच्या भारतांत लख्ख पडलें आहे.** मुक्तेश्वरी भारताचें महत्त्व याच दृष्टीनें पाहिलें तरी अतिशय आहे. शिवाजी महाराजांच्या चळवळी पैठणपर्यंत मुक्तेश्वराच्या काळीं पोंचल्या नव्हत्या, असें रा. राजवाडे यांचें मत आहे ; पण त्या पोंचल्या नव्हत्या असें गृहीत धरलें, तरी इ. स. १६४०-५० च्या सुमारास महाराष्ट्रीयांच्या महत्त्वाकांक्षा काय होत्या हें मुक्तेश्वरीभारत काळजीपूर्वक वाचलें असतां कोणासही समजेल असें मला वाटतें. 'गोब्राह्मणप्रतिपालक' असा हिंदुराजा असावा ; त्याचा भरतखंडभर दरारा असावा ; 'म्लेंछलोकांना दंडून' त्यानें त्यांला आपलें मांडलिक करावे ; ' गोवधदेवब्राम्हणावज्ञा ' करणाऱ्यांना 'त्यानें शूळदंड' करावा ; ' ' दुर्गबळ राष्ट्रास फार ' असल्यामुळें त्यानें ' अमात्य, सुहृद, कोश, यांच्या साह्यानें किल्ले बांधावे '; ' झुंजार बळी' अशा समुदायांचे संघ करून त्यानें शत्रूवर कोसळावें ; शेतकीच्या सुधारणेसाठीं त्यानें ' तडाग, पाटस्थळें, कालवे, बांधावे; ' ' परद्वीपींच्या अमोल्य वस्ता । वणिक आणिती इच्छून अर्था । त्यांच्या पुरवूनि मनोरथा ' त्यांना चौगुणी लाभ देऊन संतुष्ट करून ( फ्रान्स, हॉलंड, पोर्च्युगाल इत्यादि देशांना ) आपली कीर्ति गाणारे करून परत पाठवावे; ' अंध मुके, पंगु, व्यंग ' यांचें ' पितयाप्रमाणें सांगोपांग पाळण ' करून त्यांच्यासाठीं शाळा स्थापाव्या; ' अग्नि, सर्प, चोर, व्याघ्र, । रोग, राक्षस कां परचक्र । यांपासून आपुलें राष्ट्र ' बलिष्ठपणानें त्यानें राखावें; अशा प्रकारच्या गुणांनीं युक्त असा महाराष्ट्राचा सार्वभौम राजा भरत-

खंडावर अंमल चालवणारा असावा, अशी जो शिवाजी महाराजांच्या जन्मापूर्वीपासून मराठ्यांची प्रबळ * इच्छा होती, तिचें हुबेहुब उत्कृष्ट प्रतिबिंब मुक्तेश्वरी भारतांत सर्वत्र पडलेलें दिसेल. ( मुख्यतः आदिपर्वांतलें दुष्यंतशकुंतलाख्यान व सभापर्वांतली नारदनीति पहा ). गोदावरीच्या कांठीं पैठणास भारत रचणाऱ्या मुक्तेश्वराला जसा मराठा राजा असावा असें वाटत होतें, तसाच सर्वगुणसंपन्न मराठी राजा त्याच वेळीं मुळामुठेच्या कांठीं नुक्ताच बालसूर्यासारखा उदय पावत होता व मुक्तेश्वरानें

महाराष्ट्र जें सर्व राष्ट्रांसि राजें ।
जयाच्या भयें व्यापिले देव लाजे ( रामायण, ४६९. )

असा प्रसिद्ध महाराष्ट्रदेशाबद्दल जो अभिमानोद्गार काढला आहे त्याची यथार्थता जगताच्या प्रत्ययाला आणून देण्याचे संकल्प करीत होता. आदिपर्व अ० ३१ मध्यें गौड, महाराष्ट्र, तैलंग, आंध्र व फिरंगी यांच्या युद्धाचे प्रकार स्वतंत्रपणें वर्णिले आहेत त्यांत " खेटक ( ढाल ) करवाळें ( तलवार ) सतेज सूड साधनीं विशाळ पैज । या नावें महाराष्ट्र झुंज । खंडितांहि व खंडवे ' ( ५४ ) अशी ओवी आहे ती मननार्ह आहे. मराठ्यांचा चिवटपणा व तेजस्विता अनादि आहे.

५ राष्ट्रीयत्वाची कल्पना आमच्या इकडील सर्व साधुकवींस होती यांत नवल नाहीं, पण मुक्तेश्वराच्या सर्व भारतांत ती जशी चमकते तशी समर्थांशिवाय दुसऱ्या कोणच्याही मराठी काव्यांत चमकत नाहीं. मुक्तेश्वराचे वर्णीत जें अद्भुत ओज व जी वीर-

* शिवरायाचा जन्मही होण्यापूर्वी एक पोर्च्युगीज प्रवासी दक्षिणेंत प्रवास करून परत स्वदेशीं गेला व तेथें त्यानें आपलें प्रवासवृत्त लिहिलें, तें कांहीं वर्षांपूर्वी माझ्या वाचण्यांत आलें होतें. त्यानें त्यांत स्पष्ट लिहिलें आहे कीं. " मीं तुंगभद्रे-पासून नर्मदेपर्यंत हिंडतांना सर्वत्र लोक वेदधर्मरक्षणासाठीं ईश्वर लौकर अवतार घेऊन येणार आहे, " असें ह्मणतांना ऐकिलें आहे ! गोब्राह्मणप्रतिपालक राजा अवतरणार अशी जी महाराष्ट्रीयांची दृढ श्रद्धा होती त्याचीच व्यक्तता मुक्तेश्वरी भारतांत झाली आहे व या कल्पनेला हा पोर्च्युगीज प्रवाशाचा स्वतंत्र पुरावा आहे. सर्व जनांच्या इच्छाशक्तीचाच परिणाम शिवरायाचा जन्म होय ! आज जसा प्रत्येक इंग्रज इंग्लंडचें वैभव चिंतितो तसें तेव्हां सर्व महाराष्ट्रीय भावी अभ्युदयाची चिंता करीत होते. मराठ्यांना या राष्ट्रीय ध्यानयोगाचें फळ लौकरच मिळालें.

रसाची दीप्ति इतक्या उत्तमत्वानें चमकतांना दिसते त्याचें कारण तरी हेंच कीं,त्याची कल्पना अति विशाळ होती. सत्कवीला लागणारे प्रतिभादि लोकोत्तर गुण त्यांत होते. सभोंवारच्या परिस्थितीकडे व समाजघटनेकडे राष्ट्रीय अभिमानानें पाहण्याचें सामर्थ्य त्यांत होतें. दहा वीस वर्षांनीं होणाऱ्या गोष्टी त्याच्या दिव्य प्रतिभेला दिसूं लागल्या होत्या! महाराष्ट्राला पडत असलेलीं स्वराज्याचीं स्वप्नें ह्यांच्या भारतांत प्रतिबिंबित झालेलीं आहेत. एकनाथाचें रक्त त्यांच्या अंगांत खेळत असल्यामुळें जाज्वल्य नीतिमत्ता व ईश्वरभक्ति हे गुण निसर्गतः त्याला प्राप्त झाले होते; अशा सर्वांगसुंदर कविश्रेष्ठ मुक्तेश्वराच्या तोलाचा दुसरा मराठी कवि म्हणजे मुक्तेश्वरच होय.

## ३ कालविपर्यासाचा दोष व तो कां झाला ?

६ मुक्तेश्वराची दृष्टि अशी राष्ट्रीय असल्यामुळें वर्तमानकालांतल्या गोष्टी भूतकाळच्या वर्णनांत सहजगत्या आल्या व त्यामुळें कांहीं ठिकाणीं कालविपर्यास झाला आहे. दुष्यंतानें चारी दिशांचे राजे जिंकून आपलें सार्वभौमत्व गाजविलें, असें सांगतांना ( आदि० अ०–१५):–

जावी, जंगी फिरंगी क्रूर, । नायी, इंग्रेज, मल्लोवार, ।
कावे, कावटे, कंकमखर । जळतस्कर मांशाशी ॥ ९ ॥
रूमशाम, खोरासान, । मुलतान, हबशान, अर्बस्तान, ।
उजबेख पठाण, तुर्कमान, । बदकशान, मेवात ॥ १० ॥

या सर्वांना त्यानें आपले मांडलिक केलें असें त्यानें म्हटलें आहे. जावी म्ह० जावा बेटांतून आलेले डच; फिरंगी म्ह० पोर्तुगीज, ( ह्यांचा क्रूरपणा तेव्हां सर्वांच्या अनुभवाचा होताच ), नायी ( ? ), मलबारांकडे कवचे लोक, इंग्रज, कावे म्ह० कांवे म्ह० खंबायतच्या आखातांतील लोक, खर कंकम म्ह० कोंकणांतील दुष्ट चांचे लोक, हे मांसाशी म्ह० मासे खाऊन राहणारे व जळतस्कर म्ह० समुद्रावर किंवा समुद्रकांठच्या लोकांना लुटून त्यावर उपजीविका करणारे ), रूमशाम म्ह० कॉन्स्टँटिनोपल, खोरासान, मुलतान, हबसान, अरबस्थान या देशांतले लोक;

उजवेख जातीचे पठाण, तुर्कमान म्ह० तुर्कीलोक व घोडे, अश्व, इ० जनावरांचे मुखवटे घालणारे तिबेटाकडील 'मानव आहार जयांचा' असले क्रूर मनुष्यभक्ष्यक लोक इतक्या विविध लोकांचा मुक्तेश्वरानें येथें उल्लेख केला आहे ! दुष्यंतराजानें 'याही देशीं आपुली आज्ञा । सत्ता नेमिली परमप्राज्ञा' असें वर्णन आहे. आतां ह्या नाना जाति व हे नानादेशीय लोक मुक्तेश्वराच्यावेळीं भरतखंडांत होते पण दुष्यंताच्यावेळीं नव्हते हें कांहीं इतिहासज्ञास सांगायला नको आहे! !म्हणून येथें कालविपर्यास झाला आहे. तथापि मुक्तेश्वराच्यावेळीं तरी कोणकोणते लोक भरतखंडांत वावरत होते व मुक्तेश्वर मूळ भारताची पोथी पुढें ठेवून त्याचा केवळ मराठी तर्जुमा करणारा भाषांतऱ्या कवि नव्हता तर सभोंवारच्या परिस्थितीकडे त्याचें बारकाईचें लक्ष होतें या गोष्टी येणेंकरून उघड होतात. 'म्लेंछांचिया महासनीं । संहारती पशूंच्या श्रेणी' ( सभा० ५-१३७ ) याप्रमाणें वर्णाश्रमबाह्य अशा म्लेंच्छांचें त्यानें वर्णन केलें आहे. 'एक फिरंगी रक्तवर्ण । खुरासनी पांडुरवर्ण । बर्बर जन्मले कृष्णवर्ण । स्थूलघ्राण लंबोष्ठ' ( आदि० अ० ४०-८५ ) याप्रमाणें रक्तवर्ण फिरंगी, पांडुरवर्ण खोरासानी, कृष्णवर्ण व 'स्थूलघ्राण लंबोष्ठ' असे नीग्रो यांचाही उल्लेख आला आहे. 'समुद्रवासीय म्लेंच्छजाती । नामें सांगतां नेणों किती ?' ( सभा० अ० ८-७० ) अशा अनेक परदेशस्थ जाति भरतखंडात पाहून मुक्तेश्वरास आचंबा वाटला आहे.

> जावी जंगी फिरंगी । इंग्रेज बहुधा रक्तरंगी ।
> मलेबार नौकामार्गी । विघ्नकर्ते दंडिले ॥ १२७ ॥
> पारसी भासीक ताम्रमुख । आरब हुरमुज काळमुख ।
> रूमशाम घोडमुख । नाट पाट पुलिंद ॥ १५६ ॥

याप्रमाणें सभापर्वात(अ० ८)राजसूययज्ञप्रसंगीं दिग्विजय करतांना पांडवांनीं 'समुद्रवासीय म्लेंच्छजाती' जिंकल्या त्यांतही जावाबेटांतले लोक फिरंगी, रक्तरंगी इंग्रज पुन्हा आणले आहेत; व पारसीक, आरब, रूमशाम यांना कारभार द्यायला लावून 'पांडवांनीं त्यांना आपले अंकित केलें' म्हणून म्हटलें आहे. ऋतुपूर्ण नळास ( वन० अ० ८ ) म्हणतोः—

तूं तंव विद्यासमुद्र जगतीं । निश्चयें मानिला माझ्या चित्तीं ।
मीही कुशल असें गणितीं । लीलावतीग्रंथज्ञ ।। १११ ।।

या प्रसंगींही लीलावतीग्रंथकर्ता भास्कराचार्य–जो अनेक शतकांनीं पुढें झाला–त्याच्या ग्रंथाचें नांव, भारतापूर्वीं होऊन गेलेल्या नळाच्या आख्यानांत आलें आहे ! हे सर्व कालविपर्यासाचे दोष होत. याला इंग्रजींत Anachronisms म्हणतात. 'मुक्तेश्वरानें सर्व भरतखंड स्वदृष्टीनें पाहिलें असून निरानिराळे देश व परदेशांतील म्लेच्छ लोक यांचीं वर्णनें,प्रसंगीं सहेतुक विशेषणांचा उपयोग करून देण्याइतकें त्याचें मन संस्कारक्षम होतें'यांत शंका नाहीं. शेक्स्पीअरच्या नाटकांतही कालविपर्यास अनेक ठिकाणीं झाला आहे. त्यानेंही पूर्वकालच्या गोष्टींवर नाटकें रचिलीं आहेत. तो मोठा शास्त्रज्ञ व पंडित होता, तसाच मुक्तेश्वरही होता. दोघेही बुद्धिवैभवानें सारखेच आहेत. मग दोघांच्याही ग्रंथांत कालविपर्यासाचा दोष कां येतो ? मला वाटतें, याचें एक उत्तर आहे; तें हें कीं, कवि विलक्षण प्रतिभावान् असला, पूर्वकाळच्या थोर पुरुषांच्या कृति वर्णन करितांना स्वकालीन लोकसुधारणेची त्याची उत्कंठा जागरूक असली, उज्ज्वल कल्पनाशक्तीमुळें पूर्वकालीन लोकांशीं, त्यांच्या परिस्थितीशीं, त्यांच्या आचारविचारांशीं पूर्णपणें त्याला तादात्म्य पावतां येत असलें कीं, कालविपर्यास हा दोष होणें अपरिहार्य आहे. मुक्तेश्वर किंवा शेक्स्पीअर यासारख्या विशालबुद्धीच्या ग्रंथकारांत, त्यांच्या तादात्म्यामुळें अपरिहार्य अशी जी गोष्ट, तिला दोष म्हणतां येईल काय ?

## ४ व्यासाची संगति सोडायची नाहीं.

७ मूळ संस्कृत महाभारत मुक्तेश्वरानें पुढें ठेवून आपलें महाभारत रचिलें. त्याच्या पूर्वीं झालेले भारतावरचे प्राकृत ग्रंथही त्यानें पाहिले होते व प्रसंगविशेषीं व्यास कांहीं सांगायला विसरले तेंही मुक्तेश्वरानें सांगितलें आहे.

( १ ) प्राकृत कवींचा वाग्जल्प । तैलकढईत पाहूनि रूप ।
फिरतां मत्स्य सकंप । वामनेत्रीं विंधिला ।। ७२ ।।

परी तें मूळभारतीं नाहीं । म्हणूनि असो न बोलों कांहीं ।
नळिकाछिद्रांतून पाहीं । यंत्र भेदोनि पाडिलें ॥ ७३ ॥
—आदिपर्व, अ. ४१.

( २ ) कथा बोलती ग्रंथांतरीं । संकेत दाविला श्रीमुरारी ।
खर्जूरीपर्ण धरूनि करीं । मध्यभागीं चिरियेलें ॥ ६० ॥
सव्य अपसव्य सांडितां करें । मग न जडतीच परस्परें ।
परी हें व्यासऋषीश्वरें । कथिलें नाहीं भारतीं ॥ ६१ ॥
—सभापर्व, अ० ७

( ३ ) बोल बोलती सर्वत्र । सूर्यें दीधलें थालीपत्र ।
परी तें व्यासाचें वक्त्र । वदलें नाहीं भारतीं ॥ ५८ ॥
—वनपर्व, अ० १.

या तीन उताऱ्यांवरून मुक्तेश्वराचे पूर्वींही महाभारतावर मराठी ग्रंथ कोणीं कोणीं केले होते, असें उघड होतें. नवीन उपलब्ध होणाऱ्या व ज्यांचा काल निश्चित करायचें कांहीं एक साधन नाहीं, अशा मराठी भारतग्रंथांच्या कालाचा विचार करितांना, मुक्तेश्वरानें ह्या उताऱ्यांतल्या कथाप्रसंगीं जें वर्णन केलें आहे तें त्या ग्रंथांत ताडून पाहिलें, म्हणजे, 'प्राकृत कवींचा वाग्जल्प,' 'कथा बोलती ग्रंथांतरीं' ह्यांत कोणत्या कवींवर मुक्तेश्वराचा कटाक्ष होता हें समजेल. व्यासाची संगति सोडूं नये व व्याससंगति सोडून चालणाऱ्या प्राकृत कवींचा आधार धरूं नये, असें मुक्तेश्वराचें व्रत आहे:—

सांडूनि व्यासाची संगती । चालों नये आणिके पंथीं ।
ऐसें जाणोनियां श्रोतीं । व्यर्थ विस्तार न मानावा ॥ २५२ ॥
—सभापर्व, अ० १२.

कथासंगतीकडे मुक्तेश्वराचें किती लक्ष होतें तें खालील ओवीवरून दिसतें.

सगुण सुभद्रा यादवी । द्वारके धाडिली स्नेहभावीं ।
सांगों विसरला व्यासकवी । परी म्यां स्मरण दीधलें ॥ १३० ॥
—सभापर्व, अ० १६.

वाढतांना द्रौपदीच्या कंचुकीचें बिरडें सुटलें व देवानें तिची लाज राखली ही गोष्ट मूळांत नसून आपल्या कवीनें भक्तिभावासाठीं ९० ओव्यांत

स्वतंत्रपणें सांगितली आहे. संस्कृत कवि व प्राकृत कवि किंवा प्राचीन कवि व अर्वाचीन कवि हा भेद काव्यांत काय कामाचा ? ' जीर्ण नूतन वाणी । वाग्देवीचा विलासु. !" कथाभागांत पदरचें वर्णन कां घातलें ?

जेणें वाढे उत्कट भक्ती । तो तो विशेष लिहिला ग्रंथीं ।
नावडे ते स्वहस्तीं । खोडोनि दूर करावें ।।१६५।। सभा० अ० ९

मुक्तेश्वराची ओवी खोडून दूर करणारा समर्थ व रसिक कोणी आढळेल, असें मला वाटत नाहीं. पंढरपुरीं साधुसंतांचे पाय आपल्या मस्तकावर पडावे, म्हणून नामदेवानें वाटेंतच समाध घेतली; पण समाधीवर धिटाईनें पाय देणारा संत आजवर कोणी झाला नाहीं ! ज्यूलियस सीझरनें आत्मचरित्र लिहून ठेवलें व हें टिप्पण केवळ भावी चरित्रकारांस उपयोगीं पडेल इतकीच याची मातब्बरी आहे असें त्यानें म्हटलें आहे; पण त्याचा आधार घेऊन त्यावर अधिक चित्तवेधक अशी सीझरचरित्राची इमारत उठवणारा चरित्रकार आजवर झाला नाहीं ! महापुरुषांचा विनय चित्त भुलवितो; असा मोह पाडणारा प्रसंग त्रिभुवनांत दुसरा सांपडणार नाहीं.

## ५ व्यासकृत भारत व मुक्तेश्वरी भारत.

८ आदिपर्वाच्या मंगलाचरणप्रसंगीं व्यासांना नमन करून मराठी भाषेची तरफदारी करितांना कवि म्हणतो:—

वेदशास्त्रस्मृतिपुराणें । नाना इतिहासव्याकरणें ।
गाळूनि विचाररसायणें । द्वैपायनें कुशलत्वें ॥ ८६ ॥
सुरस सुंदरी पवित्र सृष्टी । पक्वान्नें निपजवूनि पाठीं ।
संस्कृतशब्दसुवर्णताटीं । श्रेष्ठश्रेष्ठां वोगरिलीं ॥ ८७ ॥
तेंचि रसायण दुर्बळपणीं । महाराष्ट्र भाषा-रंभापणीं ।
वाढिलें, तरी भुकाळू जनीं । न सेविजे किमर्थ ? ॥ ८८ ॥

संस्कृत भाषेचें महत्व संभाळून प्राकृत भाषेंत ग्रंथरचना करणें त्याकाळीं अवश्य असल्यामुळें मुक्तेश्वरांनीं वरीलप्रमाणें समर्पक दृष्टांत योजिले आहेत. वेदशास्त्रपुराणांचें रहस्य महाभारतांत ग्रथित करून गीर्वाणभाषे-

ऱ्या सुवर्णताटांत थोरथोरांना ( संस्कृतज्ञांना ) जीं स्वादिष्ट पक्वान्नें व्यासांनीं वाढलीं तींच म्यां दुर्बळानें महाराष्ट्रभाषारूप केळीच्या पानांवर वाढलीं तर मुकाळु जनांनीं ( भारतकथाजिज्ञासूंनीं ) कां सेवूं नयेत ? अवश्य सेवावींत हा भाव. भाषाभेदानें अर्थहानि होते असें नाहीं. कविपंडित समर्थ होत—त्यांनीं सर्वज्ञतेच्या प्रकाशांत निर्गुण निर्विकार परब्रह्माचें कनककमळानें अर्चन करावें, पण ' भावार्थी मी दुर्बळ । धत्तूरपुष्प माझे बोल ' म्हणून काय शंकर माझा अव्हेर करील ? कधीं करणार नाहीं ! ' ईश्वरस्वरूपीं डोळस । त्यासी वर्णावर्णीं द्वेष ' उपजत नाहीं.

तेवीं अर्थीं घालितां दृष्टी । न म्हणे संस्कृत मराठी ।
रत्नकुंभीं कीं मृत्तिकाघटीं । गंगोदक सारिखें ॥ ९३ ॥ अ० १

मूळ भारतग्रंथच ' रससागर ' आहे, ' साहित्यरत्नाकर ' आहे, असें मूळभारताचें मुक्तेश्वरानें गौरव केलें आहे. ( आदि० १५ )

९ सभापर्वाच्या प्रारंभीं उपोद्घात फार चांगला केला आहे. 'कवळोनि अभिप्राय सर्व । मागां कथिलें आदिपर्व ' आतां सभापर्व ऐका. आदिपर्व सर्वोत्कृष्टच उतरलें आहे व त्याबद्दलचा आपला आत्मविश्वासही कवीनें येथ सूचित केला आहे. वेदाचा मथितार्थ जसा पुराणांनीं काढिला, तसा व्यासभारताचा मथितार्थ मी ' प्रांजळ टीकेनें व्यक्त ' केला आहे असें कवि ह्मणतो. राजांना वीररस; विप्रवर्यांना वेदसारांश, परमहंसांना तत्त्वार्थबोध, चतुरांना युक्तिबुद्धींचा सागर, विलासी जनांना शृंगार, शास्त्रीपंडितांना त्यांच्या त्यांच्या आवडीचे विषय याप्रमाणें ज्याला जें पाहिजे तें त्याला माझ्या ह्या ग्रंथांत मिळत असल्यामुळें ' महाराष्ट्रासी काव्यगुरु । हा गौरवु इये ग्रंथीं 'ह्म० मराठी भाषा बोलणारांस हा काव्यरूप ग्रंथ गुरूसारखा पूज्य वाटत आहे. पहाः—

पर्वतामाजी कनकमेरु । तडागामाजी क्षीरसागरु ।
महाराष्ट्रकाव्यासि गुरु । हा गौरवु इये ग्रंथीं ॥ १८ ॥
व्यासवचन इक्षुदंडु । गाळूनि सुरस सारांश गोडु ।
देशभाषा वळले लाडु । नौबदेचे आवडी ॥ १९ ॥
ते जैसे सुखीं न सेवणें । तैं आग्रहावांचून काय म्हणणें ॥

कळंकरेखेस्तव चांदणें । काय चकोरीं वाळिजे ?।। २० ।।
व्यासग्रंथगिरीचें सोनें । संस्कृत खोटिये गाळूनि मनें ।
देशभाषा घडिलें लेणें । साहित्यरत्नीं सुजडित ।। २१ ।।
तें लेववितां कर्णभूषण । कां हो परतें करावें कान ? ।
श्रोतेहो! तुम्ही विचक्षण । निर्मत्सर विचारा ।। २२ ।।

व्यासकृत मूळ भारत आहे संस्कृतभाषेत. संस्कृतकथानकांचा मधुररस काढून त्याची साखर बनवून मी देशभाषेत गोड लाडू बनविले आहेत व हें काम मी लौकिकार्थ किंवा धनार्थ केलें नसून ' आवडीनें ' केलें आहे. उंसाचीं कांडीं दातांनीं फोडतांना जे श्रम होतात किंवा तोंडें वांकडीं-तिकडीं करावीं लागतात तसे कष्ट येथें घ्यावयाला नकोत. आबालवृद्धांना हे गोड लाडू आयासावांचून खातां येतात. दुसरा सुंदर दृष्टांत ऐका. मूळ भारत हा एक महापर्वत आहे पण तो सोन्याचा पर्वत आहे. त्याचें लागेल तितकें सोनें घेऊन तें परिश्रमपूर्वक खोटींत घालून गाळून घेऊन व याप्रमाणें स्वच्छ व शुद्ध करून त्याचें मराठी भाषेत मी अलंकार घडविले आहेत व साहित्यशास्त्रांतील नानाविध सुंदर रत्नांत ते जडवून मराठी वाचकांस ते आयते अर्पण करीत आहें !! सभापर्वाच्या उपसंहारांत मुक्तेश्वरानें संस्कृतभाषेच्या कापसांतून हा मराठी ग्रंथपट मी तयार केला आहे व हा ' अतिथोर ग्रंथ ' झाला आहे असें म्हटलें आहे.

व्यास वाढितां जगातें । ग्रास लाधला जीर्णकवींतें ।
त्याचे मुखींचीं उच्छिष्ट शितें । म्यां दुर्बळें वेंचिलीं ।। १७५ ।।
तीं सेवोनियां पावलों तृप्ती । तेणें उद्गारली स्फूर्ति !
हे वल्गना संतांप्रती । नेणपणें करितसों ।। १७६ ।।
कितिएकांसी आग्रह मोठा । नातळो म्हणती कवि उच्छिष्टा ।
हा समर्थवाद योग्य श्रेष्ठां । ईश्वरकृपा म्हणोनि ! ।। १७७ ।।
एकएक अक्षराची भीक । जीर्ण कवींतें मागूनि देख ।
मी सर्वज्ञ कविनायक । ऐसें म्हणविलें लौकिकीं ।। १७९ ।।

—सभापर्व, अ. ५.

या ओव्या मनन करण्यासारख्या आहेत. मुक्तेश्वराला ' कोणापासून स्फूर्ति उद्गारली ' हें यावरून समजतें. मुक्तेश्वराचे वेळीं कोणी कोणी ह्मणत

"व्यासवाल्मीकि यांचीं काव्यें मूळ धरून ग्रंथ करणें हें कांहीं महाकवीचें लक्षण नव्हे; खऱ्या कवीनें स्वतंत्र काव्यरचनाच केली पाहिजे; उष्टया पत्रावळी गोळा करण्यांत पुरुषार्थ नाहीं" यास मुक्तेश्वरानें विनयानें उत्तर दिलें आहे:—"खरें आहे; पण हा समर्थवाद श्रेष्ठांसच योग्य आहे. ज्ञानेश्वरांसारखे ईश्वरकृपापात्र कवीश्वर अमृतानुभवासारखे स्वतंत्र ग्रंथ करितात, त्यांची योग्यता मी मिरवीत नाहीं. व्यासादिकांचीं उच्छिष्ट शितें वेंचणारा मी दुर्बळ कविकिंकर आहें! मला हेंच काव्य करणें मोठ्या साहसाचें काम वाटतें. जीर्ण कवींना एकेका अक्षराची भीक मला मागावी लागत आहे! अत्यंत परिश्रमानें जीर्ण कवींचे ग्रंथ मीं वाचले व एकेक शब्द मोत्याच्या दाण्यासारखा काळजीपूर्वक टिपून तो मीं आपल्या ग्रंथांत योग्य स्थळीं घालून संतांना अर्पण केला; व त्यांनीं संतुष्ट होऊन मला कवीश्वर म्हणून गौरविलें! दुसरें असें कीं, श्रीव्यासांनीं वेदशास्त्रस्मृतिपुराण, इतिहास वगैरे साऱ्या संस्कृत ग्रंथांचीं प्रमेयें श्रीभारतांत गोविलीं आहेत; तीं परमार्थाची भूक लागलेल्या प्राकृतजनांसाठीं मी मराठींत सांगत आहें. मग मुकाळूंनीं त्यांचा स्वीकार कां करूं नये? 'गंगोदक रत्नकुंभांत किंवा मृत्तिकाघटांत जसें सारखें,' तसा भारतेतिहासरस प्राशन करणें हें संस्कृताच्या द्वारें काय किंवा मराठीच्या द्वारें काय सारखेंच नव्हे काय? संतहो! अर्थाकडे दृष्टी द्या व माझें मराठी भारत ऐका, म्हणजे तुम्हांस कळेल कीं, अर्थ दोहींकडे सारखाच आहे. देशभाषासामान्य नव्हे. दुराग्रह सोडा व मराठी काव्य ऐका व वाचा, म्हणजे तुम्हांस कळेल कीं, 'देशभाषा परी भांडार। साहित्याचें जाणिजे!' मी उंसाचा रस काढून आयता पेला भरून तुमच्या हातीं देत आहें, मग तुम्हीं त्याचा स्वीकार न करणें योग्य होईल काय? सज्जन हो! लोक गंगेचें पाणी आवडीनें रामेश्वराला नेतात, त्याप्रमाणें वेदाब्धि मंथून व्यासानें अमृतोदक महाराष्ट्रशब्दांच्या कूपिका भरून माझ्या हातीं प्रसाद म्हणून तुम्हांकडे पाठविलें, आहे त्याचा प्रीतीनें स्वीकार करा!!" निर्मत्सर बुद्धीच्या संतांना हें मुक्तेश्वराचें म्हणणें पटलें व ते जेव्हां त्याच्या ओव्या श्रवण करूं लागले, तेव्हां त्यांना या रसाळ व अमृततुल्य मधुर ओव्या ऐकून परमानंद झाला.

## ६ मुक्तेश्वराचे श्रोते व त्याचा आत्मविश्वास.

१० पूर्वी मराठी ग्रंथांना त्यांच्या रचनाकाळींच श्रोते मिळत, म्हणजे कवींच्या मुखांतून जी वाणी निघे ती प्रथम सन्मुख बसलेल्या श्रेष्ठ श्रोत्यांना ऐकायला मिळे, व लेखक ती तेव्हांच लिहून घेत किंवा कवि इतका प्रतिमा-संपन्न व लोकप्रिय नसला तर तो आपले अध्याय एकांतांत लिहून नित्य श्रवणाला येणाऱ्या श्रोत्यांपुढें ते वाचून दाखवी. आजकाल ग्रंथकार व त्याचे वाचक यांचा जो संबंध आहे तो पूर्वी वक्ता व श्रोता यांचा असे. आज ग्रंथकार ग्रंथ लिहून छापून प्रसिद्ध करितो व वाचक तो ग्रंथ विकत घेऊन वाचतात, पण या योगें ग्रंथकार जिवंत असतांही त्याची व त्याच्या वाचकांची कधीं भेटीं गांठही पडत नाहीं ! पूर्वी ग्रंथकारांच्या मुखांतून ग्रंथ प्रकट होतांच श्रोत्यांच्या कानांवर पडत असे, यामुळें वक्ता व श्रोता यांच्या सन्मुखतेमुळें अर्थबोधाची व रसभोगाची प्रत्यक्षता अधिक अनुभवायला सांपडे. वक्ता श्रोत्यांना अतिशय मानी व श्रोत्यांना आजकालच्या वाचकांपेक्षां श्रवणसुखाचा लाभ प्रत्यक्ष व अधिक मिळे. श्रोते व वक्ते एकत्र मिळाले म्हणजे एकमेकांचे एकमेकांवर प्रेम जडतें व दाबही बसतो. आपल्याकडे प्राचीनकाळापासून 'वाचनाचें' महत्त्व नाहीं, तर 'श्रवणाचें' महत्त्व आहे. सांप्रत ग्रंथकाराची मूर्ति वाचकांपासून चोरलेली दूर राहूं शकते यामुळें त्याच्या गुणदोषांची प्रत्यक्ष माहिती त्याच्या वाचकांना असत नाहीं. पूर्वी कवि व वक्ते यांचे काम अधिक बिकट होतें व एका तऱ्हेनें अधिक लाभाचें होतें. वक्त्याला आपले आचारविचार अत्यंत शुद्ध ठेवावे लागत, त्यावर श्रोत्यांची नजर असे. भलत्या मनुष्याला वक्तृत्वाच्या पीठावर आरूढ होतां येत नसे. श्रोत्यांत सर्व प्रकारचे अधिकारी लोक असल्यामुळें वक्त्याला संभाळून बोलावें लागे. वक्ता अधिकारी असला तर श्रोत्यांकडून त्यास प्रोत्साहन मिळे व वक्ताश्रोता एकरूप झाले म्हणजे अपार रंग उधळे. वक्त्याला श्रोत्यांना अवधान द्या, कृपादृष्टि ठेवा, चुकलों तर सांगा, स्फूर्ति देऊन ग्रंथ तुम्हीच चालवा म्हणून वारंवार प्रार्थना करावी लागे. ज्ञानेश्वर वक्ते, निवृत्तिनाथ श्रोते व गीतेचा विषय अशा प्रसंगीं ब्रह्मानंदाच्या लहरी कोण उसळत असतील याची ज्ञात्यास कल्पनाच करावी (माझें श्रीज्ञानेश्वरचरित्र पहा. पृ. २१८ ते २२२). असो

बहुतेक मराठी ग्रंथ कवींनीं रचतांरचतांच श्रोत्यांना ऐकवले आहेत, यामुळें आपल्या ग्रंथांत श्रोत्यांची प्रार्थना त्यांनीं वारंवार केली आहे. मुक्तेश्वराचें भारतही त्यानें श्रोत्यांना रचनाकाळींच ऐकवलें आहे. मुक्तेश्वराला पैठणक्षेत्रांत श्रोते थोर अधिकाराचे मिळाले होते. नाथांच्या तोंडून ज्ञानेश्वरी, भागवत, भावार्थरामायण हे ग्रंथ ऐकलेले किंवा त्यांच्या तालमींत तयार झालेले श्रोते मुक्तेश्वरांपुढें बसले होते. त्यांच्यापुढें व्याख्यान करून वाहवा मिळवण्याचें काम सोपें नव्हतें. पण मुक्तेश्वराला त्याच्या श्रोत्यांनीं त्यावेळीं ' धन्य धन्य ' म्हटलें व पुढेंही महाराष्ट्रीय वाचक धन्य धन्यच म्हणत आहेत. रसिक व गुणग्राही श्रोत्यांपुढें वक्तृत्वाला तेज चढतें, प्रतिभेला नवानवा रंग चढत जातो. मुक्तेश्वराचा आत्मविश्वास श्रोत्यांच्या गुणग्राहीपणामुळें कसकसा वाढत चालला हें आपण पाहूं. श्रोते रसज्ञ, गुणज्ञ व अधिकारी आहेत व माझी वाणीही सरस, सालंकृत, गुरुकृपेच्या बळानें प्रभावशाली झालेली, प्रतिभासंपन्न आहे असें आनंदभरांत त्यानें अनेकवार उद्गार काढले आहेत. भारताच्या मंगलाचरणांत श्रोत्यांची प्रार्थना करितांना " माझें वक्तृत्व लोहासारखें हीन असलें तरी तुमच्या अवधानस्पर्शानें त्याचें अमोल कांचन होईल. हा सभासमुद्र माझ्यासमोर पसरला आहे. विद्वद्रत्नांचे पुंज, ज्ञानविज्ञानसंपन्न थोर पुरुष, तीर्थाप्रमाणें पवित्र, बोधचातुर्याचे प्रेरक असे तुम्ही श्रोते—मीं मनीं धरिलें आहे तें कृपा करून सिद्धि पाववा" असें त्यानें म्हटलें आहे. आदिपर्वांत पुढें अनेकवार श्रोत्यांची स्तुति व आत्मविश्वास प्रगट केला आहे. माझी ' नवरसरंगी ' म्ह० शृंगारवीरकरुणादि रसांत रंगलेली वाणी ' स्वानंदें गोंधळ खेळत ' आहे ( अ० ४ ). माझी वाणी ही महानदीसारखी धीरगंभीर असून तींत ' साहित्यमोतियांची भरणी ' आहे व ' ग्राहिक ' ( गुणज्ञ, ग्रहण करणारे ) श्रोते मला मिळाले आहेत ( अ० ६ ) मुक्तेश्वराची वाणी ही ' स्वर्लोककल्लोलिणी ' ( गंगा ) आहे ( अ० ७ ) व त्याची ' आरुषवाणी ' ऐकून श्रोते संतोषले आहेत ( अ० ९ व १६ ) ' हा देशभाषाप्रबंध कविपंडितांनीं ऐकून यांत न्यून असेल तें पूर्ण करावें ' ( अ० १७ ).

मुक्तेश्वराची वाग्वल्लरी । संत-अवधान सुरतरूवरी ।
वेष्टिली म्हणोनि फळसंभारीं । लवोनि आली रसरूपें ॥ (अ.१८)
चतुरचंचरीकांची मांदी । सेवितां मातली ब्रह्मानंदीं ।
' साधु साधु ' इहीं शब्दीं । गुंजारवें गर्जत ॥ ( अ० २० )

मुक्तेश्वराच्या भारताचे अध्यायामागें अध्याय—एकापेक्षां एक सरस निघूं लागले, तेव्हां या अध्यायरूप कमलांतील मधुरसपानानें चतुर श्रोते हेच कोणी भ्रमर हे तल्लीन होऊन ' वाहवा वाहवा! ' असा संतोषनिदर्शक गुंजारव करूं लागले. व्यासवाणी ही त्रैलोक्यपावनी गंगा आहे व मुक्तेश्वराची वाणी ही तिला मिळालेली एक क्षुद्रनदी आहे तथापि ' पवित्रता-सुस्वाद गुणीं । समान संतीं मानिजे ' ( अ० २२ ). आदिपर्व हें मानससरोवर असून त्यांत ' राजहंस श्रोते चतुर । प्रेमानंदें क्रीडती ' व ' शब्दार्थमोतियांचा चारा । चरोनि देती सुखढेंकरा ' ( अ० २५ ). श्रोते ' संत स्नेहभावें डुल्लती ' ( अ० २८ ).

भारतकथा अमृतवल्ली । श्रवणमंडपीं नवरसफुलीं ।
फुलोनि मोक्षसुखाचे फळीं । लवोनि आली फळभारें ॥

यामुळें ' मुक्तेश्वरगिरा सुखानुवादें । संतहृदया निघतीं दोंदें ' यांत कांहीं आश्चर्य नाहीं ( अ० २९ ).

भारतआळवाळें भरलीं । विश्वेश्वरकृपासलिलीं ।
मुक्तेश्वराची वाग्वल्ली । कथाफळीं सुफळित ॥ ( अ० ३० )

मुक्तेश्वराच्या मुखानें ' हें कथारूपें स्वर्गामृत । लोकोपकारा पातलें ' आहे ( अ० ३६ ). लीलाविश्वंभरस्वामीच्या प्रसादानें हा ओघ चालला आहे, एरव्हीं मी ' मुक्तेश्वर परमदीन । कीं हा किंकर संतांचा ' ( अ० ३७ ). व्यास महास्फूर्तीचे महाकवि, त्यांच्या वाणींचा मेघ जगत्कल्याणार्थ वर्षला. ' उन्मेषसुवातें झडाडे । व्यासघन वोळला विश्वचाडें ' हें खरें, पण श्रोत्यांनीं मात्र पृथ्वीएवढें विशाळ मन करून अवधान दिलें पाहिजे; भाग्यवंत देतातच. ' सखोलहृदयाचे सागर । भरोनि उचंबळती अपार ' ( अ० ३९ ). श्रोत्यांची अवधानकळा ही जशी वरमाय व ' वक्तृत्वकळा ही वधूमाय ' म्हणून मला श्रोत्याचें ' क्षणक्षणा पाय वंदावया । अधिकार आहे, ( अ० ४३ ). भारतकनकरस ( पारा—मर्क्यूरी ) हा व्यासांची

बुद्धिरूप जी मूष तिच्यांतून फुटला व ' उन्मेषवन्ही आगळा झाला ।
ब्रह्मांडआगटीं आंतौता '-तो दिव्य पारा गणेशमतीच्या सांडसानें ही धरिला जात नाहीं, मग माझ्यासारख्या पामराला कसा धरवेल ? तथापि श्रीगुरु सानुकूळ आहेत म्हणून बोलतों ( अ० ४५ ).

लीलाविश्वंभर दिनमणी ॥ स्पर्श करितां कृपाकिरणीं ।
चित्तसूर्यकांतपाषाणीं । उन्मेषानळ अवतरे ॥ ( अ० ४७ )

सभापर्वांतही कवीनें असे उद्गार अनेकवार काढले आहेत. भारतकथा संस्कृतांतून मराठींत येत असतां या संक्रमणप्रसंगीं ' मुक्तेश्वर निरूपणाचे श्रोत्यांना तिळगुळ वाटीत आहे ' (अ० ३). भारतकथा समुद्रप्राय अफाट आहे म्हणून त्या समुद्राचें मंथन करून मी श्रोत्यांस पीयूषपान करवीत आहे; मुक्तेश्वराची वाङ्मोहिनी ( विष्णूच्या मोहिनीअवताराप्रमाणें ) दुर्जनदैत्यांना ठकवून सज्जनदेवगणांच्या श्रेणीं(पंक्ति)ना अमृत वाढीत आहे ( अ० ४ ). श्रोत्यांना नम्र प्रार्थना आहे कीं :—

व्यासभारतकथेचा अर्थ । वांकडें जाईल जेथ ।
सज्जनीं लावोनियां हात । नीट केलें पाहिजे ॥

कां कीं संतानीं मला आपलें ह्मटलें आहे व ' आपुलें झालें तें झांकावें । लाज उघडं देखतां ' हा त्यांचा धर्मच आहे ( अ० ७ ).

लीलाविश्वंभरकिंकर । विनवी कवी मुक्तेश्वर ।
देशभाषा परी भांडार । साहित्याचें जाणिजे ॥ ( अ० ११ ).
लीलाविश्वंभर जलधर । वर्षतां सात्विकसरोवर ।
भरती तेथें मुक्तेश्वर । चातकप्राय निवतसे ॥ ( अ० १६ )

आतां वनपर्वांत पाहूं. ' जे बोलिलें व्यासदेवें । तेंचि महाराष्ट्र-वैभवें न ' पण दोहांत ' अर्थ मिरवे सारिखा ' म्हणून व्यासभारत व मुक्तेश्वरभारत यांत भेद मानूं नये असा ध्वनि आहे ( अ. १ ). मुक्तेश्वराला ' विचक्षण ' श्रोते आवडत असें दिसतें( अ. २ ). नलदमयंती-कथा रंगांत असतांना कवीनें कथेवर नर्मदानदीचें रूपक केलें आहे तें फार बहारीचें साधलें आहे:—

श्रीभारत वनपर्वणी । कथानर्मदा रसवाहिनी ।
ओवियारूपें पवित्रपुलिनीं । बाणलिंगें विचित्रें ॥२१७॥

तटीं श्रवणसुखाचे आर्तीं । तपश्चर्या करितां श्रोतीं ।
मुक्ति मुक्ति (लाभे) आयती।स्वधर्मपत्नीसारिखी॥२१८॥ (अ.७)

नर्मदाकांठच्या साधूंना, पतिव्रता स्त्रियांना व भारताच्या श्रोत्यांना ' मुक्ति मुक्ति ' आयती मिळते. प्रस्तुत रूपकांत नदी व काव्य, बाणलिंगें व ओव्या, तापसीजन व श्रोते यांचें साम्य सुरेख दाखविलें आहे. सरिता व कविता या दोन्ही ' रसवाहिनी ' आहेत, श्रवणसुखाच्या तन्मयतेनें श्रोत्यांना तपस्व्यांप्रमाणें भुक्तिमुक्तींचें भानच उरत नाहीं हा भाव येथें नामी व्यक्त झाला आहे.

मुक्तेश्वराचा वाग्विलास । देशभाषा परि संतोष ।
मानूनियां साक्षीलागीं व्यास । उभा असे जवळिके ॥ ( अ.१० )

व्यासांच्या भारताशीं कवीची किती तन्मयता होत असे हें यावरून ध्यानांत येईल. मूळ ग्रंथकाराशीं समरसता झाली कीं ग्रंथकार जवळ उभा आहेच हीच प्रतीति स्वानुभवीयांशिवाय इतरांस सहसा येणार नाहीं. ' मुक्तेश्वराचें चित्तसुमन । संतचरणीं सर्वदा ' ( अ.११ ) ह्या विनम्रभावामुळें निरुपचार आनंदांत सज्जनाचें चित्त डोलत असतें. आपल्या श्रोत्यांविषयीं संतपणाची भावना वक्त्याला नेहमीं स्फूर्तिप्रद होत असते, म्हणून ' स्नेहाच्या हातानें अवधानाची भिक्षा ' मुक्तेश्वरानें त्यांजपाशीं मागितली आहे ( अ.१३ ).

मुक्तेश्वराचीं सुढाळ वचनें । परमार्थचंपकांचीं सुमनें ।
तेथें अभक्तचंचरीकांचीं मनें । योग्य न होती परिमळा ॥ (अ. १६)

चंचरीक म्ह० भ्रमर. भ्रमर गुणज्ञ खरा, पण चांफ्याचा गंध त्याला आवडत नाहीं म्हणून तो त्याजवळ जात नाहीं; त्याप्रमाणें मुक्तेश्वराचीं सुंदर वचनें हीं परमार्थाच्या परिमळानें दरवळलीं आहेत म्हणून तीं भाविकांना जशीं प्रिय होतील तशी अभाविकांना प्रिय होणार नाहींत. कवीला हें भय वाटत होतें खरें पण मुक्तेश्वराची कविता इतकी सर्वांगसुंदर झाली आहे कीं ती भाविकांना तशीच अभाविकांनाही प्रिय झाली आहे. इतकें खरें कीं मुक्तेश्वराच्या काव्याचा रसास्वाद ह्म० परिमळ पुरा उपभोगण्यास भक्तभाविक हेच ज्यास्त अधिकारी आहेत. ज्ञानेश्वरांनीं आपल्या ग्रंथाविषयीं जें शेवटीं म्हटलें आहे कीं (ज्ञाने०अ०१८ओ०१७५०)

या ग्रंथाविषयीं अंतरंग पुरुषच अधिकारी आहेत व ' येर लोक वाक्चातुर्यें होईल सुखिया ' म्ह० पंडित, शास्त्री, रसिक, चिकित्सक, शोधक वगैरे लोक वाक्चातुर्यावरच डोलत राहतील तें पुष्कळ अंशानें मुक्तेश्वराच्या किंबहुना बहुतेक प्राचीन संतकवींच्या ग्रंथासंबंधानेंही म्हणतां येणार आहे. मुक्तेश्वराच्या कवितेवर मोरोपंतासारखे प्रेमळ भक्त व जुन्या हरिदासांसारखे भाविक लोक जसे झुलत असत, तसेच अर्वाचीन विद्वानांतही कृष्णशास्त्री चिपळूणकर व भावे, वामनरावजी ओक व हरिभाऊ आपटे, भिडे, आंजगावकर, राजवाडे इ० नानापरीचे लोक आपापल्या दृष्टीनें जरी फिदा झालेले दिसले तरी त्याच्या कवितेचा परिमळ म्ह० रसास्वाद पूर्णपणें भक्तभाविकानांच मिळणार आहे. हें माझें म्हणणें कदाचित् कोणास नीट समजणार नाहीं किंवा रुचणार नाहीं,तथापि पूर्वपरंपरेत मुरलेल्या भाविकांस तें पटेल यांत संशय नाहीं. वनपर्वाच्या समाप्तीची ओवी:—

लीलाविश्वंभरगुरुचरणीं । पुष्पांजलि वचनसुमनीं ।
मुक्तेश्वरें अर्पूनि मनीं । कृतकृत्यता मानिली ॥

विराटपर्वाचा उपोद्घात फार सुंदर आहे. ' जो श्रेष्ठ बोलिजे श्रेष्ठीं ' म्ह० वेदांनीं व महात्म्यांनीं ज्याला सर्वश्रेष्ठ म्हटलें आहे:—

तया आदिपुरुषा स्वामी । लीलाविश्वंभर गुरुनामी ।
नमस्कारोनि मनोधर्मीं । सावध म्हणे श्रोतिया ॥ ३ ॥

तीन पर्वें झाल्यावर सृष्टिनियमाप्रमाणें मुक्तेश्वराच्या ग्रंथाचेही दूषक किंवा निंदक थोडे तरी निघाल्याचें दिसतें ! बहुतेकांस त्याचा ग्रंथ अत्यंत प्रिय झाला होता यांत नवल नाहीं. दूषकांचे त्यानें दोन वर्ग केले आहेत. एक परोत्कर्षासहिष्णु किंवा मत्सरी लोक, हे बहुधा बरोबरीच्या विद्वानांतच सांपडतात ! दुसरे अज्ञान लोक.' बोद्धारो मत्सरग्रस्ताः ' याप्रमाणें जाणते मत्सरी असतात व ' अबोधोपहताश्चान्ये ' म्ह० सामान्यजनांना कळतच नाहीं हा बाणभट्टाचा कटु अनुभव होता.' प्रायःसमानविद्याः परस्परयशःपुरोभागाः' या कालिदासोक्तीप्रमाणें बरोबरीचे विद्वान् लोक एकमेकांना खालीं ओढण्याचा बहुशः प्रयत्न करितात. सारश, निर्मत्सर, प्रेमळ, व भाविक असा जो मधला वर्ग तो मात्र नेहमीं गुणग्राही असतो व त्याच्या प्रोत्साहनानें कवींच्या वक्तृत्वाला स्फूर्ति येत असते. नाना अर्थामृताचे

मोक्के, प्रसंगीं वक्तयाचे वक्ते, स्फूर्तिकिरणांचे दिनकर इ० प्रकारें समर्थांनीं यांचें वर्णन केलें आहे ( दासबोध द. १ स. ६ ) असो. मूळपदावर येऊं. विश्वंभरप्रसादानें प्रगट होणाऱ्या या प्रासादिक ग्रंथसदनांत दूषण-श्वान शिरणें शक्य नाहीं,तथापि क्वचित् शिरलेंच तर तें मत्सर किंवा अज्ञान यामुळें पिसें बनलेलें श्वानच शिरेल; पण गुणज्ञांचें या ग्रंथावर परमप्रेम आहे असें मुक्तेश्वर म्हणतात:—

स्तंभ टेकों न शके गगनीं । ठाव न काढवे समुद्रजीवनीं ।
विश्वंभराचे ग्रंथसदनीं । दूषणश्वान रिघेना ॥ ५ ॥
मूढ अल्पकें बोले वचनें । तें मत्सरें अथवा नेणतपणें ।
गुणग्राहीक जीवें प्राणें । प्रेम करिती या ग्रंथा ॥ ६ ॥

कवि म्हणतो कीं माझ्या बहुगुणी मधुर वचनांवर, जशा राजहंसांच्या मोत्यांवर, त्याप्रमाणें उड्या पडत आहेत:—

मुक्तेश्वराचीं गुणसुढाळें । वचनशुक्तिकामुक्ताफळें ।
सज्जन राजहंसपाळें । भाग्यागळें सेविती ॥ ( अ० १ )
मुक्तेश्वर कवींची वाणी । नवरसरसें सुगरिणी ।
तृप्त करी सुखभोजनीं । श्रवणद्वारें संतांतें ॥ ( अ० २ )
मुक्तेश्वराची सुवाणी । पुष्पलतिका कांचनसुमनीं ।
लीलाविश्वंभरगुरुचरणीं । अर्पूनि तर्पी श्रोतया ॥ ( अ० ३ )
मुक्तेश्वराच्या कवित्वप्रबंधें । श्रोतयां श्रवणीं निघती दोंदें ।
लीलाविश्वंभरप्रसादें । मुक्तता होय श्रोतयां ॥ ( अ० ४ )

हीं सर्व रूपकें फार गोड आहेत व त्यावरून मुक्तेश्वराला त्याच्या भाग्यानें निर्मत्सर, गुणज्ञ व सज्जन श्रोते मिळाले होते असें वाटतें. आपली वाणी ही मोत्यांची रास व श्रोते हे राजहंस, आपली वाणी ही नवरसपदार्थ तयार करणारी सुगरणबाई व श्रोते हे रसज्ञ जेवणारे, आपली वाणी ही विश्वंभराच्या चरणांवर अर्पिलेली कांचनसुमनांची अंजुळी इ० प्रकारें आपल्या वाणीचें व रसज्ञ श्रोत्यांच्या श्रवणसुखाचें कवीनें हें रसभरित वर्णन केलेलें पाहून त्याच्या श्रोतृगणांत समाविष्ट होण्याचा लोभ कुणाला वाटणार नाहीं ? मूळ भारतग्रंथच मूळ-

कांड्यापासून शेवटच्या वाढ्याच्या कांड्यापर्यंत सारखा रसानें भरलेला अठराकांडी इक्षुदंड !

भारत इक्षुदंड सुरस । मूळवाढियां सारिखा रस ।
अठरा कांडोरी गुणविशेष । गोडियेचा आगळा ॥ १७८ ॥

चार कांड्यांचा रस काढून श्रोत्यांना चाखविला,पुढच्यांचा काढणार आहे!

तो सुस्वाद चाखतां मनें । प्रेम उपजे जीवेंप्राणें ।
नूतन पद्मिणी अंगने । कामिक लोभे ज्यापरी ॥ २८० ॥

विश्वंभराच्या वरानें माझ्या या ग्रंथाला महाराष्ट्रग्रंथांचे पंक्तीस गौरवाचें स्थान मिळालें आहे:—

महाराष्ट्र काव्यांचिये पंक्ती । गुरुत्वगौरव इये ग्रंथीं ।
ऐसा विश्वंभर श्रीमूर्ती । वरद वदे सुवाचा ॥ ( अ० ८ )

आतां सौप्तिकपर्वाकडे वळून हा मुद्दा संपवूं. आरंभींच ' भारतकथाक्षीरनिधी । श्रवणें निवारे सर्वव्याधी ' याप्रमाणें भारतकथेचें वर्णन करून सोज्वळ अशीं विद्वद्रत्नें श्रवणार्थ पातलीं असतां कैवल्यनिधान प्राप्त होतें याप्रमाणें श्रोत्यांचें गौरव केलें आहे, आणि कवीला तसा अनुभवही आला आहे—

त्यांचिया पदरजतीर्थीं । मानस पावलें ज्ञानस्फूर्ति ।
कवित्वसाहित्यीं रूढली मती । कवित्वरचना यापरी ॥ ३ ॥

शंकरकृपेनें उपमन्यूला जसा क्षीरार्णव मिळाला त्याप्रमाणें, कवि म्हणतो, मला व्यासांच्या कृपादृष्टीनें भारतसृष्टि निर्माण करण्याचा अधिकार मिळाला आहे, श्रोत्यांनीं भ्रमरसम कथासुमनीं खुशाल रमावें ( अ० १). श्रोते स्वत: 'गुणरत्नखाणी' आहेत म्हणून ' गुणग्राहक ' आहेत, त्यांनीं माझ्या ग्रंथाचें परीक्षण करून ' स्नेहहस्तकीं दीनातें दान द्यावें' म्ह० प्रेमाच्या हातावर घेऊन प्रोत्साहनरूप दान द्यावें ( अ. २ ). उपसंहाराच्या ४ थ्या अध्यायांत ' पुढें स्त्रीपर्वाची स्थिती । कर्णनेत्रीं विलोका ' असें म्हटलें आहे, यावरून यापुढील पर्व लिहिण्याचें कवीच्या मनांत होतें खास. विराटपर्वाच्या शेवटींही पुढील उद्योगपर्वाचा असाच प्रस्ताव आहे. यावरून असें मनांत येतें कीं, सौप्तिक पर्वाच्या मागवीं व पुढचीं हीं पर्वे मुक्तेश्वरानें लिहिलीं असलीं पाहिजेत पण तीं महाराष्ट्रवाचकांस

मिळणार कधीं हें मात्र सांगवत नाहीं. हीं पांचच पर्वे पाहून मुक्तेश्वरी भारत संपूर्ण मिळावें याबद्दल परमावधीची उत्कंठा होते, पण हा सुयोग केव्हां येणार तें एक विश्वंभर जाणे ! भारतश्रवणानें शारीरिक व मानसिक व्याधि नष्ट होतातः—

ग्रंथश्रवणाच्या औषधी । त्रास मानोनि संतापव्याधी ।
जाती, ऐसें व्यासवैद्यीं । प्रमाण स्थापोनि रूढविलें ।। अ. ४

## ७ आख्यानोपाख्यानें.

११ कोणी कशाही तऱ्हेनें भारतीकथा गाइली तथापि व्यासकृत महाभारताचा आधार घेऊनच त्याला आपलें चातुर्य त्यावर दाखवावें लागतें. व्यास, वाल्मिकि आणि शुक यांचे जे मूळग्रंथ भारत, रामायण व भागवत या तीन मुख्य ग्रंथांचे आधार घेऊनच संस्कृत व प्राकृत कवींनीं आपापल्या काव्यांची रचना केली आहे. मराठी, हिंदी, गुजराथी, बंगाली, व द्रविडी भाषांतलें वाङ्मय पाहिलें तरी सर्वांना मूळ आधार वरील तीन महाग्रंथाचाच आहे. जगांत नवीन कांहीं होत नसल्यामुळें त्याच त्या गोष्टी, त्याच त्या कल्पना, तेच ते दृष्टांत, तेच ते सिद्धांत पुनःपुन्हां सांगितले जातात, तथापि वर्णनप्रकारांत कवीची काव्यशक्ति प्रगट होत असते— ' तथापि नव्यं भवति काव्यं ग्रथनकौशलात् '. शकुंतलेची गोष्ट भारतांत आहे व कालिदासानें ती भारतावरूनच घेतली आहे तथापि ' अभिज्ञानशाकुंतलांत ' अव्वल दर्जाचें काव्य आहे. ज्ञानेश्वरांनीं मूळ गीतेवरच भाष्य केलें आहे तथापि ज्ञानेश्वरींत पहिल्या प्रतीचें काव्य आहे. तुळसीदासांनीं रामायणकथा वाल्मिकीपासूनच घेतली आहे तरी तुळसीदासांच्या रामायणांत अनुपम माधुर्य आहे. कथा व कल्पना जुन्या असल्या तथापि त्यांकडे सत्कवि आपल्या प्रतिभासंपन्न दृष्टीनें पाहत असल्यामुळें त्याच कथाकल्पनांत नवजीवन त्याला घालतां येतें. काव्य ग्रंथांत नाहीं, काव्य बाह्यसृष्टींत नाहीं, काव्य कवीच्या अंतरांत आहे. कवि शब्दसृष्टीचे ईश्वर असतात, धणी असतात—नौकर नसतात. कविप्रतिमा हें काव्याचें बीज आहे. प्रतिमा जितकी उज्ज्वल, अंतः-

करण जितकें संस्कारक्षम, कल्पनाशक्ति जितकी विशाळ तितकें काव्य हृदयंगम वठतें. भारतावर २०।२५ मराठी कवींनीं पद्यरचना केली असली तर सर्वांत काव्यगुण प्रगट झाले आहेत असें नाहीं. मुक्तेश्वरी भारतांत जितकें अव्वल दर्ज्याचें काव्य आहे तितकें दुसऱ्या कोणत्याहि प्राकृत भारतांत तें नाहीं. श्रीधरांनीं तर सर्वस्वी मुक्तेश्वराचेंच अनुसरण केलें आहे. मोरोपंती भारत मात्र मुक्तेश्वरी भारताशीं तोल घेण्यासारखें आहे. मीं पूर्वीं मोरोपंताच्या चरित्रांत (पृ० ३८१–३८४) म्हटलें आहे: "कवित्वाच्या दृष्टीनें मुक्तेश्वराची बरोबरी कोणी करूं शकत नाहीं. मुक्तेश्वराच्या वाणींत लोकोत्तर प्रसाद, दिव्य ओजस्विता व सृष्टि-सौंदर्याची अनुपम शोभा दृष्टीस पडतात. मुक्तेश्वरानें प्रबळ मनोवृत्तींच्या प्रचंड प्रवाहाबरोबर भारती आख्यानांची महानदी 'खळखळाट वाहविली' आहे; पंतांनीं दुतर्फा मनोहर घाट बांधून व जागोजाग उपवनांचे रम्य देखावे निर्माण करून त्या महानदीचा ओघ दोन्ही पात्रांमधून अचूक सोडून दिला आहे!! मुक्तेश्वराची कविता एखाद्या खेडवळ पण कुलीन देशस्थ ब्राह्मणाच्या मुलीसारखी साधीभोळी, काळीसांवळी, पण ठसठसीत, मोकळ्या मनाची व सशक्त अशी आहे; व मोरोपंताची कविता ही सुस्वरूप, टापटिपीची, व सुगरण अशा नगरवासी कऱ्हाड्याच्या मुलीसारखी आहे! दोन्ही संपन्न, शुचि व ईश्वरपरायण आहेत. पहिली आपल्या सहजलीलांनीं वाटेल त्या रसिकाला भुलविते. दुसरीला भुलणारा सुविद्य, रसज्ञ, नागरिकच पाहिजे! पहिलीच्या अंगावरचीं वस्त्रें उंची आहेत पण तीं कशींबशीं घेतलीं आहेत. दुसरीच्या वस्त्राभरणांत नीटनेटकेपणा विशेष आहे. पहिली आपल्या काळ्याभोर पाणीदार डोळ्यांनीं व सहजलीलांनीं मोहील, दुसरी आपल्या नानाविध चेष्टांनीं जिंकील. पहिलीची धिटाई, व दुसरीची मर्यादशीलता, पहिलीचें अकृत्रिम हास्य व दुसरीचें मंदस्मित, पहिलीचें सहजप्रेक्षण व दुसरीचें कटाक्षक्षेप, पहिलीचा दांडगेपणा व दुसरीचा सभ्यपणा दोन्हीहि आपापल्या परीनें मनमोहकच आहेत!! तथापि मुक्तेश्वरी भारती व मोरोपंती भारती यांचा विचार करितां 'दूरीकृताः खलु गुणैरुद्यानलता वनलताभिः' या दुष्यन्ताच्या उक्तीचें स्मरण होतें!" हें माझें मत कायम आहे. मुक्तेश्वर व मोरोपंत

दोघेहि महापंडित होते, तथापि त्यांच्या परिस्थितींत व स्वभावांत जो फरक होता तो त्यांच्या काव्यांत उतरला आहे. नाथांच्या तालमींत तयार झालेला मुक्तेश्वर सर्व प्रकारच्या लोकांत मिसळत असे, अनेक सुंदर स्थळें त्यानें पाहिलीं होतीं, अनेक प्रसंग अनुभवले होते, यामुळें लोकभाषेंत त्यानें आपलें भारत लिहिलें आहे. त्याची भाषा शुद्ध मराठी आहे. मुक्तेश्वराची भाषा जितकी अस्सल मराठी आहे तितकी अस्सल मराठी मोरोपंताची नाहीं. मोरोपंत बारामतीस राममंदिराच्या एका खोलींत ग्रंथांच्या संगतींत एकलकोंडेपणानें बसून आपली कविता लिहीत, यामुळें त्यांचें भारत विद्वानांना मोह पाडण्यासारखें वठलें आहे, पण मुक्तेश्वर हा सर्व प्रकारच्या लोकांत नेहमीं मिसळणारा असल्यामुळें त्याच्या भारतांत तत्कालीन समाजस्थितीचें प्रतिबिंब पडलेलें आहे. सृष्टींचीं रम्य वर्णनें तर मुक्तेश्वराचींच पहावींत. कुस्त्यांचें वर्णन मुक्तेश्वर आखाड्यांत उतरल्याप्रमाणें करितो, बहुशा त्याला तरुण वयांत कुस्त्या खेळण्याचा अभ्यास असावा. हुबेहुब वर्णन हें अनुभवाशिवाय कवीलाहि करितां येणें शक्य नाहीं. गृहस्थाश्रमाचे अनुभव व मुलांमुलींच्या संगतीचा आनंद मोरोपंत ज्यास्त बहारीनें वर्णितात. ते गृहस्थाश्रमी कवि आहेत. द्रौपदीवस्त्रहरणप्रसंगीं किती प्रकारचीं; कशा जातीचीं व कोणकोणत्या प्रांतांतलीं वस्त्रें निघालीं हा तपशील मोरोपंताला देतां येत नाहीं, तो मुक्तेश्वराच्या भारतांत पाहून घ्यावा. तपशील सहजासहजीं मुखांतून प्रगट व्हायला मनुष्याचा संचार व अनुभव मोठा असावा लागतो. भोजन-प्रसंगाचें वर्णन निघालें असतां त्यावेळीं महाराष्ट्रसमाजांत रूढ असलेलीं पक्वान्नें, भाज्या, चटण्या वगैरे सर्व प्रकार पाकशास्त्रज्ञालाहि उपयोगीं पडेल अशा तपशीलानें मुक्तेश्वर बोलून जातो, दुसऱ्या कोणाला तें साधायचें नाहीं. या बाबतींत मुक्तेश्वराची बरोबरी रामदास मात्र करि-तात. लोकसमुदायांत मिसळल्यामुळें लोकांच्या रीति, स्वभाव, परिस्थिति, प्रसंग सर्व पुन्हां लोकभाषेत लीलेनें प्रगट करण्याचें सामर्थ्य मुक्तेश्वरा-प्रमाणें फक्त रामदासांत दृष्टीस पडतें. त्यांनीं ३ ऱ्या दशकांत रोगांचीं नांवें दिलीं आहेत तीं उत्तम वैद्यालाही एकदम आठवणार नाहींत! राजनीतीचीं तत्त्वें सांगायचा उत्कृष्ट प्रसंग सभापर्वांत आला असतांना

मोरोपंत तो प्रसंग अजीबात टाळतो; मुक्तेश्वरानें तो नारदनीतीचा प्रसंग मूळाहूनहि सरस वर्णिला आहे. मोरोपंताचें लक्ष घरांत फार, मुक्तेश्वराचें बाहेरच्या ईशसृष्टींत अधिक. कोमल मनोवृत्ति उदात्त स्वरूपांत वर्णन करणें हा मोरोपंताचा मुख्य गुण. असो. दोघेहि कवि थोर आहेत, तथापि कवित्वदृष्टीनें मुक्तेश्वर अतुल आहे. त्याच्या कवित्वाचे प्रकार त्याच्या भारताचें विहंगमदृष्टीनें अवलोकन करून आपण आतां पाहूं.

१२ महाभारतांत आख्यानोपाख्यानें बहुत आहेत. भारतांतील सर्वच कथा मराठी कवींनीं वर्णिल्या आहेत असें नाहीं, तथापि मुख्य मुख्य कथा त्यांनीं सोडल्या नाहींत. मुक्तेश्वरी भारतांत उत्कृष्ट आख्यानें बहारीनें वर्णिलेले मुख्य प्रसंग कोणते आहेत तें थोडक्यांत सांगतों:—

१ समुद्रमंथनाची कथा ( आदि० अ० ४ )
२ जरत्कारूची गोष्ट व आस्तिकजन्म ( आदि० अ० ९ )
३ दुष्यंतशकुंतलाख्यान ( आदि० अ० १५।१६ )
४ ययातिआख्यान ( आदि० अ० १९ )
५ पांडवधनुर्वेदपठण व विद्यापरीक्षा ( आदि० अ० ३०।३१ )
६ कणिकनीति ( आदि० अ० ३४ )
७ मंदपालचरित्र ( आदि० अ० ५० )
८ नारदनीति ( सभा० अ० ३ )
९ जरासंधाख्यान ( सभा० अ० ६।७ )
१० व्यासबोध व पांडवनाशाचा विचार ( सभा० अ० १२ )
११ द्रौपदीवस्त्रहरण ( सभा० अ० १५ )
१२ नलदमयंतीआख्यान ( वन० अ० ६।७।८ )
१३ दुर्वासकृत पांडवछल ( वन० अ० १२ )
१४ सावित्रीआख्यान ( वन० अ० १६ )
१५ विराटनगरींतले गोग्रहण ( विराट ५।६ )

हीं पंधरा प्रकरणेंही वाचायची ज्यांना सवड नसेल त्यांनीं निदान दुष्यन्तशकुंतलाख्यान, नलदमयंतिआख्यान व सावित्रीआख्यान हीं तीन आख्यानें व जरासंधवध, वस्त्रहरण व नारदनीति हीं तीन प्रकरणें मिळून सहा प्रकरणें तरी मुक्तेश्वराच्या वाणीनें ऐकल्यावांचून राहूं नये अशी माझी

प्रेमाग्रहाची विनंति आहे. सर्व आख्यानोपाख्यानें मूळभारत पुढें ठेवून वाचण्यांत विशेष मौज आहे, तेणेंकरून मुक्तेश्वराचें रचनाचातुर्य अधिक चांगल्या रीतीनें निदर्शनास येतें. 'नवरसांची मंदाकिनी दुःखदारिद्र्यपरिहारिणी, कवींची कुलस्वामिणी' अशा श्रीशारदादेवीचा मुक्तेश्वरावर वरदहस्त आहे अशी वाचकांची खात्री होईल. त्याची वाणी प्रासादिक आहे, सहजसुंदर आहे. तिच्यांत विलक्षण मोहनी आहे. कृत्रिमतेचा तिला गंधही नाहीं. कवित्व आणि विद्वत्त्व दोन्ही एकरूप झालेलीं येथें दिसतात. संस्कृत आणि मराठी या दोन्ही भाषांवर कवीचें दांडगें प्रभुत्व होतें. याची साक्ष पदोपदीं पटते. त्याच्या वाणीचा प्रवाह गंगाप्रवाहाप्रमाणें रमणीय व प्रसन्न आहे. त्याचें वक्तृत्व अस्खलित, मोहक असून वर्णनशैली रम्य व उदात्त आहे. त्या त्या प्रसंगांचीं चित्रें रेखीव ठसठसीत असल्यामुळें ते ते प्रसंग आपल्यासमोर घडल्यासारखा मनोभ्रम होतो. असो. आपणांस येथें भारताची समग्रकथा मुक्तेश्वराच्या तोंडून ऐकावयाची नाहीं. तर मुक्तेश्वराच्या कवित्वगुणांचा परिचय करून घ्यायचा आहे. ही गुरुप्रसादाची वाणी आहे श्रीगुरूंनीं माझ्या नांवानें ही कथा मुद्रांकित केली आहे; पण स्फूर्ति त्यांनी दिली आहे:—

त्या कारुण्यवसंतवातें । मूढमानस—शुष्कलते ।
स्फूर्तीचे पल्लव फुटले, तेथें। कवित्व फळे फळभारें ।। १—१—४२

कवीच्या आख्यानवर्णनाची शैली दुष्यन्तशकुंतलाख्यान ह्या एकाच आख्यानावरून ध्यानांत येणार आहे.

## ८ दुष्यन्तशकुंतलाख्यान.

१३ दुष्यन्तशकुंतलाख्यान पाहिलें तरी मुक्तेश्वराच्या कवित्वाची ओळख उत्तमप्रकारें होणार आहे. मूळ भारतांतलें आख्यान, कालिदासाचें शाकुंतल नाटक व मोरोपंतश्रीधरादि कवींनीं वर्णिलेली हीच कथा याच्या दोन अध्यायांशीं ताडून पाहावी म्हणजे मुक्तेश्वराचें वैशिष्टय कोठें आहे तें समजून येईल. महाभारताच्या आदिपर्वांत अध्याय ६८ ते ७४ पर्यंत हें आख्यान वर्णिलें आहे. मूळ भारती कथेची प्रौढी, गांभीर्य व

सरलता कांहीं अलौकिकच आहे. कालिदासानें नाटकाच्या चित्तवेधक उठावाला उचित असे १।२ महत्त्वाचे फेरफार केले असून अत्यंत रम्य चित्रपट उभा केला आहे. औचित्य, सारल्य, प्रसाद या गुणांमुळें कालिदासाचें शाकुंतल नाटक परम रमणीय झालें आहे. मुक्तेश्वरानें मूळ कथेला यत्किंचित् न दुखवतां आपल्या स्फूर्तिबळानें रमणीयत्व आणलें आहे. श्रीधरानें अधिक सोपी भाषा योजून मुक्तेश्वरी कथेचाच बहुधा अनुवाद केला आहे ( पांडवप्रताप अ० ३।४ ) व मोरोपंतानें अल्पाक्षर-रमणीय अशा तऱ्हेनें सरळ कथाच सांगितली आहे. मुक्तेश्वराची प्रतिमा कवित्वशक्ति व वर्णनशैली मोरोपंतांत नाहीं, व श्रीधरांतही नाहीं, व दुसऱ्या कोणत्याही मराठी कवींत नाहीं. मूळ कथेचाच रंग खुलवून वाच-कांस एकरसांत तन्मय करायचें हें कालिदासाचें चातुर्य विलक्षण आहे, त-थापि मूळ कथेची प्रौढी कायम ठेवण्याचे कामीं मुक्तेश्वर अतुल आहे. असो. दुष्यंताचें वर्णन कसें ठसठसित आहे पहा:—

कौरववंशीं विख्यातकीर्ती । दुष्यन्तनामा गुणैकमूर्ति ।
श्रेष्ठ भूपाळ चक्रवर्ती ! वीर्यें शौर्यें आगळा ॥ ४ ॥
प्राची प्रतीची दक्षिणोत्तर । चारी दिशा चतुःसमुद्र ।
आक्रमूनि मही महेंद्र । सुरेंद्र तैसा भूलोकीं ॥ ५ ॥
रोग दारिद्य कीं बंधन । दुःख दुर्भिक्ष अकाळ मरण ।
सर्प वृश्चिक तस्कर जाण । दुष्यन्तराज्यीं असेना ॥ २३ ॥
विष्णुसमान सत्ताबळ । प्रतापें जैसा सूर्य तेजाळ ।
धरातुल्य सहनशीळ ! अक्षोभ जैसा सागरु ॥ २७ ॥
निपुण शस्त्रास्त्रप्रहरणीं । आरूढों जाणे सर्व वहनीं ।
ऐसा भूपाळचूडामणी । दुष्यंतराजा भूलोकीं ॥ २९ ॥

दुष्यंतराजा मृगयेस निघाला तेव्हां नगरींतल्या लोकांनीं त्याचा केलेला सत्कार, वनश्रीची अनुपम शोभा, मृगयाविनोद, कण्वाश्रम इ० प्रकारांचें मुक्तेश्वरानें केलेलें वर्णन बहारीचें आहे.

सप्तसमुद्रींचे लोट । धरामंडळीं एकवट ।
तैसे सेनेचे संघाट । घेवुनी वना चालिला ॥ ३० ॥
अनेक शस्त्रधरांचीं वृंदें । अनेक वाद्यें अनेक शब्दें ।

गर्जती तेणें विचित्रनादें । नादावलें अंबर ।। ३२ ।।
कनकरत्नीं निरवाळलीं । गोपुरें गगन भेदीत गेलीं ।
तेथें वळघोनि पाहों ठेलीं । कामिनीवृंदें आवडी ।। ३३ ।।
आशीर्वाद घेऊनि द्विजा । मागा परतवी सहित प्रजा ।
जनप्रदेश लंघोनि पैजा । महावनीं प्रवेशे ।। ४९ ।।
देखे महाप्रचंड गिरी । विशाळ पर्वताचिया दरीं ।
जळें तुंबिलीं सरितांतरीं । समुद्रतुल्य अगाध ।। ५० ।।
तेथें आम्र निचोल[1] बेल । कवंठ कदंब मधु[2] पिंपळ ।
सिरस पलाश विशाळ । न्यग्रोध[3]वृक्ष वाढिन्नले ।। ५१ ।।
ताळ हिंताळ[4] सरस शाळे[5] । मंदार कांचन तमाळ निर्मळ ।
पिचुमंद[6] देवदार निर्मळ । अर्जुनवृक्ष अपार ।। ५२ ।।
अर्क निवडुंग सदा मस्त । मोडितां दिसे दुग्ध स्रवत ।
जैसे प्रपंची विवेकरहित । सुख बोलती विषयांतें ।। ५३ ।।
बदरी श्लेष्मांतकी[7] आळसी । शाल्मली[8] करवंदी जांबुळी ।
चारी भल्लातकी[9] गुग्गुळी । शमी वेरुकळी चिंचाणिका ।। ५६ ।
ऐसिया वृक्षांचीं अचाट । डांगें लागली घनदाट ।
माजी निर्झरोदकाचे पाट । सैरावैरा धांवती ! ।। ५७ ।।
मस्तकें उचलोनि दिनकर । छाये राखिला अंधकार ।
माजी श्वापदगणांचे भार । सुरवाडले सुखवस्ती ।। ५८ ।।
हरिण करी सिंह शार्दूळ । चिते चितळे तरस तरळ ।
रिक्ष रोही गव मासाळ । अरण्य सारें माजलें ।। ५९ ।।
नूतनभाग्य पातलियां नष्टा । श्रीमदें वांकुल्या दाविती श्रेष्ठा ।
तैसे दांत विचकूनि चेष्टा । मर्कट करिती बहुवृक्षीं ! ।। ६१ ।
प्रस्थानभेरीच्या गर्जनें । वीर मुखींचीं आस्फोटणें ।
तडक यंत्रें फुटती तेणें । महावनचर बुजाले ।। ६२ ।।
कोंडले देखोनि चौफेरीं । मुसांडी मारिती राजमारीं ।

१ जलवेतस. २ मोहाचें वृक्ष. ३. वडाचीं झाडें. ४ कांटेताड. ५ सायल्याचें झाड. ६ कडुनिंब. पिचुमंद याच्या योगानें पिचुनामक कुष्टरोग जातो. ७ भोंकरी. ८ देवकापसी, सावरी शाल्मली ( सं ) ९ भिलवा बिबवा.

ते वधिजेती शस्त्रशरीं । महावीरीं असंख्य ।। ६३ ।।
पारधी खेळावयाची हांव । श्वापदें साधावयाचे भाव ।
सरक चौकाचें लाघव । लपणींछपणीं धांवती ।। ६४ ।।
उडती बुडती आणि लपती । गौरीगायक दीपकादीती ।
घंटापारधी खेळणें रातीं । कोपों नेदी रक्षणें ।। ६६ ।।
ऐसा करीत विद्याकुशळ । रायें खेळोनि मृगयाखेळ ।
फळें आणोनि महासुकाळ । सकळदळ तोषविलें ।। ६७ ।।
अवलोकुनियां तें वन । तंव देखिलें कश्यपारण्य ।
राजा करी पुढारें गमन । सिद्धींसाधकीं वसविलें ।। ६८ ।।
तेथें चंदन पारिजात । देवदार केतकी सुपुष्पित ।
तुळशीवनें सुशोभित । दवनें वनें घमघमती ।। ६९ ।।
सरितासरोवरींचीं जळें । पद्मगंधें सुशीतळें ।
रातोत्पळें नीळोत्पळें । सीतोत्पळे कनकाचीं ।। ७० ।।
तेथें राजहंस कारंडक । चकोर सारस चक्रवाक ।
करींद्र करिणी करिशावक । स्वेच्छा करिती जलक्रीडा ।। ७१ ।।
मयूर गर्जती किंकारें । कोकिळा गर्जती पंचमस्वरें ।
षट्पद बोलती झुंकारें । आणि कपोतें कूजती ।। ७२ ।।
सदासर्वदा पुष्पीं फळीं । वृक्ष लवती भूमंडळीं ।
जैसा कुळीन ऐश्वर्यकाळीं । विनयें भजे सर्वांतें ।। ७३ ।।
नदीमालिनी पवित्रजीवनी । वाहे जैसी देवतटिनी ।
तरंगालिंगें सुफेनसुमनीं । सुपूजित शोभती ।। ७४ ।।

हें वर्णन मूळाशीं ताडून पाहिलें असतां मुक्तेश्वराचें वर्णनच अधिक उठावदार दिसतें. मालिनीच्या तटावर व कण्वाश्रमांत कित्येक तपस्वी, ज्ञानी व कर्मनिष्ठ पुरुष होते, त्यांच्या विविधमतांचें मुक्तेश्वरी वर्णन ( अ. १५ ओवी ७६ ते ९३ ) मूळभारतांत नाहीं. या वर्णनावरून मुक्तेश्वराची विद्वत्ताही दांडगी होती असें स्पष्ट दिसतें. दुष्यंतानें सकळांस पूज्यभावानें वंदिले व आपण कण्वाश्रमाकडे वळला. कण्वाच्या पर्णकुटींत ‘ रूपयौवनचातुर्यभरिता । लावण्यकलिका साजिरी ’ अशी शकुंतला होती:—

कनकलतिका सौदामिनी । कीं चंद्रकळा तनुधारिणी ।
सुवर्णकेतकीपत्रवर्णी । सुगंधखाणी हरिणाक्षी ।। ९८ ।।

पुढील गोष्ट सर्वांस माहीत आहे. दुष्यंत व शकुंतला यांच्या भाषणांत मूळकथेंत संभावितपणाचा पडदा आहे तो कालिदासाप्रमाणें मुक्तेश्वरानें जरा बाजूला सारून सभ्य शृंगाररसाचा उठाव केला आहे. पुढे गांधर्व-विवाहोत्तर दुष्यंत स्वनगराकडे गेला. इकडे शकुंतलेस सर्वदमन ( पुढें भरत ) नामक सूर्यासारखा दैदीप्यमान् मुलगा झाला. कांहीं काळ लोटल्यावर ' नारीणां चिरवासोहि बांधवेषु न रोचते । कीर्तिचारित्र्य-धर्मघ्नस्तस्मान्नय तमाचिरम् ' असें कण्व महर्षीनीं आपल्या शिष्यास सांगून पुत्रासह शकुंतलेस दुष्यंताकडे पाठविलें. वरील मूळ श्लोकाचें तात्पर्य 'सती-मपिज्ञातिकुलैकसंश्रयां जनोऽन्यथा भर्तृमतीं विशंकते ' (अभि. शाकुं. ५—१७ ) या श्लोकांत कालिदासानें सांगितलें आहे. मुक्तेश्वर म्हणतो:—

सुंदर प्रौढ समर्थ वनिता । चिरकाळ पितृगृहीं वसतां ।
लोकनिंदेचा अवचिता । पाषाण पडे मस्तकीं ।। १६—९२ ।।

याचें अधिक स्पष्टीकरण मुक्तेश्वरानें पुढील १० ओव्यांत केलें असून कुळवती कन्येला कोणत्या आचरणानें दूषण लागतें हें फार बहारीनें सांगितलें आहे. ' स्वयें नर्तन गायन । गीतनृत्य अवलोकन । शृंगारकाम-शास्त्रश्रवण । हें कुलक्षण कुलवंते ।। परघर अटण । परघर वस्ती—' ' उपे-क्षूनि पतिईश्वरू । आणिक महानुभाव करी गुरु ' या प्रकारचाही कवीनें येथें व अन्यत्रहि निषेध केला आहे. याच प्रसंगीं मोरोपंतानें ' जा पति-गृहासि, शोभे स्त्रीजन पतिच्याचि राहिला भुवनीं ' एवढाच साधा उद्गार कण्वाच्या तोंडीं घातला आहे. श्रीधरानें मात्र—

वनिता सुंदर तरुण । पितृगृहीं वसतां अनुदिन ।
लोकनिंदेचे वाग्बाण । हृदयीं पूर्ण खोंचती ।। १४ ।।

याप्रमाणें मुक्तेश्वरी ओवीचें रूपांतर करून पुढें मात्र ( पांडवप्रताप अ० ४ ओवी २० ते ४० ) स्त्रियांची अप्रासंगिक निंदा केली आहे. पुरुष स्त्रि-यांना भुलतात व स्वकर्तव्यापासून च्युत होतात या सबबीवर स्त्रियांची निंदा करणें अत्यंत गैर आहे. निंदाच करणें तर पुरुष व स्त्रिया या दोघांची केली पाहिजे, नाहीं तर कोणाचीच करितां उपयोगी नाहीं. समर्थांनीं

म्हटल्याप्रमाणे 'पुरुषास पाहिजे स्त्री । स्त्रीस पाहिजे पुरुष' असा सृष्टींत प्रकार आहे म्हणून मुक्तेश्वरानें रसिकपणानें 'हा शब्द ठेवणें कवणासी ? । काय कीजे ? वस्तूचि तैशी । ब्रह्मयानें निर्मिली जगासी । भ्रमावया भ्रमयंत्र' (१०३) असें म्हटलें आहे. भ्रम उभयत्र सारखाच आहे! वैराग्य व्हावें म्हणून हवी तर साधकानें विषयांची निंदा खुशाल करावी, विषयांच्या ठिकाणीं दोषदर्शन हें ज्ञानाचें लक्षण गीतेंत भगवंतांनीं सांगितलें आहे, पण म्हणून दोषांचा आगर केवळ स्त्रीवर्ग आहे असें म्हणणें हें अनुचित आहे. मुक्तेश्वरानें स्त्रीवर्गाविषयीं अनुचित उद्गार काढले नाहींत. सर्वदमनाला घेऊन शकुंतला दुष्यंताकडे आली, तेव्हां अनेक कटु वचनें बोलून त्यानें तिचा अव्हेर केला. शकुंतलाही संतप्त होऊन पतीवर उसळली. त्याप्रसंगीं त्याचा झालेला वाद मूळ भारतांत बहारीनें वर्णिला आहे. ( अ० ७४ पहा. ) तो समग्र येथें देण्याचा मोह विस्तारभयास्तव मी आवरीत आहे ! कालिदासानें पांचव्या अंकांत सुललित वाणीनें दुष्यंताच्या ठायीं कोमल भावना आरोपून युक्तीनें तो प्रसंग साधून नेला आहे. तथापि आर्यस्त्रीकुलभूषण शकुंतलेच्या शास्त्रशुद्ध भाषणाचें गांभीर्य व तेजस्विता मूळांतच पाहिली पाहिजे. सर्व कवींत येथें मुक्तेश्वर मात्र मूळाच्या बरोबरीनें येतो.

" सत्यप्रतिज्ञा नरेंद्रोत्तमा ! । आठवोनियां आपुल्या नेमा ।
यौवराज्यीं भरतनामा । पुत्र आपुला अभिषेकीं " ।। ११३ ।।
ऐकोनि शकुंतलेचें वचन । केल्या कर्माची आठवण ।
मनें जाणतांही आपण । झाला नेणता ते काळीं ।। ११५ ।।
म्हणे " तूं कैची दुष्ट तापसी ? । कोण ? कोठील ? कोणे देशीं ? ।
कोणे काळीं एकांतवासीं । संग जाला मी नेणें ! ।। ११८ ।।
पाहतां साक्षीस न मिळे कांहीं । मज अणुमात्र ठाउकें नाहीं ।
आतां आलेनि पंथें जाईं । शीघ्र येथूनि निर्लज्जे ! " ।। १२२ ।।
ऐसें बोलतां मेदिनीपाळा । क्रोधें संतप्त शकुंतला ।
जेवीं प्रळयाग्नीच्या ज्वाळा । स्पर्शों धांवतां गगनातें ।। १२७ ।।
आरक्तता लेवूनि नयनें । अंजन क्षाळिलें अश्रुजीवनें ।
अधर स्फुरती, जेंवी पवनें । पद्मपत्रें थरकती ।। १२८ ।।

म्हणे " धन्य या पुरुषोत्तमा ! । उत्तम ऐसेंचि रक्षिती नेमा ।
कर्मसाक्षी अंतरात्मा । तृप्त झाला या वचनीं ! ॥ १२९ ।
ईश्वर आणि जोडिलें पुण्य । स्मरोनि, बोले यथार्थवचन ।
माझी साक्षी तुझेंचि मन । तुझे अंतरीं देताहे ॥ १३२ ॥
यथार्थ जाणतां अंतःकरणीं । अन्यथा प्रतिपादी जो वचनीं ।
तेणें कोणती पापकरणी । केली नाहीं सांग पा ! ॥ १३३ ॥
आदित्य वन्ही चंद्र पवन । आकाश पृथ्वी आणि जीवन ।
हृदय यम हे नव जाण । वृत्त जाणती नराचें ॥ १३७ ॥
उभयसंध्या दिवसरजनी । धर्मस्वरूप अंतःकरणीं ।
शुभाशुभ राहटे प्राणी । तितकें दृष्टी देखती ॥ १३८ ॥
' वेव्हार न साधे साक्षीवीण ' । ऐसे बोलती जन अज्ञान ।
साक्षी परमात्मा आपण । सत्याकडे निर्धारें ॥ १४० ॥
सकळ ऐश्वर्य घेऊनि भेटी । पद्मा पातल्या पायें लोटी ।
तो सभाग्य कीं अभाग्य सृष्टीं । काय लागे सांगणें? ॥ १५१ ॥

दुष्यंतानें शकुंतलेच्या आईबापांची निंदा केली तेव्हां ती नागिणी-सारखी खवळली:—

मंत्रबीजाक्षरांच्या ओळी । अबद्ध जपतां भद्रकाळी ।
क्षोभे, तैसी क्रोधानळीं । अंगार टाकी शब्दाचे ॥ १८१ ॥
पवित्र विश्वामित्रबाळा । शकुंतळा अळिकुंतळा ।
म्हणे " कुंतळमंडळपाळा । तूंचि अविचारें जल्पसी ॥ १८२ ॥
सर्षपप्राय पराचे दोष । पर्वतप्राय करी अधम पुरुष ।
आपुलीं दुष्कर्में अशेष । मेरुतुल्य गणीना ॥ १८३ ॥
मेनका त्रिदशपंक्तिमान्य । चतुर्दशलोकीं तिचें गमन ।
मी ही जाण तिजसमान । देवतादेही दिव्य स्त्री ॥ १८४ ॥
अपरसृष्टीचा परमेष्ठी । गाधिज निंदिसी दोषदृष्टी ।
हें ऐकोनि काय श्रेष्ठी । श्रेष्ठ तूतें म्हणतील ? ॥ १८७ ॥
कुरूप न पाहे आरसीं वदन । तोंवरी वाहे रूपाभिमान ।
देखिल्या म्हणे अपर जन । रूपें विशेष मजहुनी ॥ १९० ॥
रूपें विरूप कोणा न मानी । पवित्र दोष न देखे नयनीं ।

सदोषिया निर्दोष कोणी । भुवनत्रयीं दिसेना ॥ १९१ ॥
शुभाशुभ श्रवणीं सुरस । सज्जना गुण दुर्जना दोष ।
जैसे क्षीरविभागी राजहंस । पुरीषभाग वायसां ॥ १९२ ॥
नरसिंहा ! सोडोनि कपट । मांडिये बैसवी कुमार श्रेष्ठ ।
सत्य स्वधर्म करी प्रगट । वडिल वृद्धांदेखतां ॥ २०५ ॥
अश्वमेधशतांचें पुण्य । एकीकडे सत्य वचन ।
तुळितां सत्य आगळें जाण । मेरुसर्षपदृष्टांतें ॥ २०८ ॥
कोटिपुण्यें जोडिलीं यत्नीं । तीं जळतीं एकें असत्यवचनीं ।
जैसी पावकस्फुलिंगकणी । नाशी कर्पूरगिरीतें ॥ २१० ॥
सत्यापरता नाहीं धर्म । सत्य तेंचि परब्रह्म ।
सत्यापाशीं पुरुषोत्तम । सर्वकाळ तिष्ठत ॥ २११ ॥
सत्यें नेमिला न चले नेम । त्यासी वोळगे मोक्षधाम ।
घोरसंसारभयाचें नाम । स्पर्शों न शके कल्पांतीं ॥ २१२ ॥
असत्य तेंचि पै पातक । असत्य तेंचि महानरक ।
असत्याचेनि संगें दुःख । अनंतजन्मीं भोगिती ॥ २१३ ॥

या तेजस्वी सत्यवाणीच्या पुण्याईनेंच आकाशवाणी तात्काळ झाली ती सर्व सभेनें ऐकिली व दुष्यंतानें स्त्री व पुत्र यांचा अंगीकार केला. 'सत्य प्रगट करावया साचारें । वाक्य बोललों लोकाचारें । तें तूं न मानूनियां चतुरे ! क्षमा करणें मजलागीं ' याप्रमाणें त्यानें नंतर शकुंतलेची क्षमा मागितली. हा सर्व कथाभाग मुक्तेश्वरानें अगदीं मूळाबरहुकूम मराठींत उतरला आहे. शकुंतलेच्या भाषणांतील:–

अर्धं भार्या मनुष्यस्य भार्या श्रेष्ठतमः सखा ।
भार्या मूलं त्रिवर्गस्य भार्या मूलं तरिष्यतः ॥ ७४–४१ ॥

---

१ सत्याची थोरवी मुक्तेश्वर अन्यत्रही [ वन० अ० ४ ] वर्णितोः–
भारतादिकीं पुण्यश्लोकीं । राज्य त्यजूनि राहिले जपीं ॥
सत्यचि एक जोडिलें लोकीं ॥ म्हणोनि झाली पुराणें ॥ १३ ॥
सत्यचि एक महाबळ ॥ ज्यांचा निश्चयो अढळ ॥
ते पावतीं कैवल्य फळ ॥ पृथ्वीतळ तें किती ? ॥ १४ ॥

येथून पुढें भार्येची यथार्थ योग्यता व कर्तव्य वर्णन करणारे जे सुंदर दहा श्लोक मूळांत आहेत ते मुक्तेश्वरानें तरी गाळले नसते तर बरें होतें.

## ९ आणखी थोडीं आख्यानें.

१४ मुक्तेश्वरी भारततरंगिणींत जलक्रीडा करितांना सहजासहजीं जीं कमळें हातीं लागतील त्यांपैकीं आणखी कांहीं कमळांचा वास घेत पुढें जाऊं:–

दैत्यगुरु जो शुक्राचार्य त्यापाशीं अमृतसंजीवनी विद्या होती, ती शिकण्यासाठीं देवांचा राजा जो इंद्र यानें गुरुसुत कच यास पाठविलें. पाठवितांना इंद्र म्हणाला. ( अ० १७ )—

यत्न करितां न मिळे सृष्टीं । ते वस्तु असे शत्रूचे गांठीं ।
नीच सेवक होइजे निकटीं । हितस्वार्थीकारणें ॥ ३३ ॥
लोकलाज आणि अभिमान । सांडोनि आपुलें थोरपण ।
कार्य साधिती विचक्षण । गृहा जाऊनि शत्रूच्या ॥ ३२ ॥
भक्तीनें तोषे अंतःकरणीं । तैसी करावी महाकरणी ।
साधूनि विद्या संजीवनी । वंद्य होई विबुधांतें ॥ ३५ ॥
शीळ दाक्षिण्य माधुर्य वचनीं । आचारवंतें अवक्र गुणीं ।
आराधितां देवयानी । संजीवनीफळ लाभे ॥ ३६ ॥

परदेशीं किंवा परक्यांपाशीं जाऊन कांहीं अमोल विद्या शिकून येणारास वरील उपदेश मोलाचा वाटेल, मात्र त्यानें तिकडील देवयानींच्या प्रेमपाशांत अडकून न पडण्याइतकी तशीच सावधानता ठेवली पाहिजे !

शुक्राचार्य मद्यपानाची बंदी करितात:—

आजिपासोनि सुरापान । जो कोणी करील ब्राह्मण ।
तो ये लोकीं निंद्य जाण । नरकवास परलोकीं ॥ १२७ ॥

ब्राह्मणांस काय पण सर्वांसच मद्यपान त्याज्य आहे:–

तेचि मर्यादा लोकीं तिहीं । अद्यापि चालतसे पाहीं ।
हरिहराची प्राप्ती नाहीं । भंगावया शुक्राज्ञा ॥ १२९ ॥
याची प्रचीती रोकडी जाणा । झांकोनि करितां मद्यपाना ।
ठाउकें होतां सर्वजनां । वाळींत पडे सर्वस्वें ॥ १३० ॥

मुक्तेश्वराच्या वेळीं थोडे लोक तरी 'झांकोनि' मद्यपान करणारे होतेच ! पण तेव्हां सामाजिक बहिष्कार जोराचा व तापदायक असे, वाळींत पडण्याइतकी दुर्धर शिक्षा कोणतीच नव्हती. शाक्तादि पंथांत मद्यपानाचा चोरून व्यवहार होत असे, त्याला उद्देशून वरील वर्णन असावें.

शर्मिष्ठेला एकांतांत पाहून ययाति राजा भुलला व तीहि दीर्घकालीन प्रेमानें त्याला अनुसरली. तिच्या लावण्याचें वर्णन मोहक आहे.(अ.१९) याला मूळांत आधार नाहीं.

उदक ठेविलें दासीजनीं । शर्मिष्ठेनें स्वहस्तेंकरोनी ।
नृपतीस अभ्यंग घालोनी । क्षीरोदक नेसविला ।। १६ ।।
षड्रस अन्नें निपजवून । दिधलें रायासी भोजन ।
दिव्यमंचकीं आरक्त सुमन । वरी निजवी नरेंद्रा ।। १७ ।।
वेळाकर्पूरसुगंधयुक्ता । तांबूल अर्पी धरित्रीनाथा ।
मग संतोषोनि अवलोकिता । राजा वदन तियेचें ।। १८ ।।
जैसी सुवर्णचंपककळी । कीं वोतली मन्मथपुतळी ।
अत्यंत तारुण्यभरें लवली । परी विनीत सुकुमार ।। १९ ।।
विराजे राजवदनचंद्रिका । भाळीं रेखिला कस्तुरी टिका ।
आकर्णपर्यंत कज्जलरेखा । नयन तेणें शोभती ।। २० ।।
दृढ बिल्वपीत स्तन । वरी मुक्तजाळी विराजमान ।
हृदयीं पदक दैदीप्यमान । तेज फांके हृदयाब्जीं ।। २१ ।।
करिशावकशुंडादंड । तैसे सरळ भुजदंड ।
कंकणें रुणझुणती प्रचंड । मदनातें चेतवावया ।। २२ ।।
हारि कटीवरी शोभे घटी । उभी राहे सन्मुख गोरटी ।
नृपातें व्यंकटदृष्टीं । लक्षीतसे वेल्हाळी ।। २३ ।।

दीर्घकाल यौवनाचें विषयसुख भोगल्यावर ययाति राजा विषयांस विटून विरागी झाला.

तेवेळीं विवरी अंतःकरणा । म्हणे " हे अतृप्त मनवासना ।
भोगितांही आगळी तृष्णा । दिवसें दिवस होतसे ।। १२८ ।।
सरली आयुष्याची जोडी । ठेली इंद्रियबळाची प्रौढी ।
तरी विषयतृष्णेची वाढी । आगळी दिसे वाढती ।। १२९ ।।

हवी भक्षितां वैश्वानरु । नदीप्राशनीं जळसागरु ।
विषय भोगितां पामर नरु । तृप्ती नोहे कल्पांतीं ॥ १३० ॥
भंगिला कुंभ भरिला हातीं । शेखीं रिचवितां रिता पुढती ।
तैसें विषयभोग भोगितां अंतीं । न दिसे कांहीं ठावाचेया ॥१३१
धान्य हिरण्य पशु वनिता । स्वइच्छा चिरकाळ भोगितां ।
'पुरे पुरे न लगे आतां ' । म्हणतां कोणी दिसेना! ॥ १३२ ॥
आतां जाणतेनि पुरुषें । त्याग करणें हें विशेषें ।
तेणें परत्रीं सावकाशें । विश्रांतीतें पाविजे ॥ १३३ ॥
विषयत्यागाविणें मोक्षु । मानूनि म्हणविती शास्त्री दक्षु ।
ते मूर्खसभेचे अध्यक्षु । माझे मतीं मानले " ॥ १३४ ॥

या ७ ओव्यांना मूळ भारतांत २ श्लोक आधारभूत आहेत:—

न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति ।
हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥ १२ ॥
यत्पृथिव्यां व्रीहि यवं हिरण्यं पशवः स्त्रियः ।
एकस्यापि न पर्याप्तं तस्मात्तृष्णां परित्यजेत् ॥ अ० ८५-१३ ॥

मुक्तेश्वरानें 'मूर्खसभेचे अध्यक्ष' मात्र खूप निवडून काढले आहेत! मोरोपंतानें यावर एकच आर्या केली आहे:-

स्वल्पचि एकाहि स्रक्चंदनवनितादि सर्व विषय मही ।
कळले हे मज भोगचि मारक—न व्याळ, शस्त्र, विष, यमही ॥

आजन्म ब्रह्मचर्यव्रतपालनाविषयीं भीष्मांचा निर्धार:—

उष्णता सांडील वैश्वानर । प्रभा त्यागील पद्मिनीवर ।
हिमांशु दवडील हिमकर । परी मी सत्य सांडीना ॥ ७ ॥
शब्दविषय सांडील गगन । रूप तेज, स्पर्श पवन ।
रस विषय सांडील जीवन । सत्य माझें चळेना ॥आदि. २४-८॥

१५ द्यूताची व वस्त्रहरणाची दिव्यकथा सभापर्व अ० १५मध्यें कवीनें फार बहारीनें वर्णिली आहे. हा सारा अध्यायच अतिशय गोड झाला आहे. द्रौपदी 'जिता' समजून स्त्रीधर्मिणी एकवसना असतांना दुष्ट दुःशासनानें वेणी धरून तिला खेंचून सभेंत आणली, तेव्हां दुर्योधनकर्णशकुनींना आनंद झाला व भीष्मद्रोणविदुरादि सज्जनांना परमदुःख झालें. त्याप्रसंगीं

पांडवांचा संताप सहजच शिगेला चढला. पण याहीप्रसंगीं भीम, धर्म व अर्जुन यांच्या स्वभावांचीं शब्दचित्रें मुक्तेश्वरानें कशीं हुबेहुब रेखाटलीं आहेत तीं पहा.

कर्ण ह्मणे " ही द्रौपदी । । तुटलीस धर्माचे संबंधीं ।
दुर्योधनाचे राज्यपदीं । तूं स्वामिणी सर्वस्वें " ।। १५६ ।।
क्षोभौनियां पद्मनयना । क्रोधदृष्टी भीमार्जुना ।
अवलोकितां भीमसेना । हृदयस्फोट होतसे ।। १५७ ।।
रगडोनियां अधरदांत । गदामुष्टी घातला हात ।
ह्मणे ' हे पापी समस्त । निर्दळीन ये काळीं ।। १५८ ।।
असंख्य कुंजरांचिया थाटीं । एकला सिंह आंगें निवटी ।
कीं अजाविकांच्या कोटी । व्याघ्र एकला विभांडी ' ।। १५९ ।।
उसळोनियां गदापाणी । मिसळों पाहे तदा कंदनीं ।
हें देखोनि आज्ञावचनीं । धर्म वारी भीमातें ।। १६० ।।
ह्मणे " क्रोध नावरे तुझिया चित्ता।तरी गदा ओपीं माझिये माथां ।
परी असत्य कुंतीसुता । स्पर्शें ऐसें न करावें ।। १६१ ।।
सत्य रक्षावया श्रीरामें । अरण्य सेविलें पुरुषोत्तमें ।
पिता प्राणें गेलियां, सीमे । नुलंघीच मर्यादा ।। १६२ ।।
लटिकें साच करूनि स्वप्न । राज्य ब्राह्मणां दीधलें दान ।
तया हरिश्चंद्राचें कथन । ग्रंथकर्ते बोलती ।। १६३ ।।
कपोत शरणागत पातलें । शिबीनें निजमांस छेदिलें ।
दधीचिऋषीनें दीधलें । देहदान द्विजातें ।। १६४ ।।
पार्वतीचिया प्राणनाथें । सत्वें छळिलें श्रियाळातें ।
पुत्र वधोनि स्वहस्तें । मांस दिधलें भोजना ।। १६५ ।।
तैसें येथें अवघड कायी ? । विचारीं पा ! आपुल्या हृदयीं ।
सत्यनिष्ठातें अपायीं । ईश्वर न घाली सर्वथा ।। १६६ ।।
द्यूतीं हारविला पण । येथें याचा अन्याय कोण ? ।
धर्मवंतीं नियमवचन । कीर्तीलागीं रक्षावें " ।। १६७ ।।
नावेक क्रोधसिंधूचा लोट । न धरवे आवेश उद्भट ।
ह्मणे ' सहदेवा ! हव्यवाट । प्रदीप्त करीं ये काळीं ।। १६८ ।।

छेदूनि धर्माचे द्वयहस्त । भस्म करीन अग्नी–आंत ।
वर्जितां खेळोनियां द्यूत । महाव्यसनीं पाडिलें ' ।। १६९ ।।
गदा उचलितां हातीं । धनंजयें धरिला पुढती ।
ह्मणे ' भीमा ! अधर्मपंथीं । चळों नेदी मानसा ।। १७० ।।
गुरु, स्वामी, वडिलबंधू । पवित्र सात्विक धर्मसिंधु ।
येणें नेमें गोविला शब्दू । तोचि प्रमाण आमुतें ।। १७१ ।।
लाधलासी बळाची प्रौढी । त्याची काय हेचि जोडी ।
धर्माशी मारूनि ब्रह्मांडीं । अपकीर्ती उरवणें ? ।। १७२ ।।
सत्यसन्मार्गीं वर्ततां नर । त्याचा कैवारी जगदीश्वर ।
त्याचे कार्य शार्ङ्गधर । आपण आंगें संपादी ।। १७३ ।।
स्वप्नप्राय संसार क्षणिक । लटिकें न साच साधनें ऐक ।
सत्य धर्म सद्विवेक । साधूनि जाती जाणते ।।१७४।।
यालागीं शांतिभाज । मौन धरूनि पाहे चोज ।
तुवां करावें तें काज । ईश्वर करील निर्धारें " ।।१७५।।
त्रैलोक्यराज्य अथवा प्राण । गेलियां धर्म मानी तृण ।
परी सांडील सत्यवचन । हें सर्वथा घडेना ।।१७६।।

द्रौपदीच्या तोंडीं कवीनें घातलेलें पुढील रूपक मोठें हृदयस्पर्शी आहे. वीररसाशीं येथें विनोद मिश्रित असून उत्कृष्ट साधला आहे:–

दुर्योधन दुराचारी । म्हणे ' वो द्रुपदाचे कुमरी ! ।
येऊनि बैसे मांडीवरी ! होई अंतुरी पट्टीची' ।। १०९ ।।
पाप शब्द पडतां कानीं । हृदयीं धडकला क्रोधाग्नी ।
ते म्हणे " दुरात्मिया ! हे वाणी । जळो तुझी पापिष्ठा ! ११०
भीमाकरीं जे केळवली । गदा नोवरी सगुणाथिली ।
वाग्निश्चयें तुज नेमिली । गोत्र घटित निर्धारें ! ।। ११२ ।।
बाहुलें योजिलें रणतळवट । आयुष्य अवधीचा अंत्रपाट ।
हातें सारूनि बळी वरिष्ठ । लग्न लावील स्वहातें ! ।। ११३ ।।
रक्तहरिद्रा तनुलेपनी । माथां अक्षता पायपिटणी ।
स्त्रियाप्रलाप वाद्यध्वनी । सुखसोहळा भोगिसी ।। ११४ ।।
ते गदा घेऊनि मांडीवरी । रणमंचकीं निद्रा करी ।

प्राण पारखे दवडूनि दूरी । मग एकांतीं पहुडे पां ! ॥ ११५ ॥

यानंतर प्रत्यक्ष वस्त्रहरणाचा दुर्धर प्रसंग ओढवला तेव्हां द्रौपदीला ब्रह्मांड आठवलें व तिनें अगतिकपणानें श्रीकृष्णाचा धांवा केला. भगवान् प्रसंगीं धांवले व त्यांनीं अनंत वस्त्रें पुरवून कौरवपक्षाचा नक्षा उतरला. हा सर्व प्रसंग अत्यंत करुण व रसभरित असून मुक्तेश्वर व मोरोपंत या दोनही कविश्रेष्ठांनीं तो फार नामी वर्णिला आहे. त्यांच्यांतलें साम्य व भेद दोन्ही लक्ष्यांत येऊन दोघांविषयींही आदर वाटतो. पंतांची सुललितवाणी कर्ण व मन यांना प्रसन्न करिते. मुक्तेश्वराचें वर्णन ठसठसीत असून सारा प्रसंग डोळ्यांपुढें उभा करिते व त्याचा द्रौपदीचा धांवा वाचतांना हृदयस्फोट होतो. वर्णनांत अध्यात्माचा किंचित् रंगही आहे.

१६ पांडव वनवासांत असतां एकदां सर्वांचे दुःख अनुभवून द्रौपदी धर्मराजास म्हणाली ( वन० अ० ४ ):—

आज्ञा देईं भीमार्जुनां । करूनि शत्रूच्या दहना ।
राज्य साधिलियां महाप्राज्ञा । उभयलोकीं सुखलाभ ॥ ३८ ॥
व्यवहारीं शांति नये कामा । परमार्थ क्रोध नाशीं धर्मा ।
जेथें ज्याचा महिमा । तें तेथेंचि योजावें ॥ ४५ ॥

तात्पर्य ' सत्वगुण तो परमार्था । शोभा आणी सर्वस्वें ' हें जरी खरें असलें तरी ' क्रूरता भोगी वैभव । सात्विका भिक्षा मिळेना ' असा जगांतला न्याय दिसतो. भीमसेनाचें मत असेंच पडलें. धर्मानें उभयतांचें समाधान केलें. इतक्यांत तेथें व्यास आले—

व्यास म्हणे " विवेकखाणी ! । कासया विकल्पिसी मनीं ? ।
निशी लोटलिया तरणी । उगव ऐसा संशयो ? ॥ ६९ ॥

---

१ रात्र सरल्यावर दिवस यायचाच, त्याप्रमाणें आपत्कालामागून भाग्यकाळ यायचाच याविषयीं सज्जनांनीं संशय बाळगायला नको. हाच दृष्टांत व हीच कल्पना शेक्सपीअरच्या हॅम्लेट नाटकांत [ अंक पहिला ] पहाः—

To thine own self be true,
And it must follow, as the night the day,
Thou canst not then be false to any man.

सत्य सुकृत ज्याचे गांठीं । तेथें ईश्वरकृपा मोठी ।
ईश्वरकृपेस्तव संतुष्टी । पूर्णकामें सर्वथा " ॥ ७० ॥

मोरोपंतानें ह्या प्रसंगीं द्रौपदीनें धर्माची तीव्र शब्दांनीं निर्भर्त्सना केली असे म्हणून ह्या वादाला रंग चढविला आहे, मुक्तेश्वरानें हा प्रसंग सौम्य शब्दांत आटोपता घेतला आहे. ह्या प्रसंगाचें अर्थगांभीर्य व वाद्नैपुण्य दर्शविणारें उत्कृष्ट वर्णन पाहायचें तर किरातार्जुनीय महाकाव्याच्या पहिल्या दोन सर्गांत भारवीनें केलेलें अवश्य पहावें. द्रौपदीचा जहालपक्ष व महात्मा धर्मराज याचा विवेकीपक्ष असे दोन पक्ष आपत्काळीं सर्व राष्ट्रांत उत्पन्न होत असतात. दोन्ही पक्षांचे वीर परस्पराविषयीं आदरभाव व प्रेम ठेवून आपापले मुद्दे सभ्य पण तेजस्वी भाषेंत कसे प्रगट करूं शकतात हें भारवीनें उत्कृष्ट प्रकारें दाखविलें आहे. ' व्रजन्ति ते मूढधियः पराभवं भवन्ति मायाविषु ये न मायिनः ' म्ह० शठाशीं जे शठ होत नाहींत ते मूर्ख पराभव पावतात–हें द्रौपदीपक्षीय उतावळ्यांचें मत व ' सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदां पदम् । वृणुतेहि विमृश्यकारिणं गुणलुब्धाः स्वयमेव संपदः ॥' याप्रमाणें आत्मसंयमन व आत्मशुद्धि आधीं साधून विवेकविचारानें कार्य साधून घ्यावें हे महात्मा धर्म याच्या पक्षाचें मत. 'प्रशमाभरणं पराक्रमः' ' न तितिक्षासममस्ति साधनम् ' हीं धर्माचीं सूत्रें. असो. दोन्ही पक्षांचें ध्येय एकच, एकाचा मार्ग थोडा उतावळेपणाचा, दुसऱ्याचा तितिक्षेचा व धिम्मेपणाचा. असो. मूळ भारत, किरातार्जुनीय, पंत व मुक्तेश्वर यांनीं हा महत्त्वाचा विषय कसा वर्णिला हें पाहणें मौजेचें आहे पण विस्तारभयास्तव येथें नुस्तें सुचवून ठेवतों.

शत्रुपराभव होण्यापूर्वी तपस्या घडली पाहिजे म्हणून अर्जुन हिमालयावर गेला व शंकरप्रसादानें त्यानें पाशुपतास्त्र मिळविलें. तो प्रकार ( वन० अ० ४ ) व इंद्रलोकीं ५ वर्षें राहून आला तो भाग (अ० ५) सुंदर वर्णिला आहे.

१७ मुक्तेश्वराच्या वनपर्वांत नलदमयंतिआख्यान ( अ० ६।७।८ ), यक्षप्रश्न ( अ० १० ), थालीपाटप्रकरण ( अ० ११ ) व विशेषतः सावित्रीकथा ( अ० १६ ) हीं प्रकरणें व त्यांतही नलोपाख्यान व सावित्रीकथा हीं प्रकरणें अत्यंत सरस वठलीं आहेत. संपूर्ण रामकथा

रामभक्तांनीं १५ व्या अध्यायांत पहावी. सुंदर अवतरणें कोठवर द्यावींत? किंचिद्दिग्दर्शन मात्र करितों.

श्रीसमर्थशिष्य रघुनाथपंडित यानीं संस्कृत काव्याच्या धाटणीवर साहित्यशास्त्राधारें सुरस वर्णिलेलें नलाख्यान विद्वन्मान्य आहेच. आतां प्रथम नळराजाचें मुक्तेश्वरी वर्णन पहा—

सुरमंडळीं सहस्रनयन । ग्रहमंडळीं सहस्रकिरण ।
पाताळभुवनीं सहस्रवदन । तेवीं तो मान्य भूतळीं ॥ ४ ॥
अक्षय्य तारुण्य रसाळा । कोटिकंदर्पसौंदर्यपुतळा ।
चतुर्दशविद्या चौसष्टकळा । विश्रामल्या त्या देहीं ॥ ५ ॥
आशिष्ठ द्रढिष्ठ बळिष्ठ । चक्रावर्तीमाजी श्रेष्ठ ।
ज्याचे आज्ञेचा अखंडपट । वेष्टुनी मिरवे मेदिनी ॥ ६ ॥
अक्षहृदय अश्वहृदय । जाणे वीरसेनतनय ।
जगीं सर्वज्ञतेचा सूर्य । प्रतापकाळीं प्रकाशे ॥ ७ ॥
न्यायें प्रजांचें पालन । प्रतापें शत्रुकुळांचें दमन ।
विनयें साधूंचें संरक्षण । शीलवर्तन सर्वदा ॥ ८ ॥
परिमळामाजि कस्तूरिका । पुष्पांमाजी नवमल्लिका ।
तेवीं दमयंती नरनायका । आवडली हृदयपद्मीं ॥ २९ ॥

स्वयंवर झालें, कांहीं काळ राज्य भोगलें, पुढें आपत्काळ आला, द्यूतांत राज्य हरवलें, वनवास प्राप्त झाला, दुःखांचा कळस झाला. 'दोघीं वेढिलें एकवसन । तळीं शय्या ना प्रावरण । पंचरात्र उपोषण । तेणें प्राण जाकळती ' अशा कुदशेत वनांत राहणें प्राप्त झालें. दमयंतीचे कष्ट राजाला पाहवतना म्हणून त्यानें 'माहेरीं जा' अशी प्रत्यक्ष सूचना न देतां विदर्भदेशाचा मार्ग सांगितला ( अ० ७ ):—

ऐकोनि प्राणेश्वराची मात । वज्रमेहृदयीं शस्त्रघात ।
म्हणे हा कासया संकेत । दावितसां साक्षेपें ? ॥ ८१ ॥
मनीं धरूनि माझा त्याग । ज्ञान करितां नाना मार्ग ।
हा संक्रम अति अयोग्य । पुण्यश्लोका ! तुजलागीं ॥ ८२ ॥
सांडूनि देवांचिया मूर्ती । त्यागूनि पृथ्वीचे भूपती ।
तुम्हांतें वरिलें परम आर्ती । एक भक्तिभावार्थें ॥ ८३ ॥

काया वाचा आणि मन । त्वांही ठेविला मजवरी प्राण ।
ऐसियाचें हृदय कठिन । केविं जालें कळेना ॥ ८४ ॥
पतिव्रता मी निर्धूत । तुजही एकपत्नीव्रत ।
माझा त्याग करितां एथ । काय ईश्वर संतुष्ट ? ॥ ८५ ॥
गेलें असतां सर्व राज्य । क्षुधेतृषेनें पीडिली माज ।
अर्धवस्त्रा एकटी मज । त्यागूं म्हणसी काननीं ! ॥ ८६ ॥
तापत्रयनिवारणाचें छत्र । भार्येपरता नाहीं मित्र ।
पतिव्रता मी सुपवित्र । कशी त्यागूं भाविशी ? ॥ ८७ ॥
तुजही प्रबळक्षुधा बाधी । राज्यहानीची सखेद व्याधी ।
संगीं भार्या दिव्यौषधी । उपचारीन दासीत्वें ॥ ८८ ॥
भार्या सकळश्रमातें हर्ती । भार्या सकळसुखातें कर्ती ।
भार्या पवित्रवंशधर्ती । यशकीर्ती स्त्रीसंगें ॥ ८९ ॥
स्त्रीसंगें धर्म निर्दोष । पुरुष कुमार्गीं न पवे भ्रंश ।
भार्या नसतां महादोष । कामादिक पीडिती ॥ ९० ॥

मुक्तेश्वराच्या कुलस्त्रीविषयक कल्पना किती उदात्त होत्या हें 'तापत्रय-निवारणाचें छत्र । भार्येपरता नाहीं मित्र ' या अर्थावरून समजून ये-णार आहे; तथापि लौकिक सामान्य स्त्रियांच्या रीतिही त्याला माहीत होत्या व उन्मत्त व कुलटा स्त्रियांची वर्तमानपद्धतिही त्यानें वर्णिली आहे:—

समर्थ माहेरींचें बळ । तेणें स्त्रिया उच्छृंखळ ।
भ्रतार मानूनि गोळांगुळ । अव्हेरिती सर्वस्वें ॥ २२ ॥आदि.१॥
ह्मणोनि स्त्रियांची प्रकृति । धनिक देखोनि उपजे प्रीती ।
दरिद्री भ्रतार अव्हेरिती । हेळोनियां सर्वस्वें ॥ २२ ॥ वन. ६ ॥

आर्य स्त्रियांची थोर योग्यता वेदशास्त्रपुराणांनीं व संतकवींनीं वानिली आहे व त्या आपल्या उदात्त चारित्र्यानें जगाला स्तवनार्ह आहेत यांत शंका नाहीं. शंका एवढीच आहे कीं आमच्या धर्मानें स्त्रीचरित्र जितकें विमळ, उदात्त व दिव्य केलें आहे त्या मानानें त्याचा पुरुषवर्गावर सुपरिणाम झालेला इतिहासपुराणांत व प्रत्यक्ष व्यवहारांत दिसतो काय ? असो. दमयंतीचे वरील उद्गार किती पतिप्रेमान्वित व उदारपणाचे आहेत ! दमयंतीनें नळाला सुचविलें कीं आपण उभयतांच विदर्भदेशीं

[ माहेरीं ] जाऊं. यावरः—

नळ म्हणे " विचारनिष्ठे ! । आपत्काळीं न वचिजे कोठें ।
विशेष सन्मानहानी मोठें । परम दुःख अंतरीं ॥ ९४ ॥
राज्य हारवूनियां पर्णी । भार्येसहित एकवसनी ।
श्वशुरगृहीं जातां व्यसनीं । विश्व ठेवील मूर्खता ! ॥ ९५ ॥
दारिद्र्यकाळामाजी देख । नीच श्रेष्ठांतें म्हणती मूर्ख ।
उपहासिती सकळ लोक । आप्तवर्ग विशेषें " ॥ ९६ ॥

अर्धवस्त्र छेदन करून ' म्हणे हे पतिव्रता निर्दोष । स्पर्शों न शके परका पुरुष । इचे नेत्रींचा हुताश । भस्म करील दुष्टातें' असा तिच्या पातिव्रत्यावर विश्वास ठेवून नळ तिला वनांत सोडून गेला. तिनें सावध झाल्यावर प्रसंग जाणून बहुत शोक केला. त्या शोकांतही 'माझा करूनियां घात । काय तो साधिसी पुरुषार्थ ? । मग वेगळें तुझें चित्त । काय विश्रांती पावेल ? ' असा प्रेमळ पण ठसकेबाज उद्गारही दमयंतीच्या तोंडीं निघाला आहे.

आठवूनि नळाचे कष्ट । दुःखें होतसे हृदयस्फोट ।
नाठवी आपुलें संकट । वनिताश्रेष्ठ दमयंती ॥ १०० ॥
' माझा पतिव्रताधर्म । तूतें सर्वदा करू क्षेम ।
तुझे अवदशेचा श्रम । सर्व हो कां मजलागीं ॥ १४२ ॥
वाहळ वोहळ दरे दरकुटे । विवरें कुहरे गिरिकपाटें ।
वनें भयानकें कष्टें । लंघूनियां जातसे ॥ १४४ ॥

पुढें ऋतुपर्ण राजाच्या नगरीं ' बाहुक ' नांवानें राहून नळानें आपला पुढील आपत्काळ कंठिला, तथापि येथें आल्यापासून पुढच्या वर्णनांत मुक्तेश्वरानें ' नळ ' शब्द एकदाही येऊं न देतां—पुन्हां तो ' नळ ' नावानें प्रगट होईपर्यंत—त्याचा ' बाहुक ' नांवानेंच सर्वत्र उल्लेख केला आहे हें त्याचें वर्णनचातुर्य वर्णनीय आहे ! मोरोपंत चतुर खरे पण येथें इतकें अवधान त्यांस राहिलें नाहीं, असें त्यांच्या कथाभागावरून दिसतें. ही गोष्ट काव्यसंग्रहकारांनीं टीपेंत दाखविली असून मुक्तेश्वराची तारीफ केली आहे ती सर्वथा योग्य आहे. वाटेंतलीं अनेक संकटें सोशीत दमयंती अखेर पितृगृहीं जाऊन पोंचली व तेथें ' फल तांबूल अन्नोदक । न सिवे

आमरणांशुक। पतिवियोगाचें दुःख। देहीं धडके सर्वदा' [ अ० ८–१३ ] याप्रमाणें राहिली. पुढें तिनें स्वयंवराचें मिष केलें, बाहुकाचा कलिशाप संपून तोच नळरूपानें प्रगटला व आनंदीआनंद झाला तो सरस कथाभाग वाचकांनीं कविमुखानेंच ऐकावा.

## १० कणिकनीति व नारदनीति.

१८कुटिल राजनीतीच्या कौरवांस उपदेश करणारा कणिक याची कणिकनीति (आदि० अ० १४) व उदात्त, राष्ट्रोपकारक व व्यापक राजनीतीचा पांडवांस उपदेश करणारे नारद यांची नारदनीति ( सभा० अ० १ ) या दोन्ही ताडून पाहण्यासारख्या आहेत. ह्या दोन्ही प्रसंगांवर मोरोपंतांनीं विशेष कांहींच लिहिलें नाहीं, पण मुक्तेश्वरानें हे राष्ट्राला राजनीतीचें शिक्षण देणारे उत्तम प्रसंग सविस्तर वर्णिले आहेत. मुक्तेश्वराचें समाजाकडे, राष्ट्रकार्याकडे व्यापकपणाचें लक्ष होतें, तसें व तितकें मोरोपंताचें दिसत नाहीं. मोरोपंत भारती कथेंतच मदून गेला होता, व मुक्तेश्वर आपल्या काळच्या लोकांना राजनीति व व्यवहार शिकविण्याच्या उद्देशानें भारती कथा गात होता असा दोघांच्या हेतूंत फरक असल्याचें या व अन्य अनेक प्रसंगांवरून स्पष्ट दिसतें. पांडव प्रबळ होत चालले आहेत, तर त्यांचें छिद्र समजून घेऊन व आपले राजकीय बेत गुप्त ठेवून कपटानें त्यांचा कसा नाश करावा हें कणिकानें सांगितलें आहे. शठाशीं शाठ्य नव्हे तर सज्जनाशीं शाठ्य करायला कणिक शिकवीत आहे. "दुरी दवडोनि सात्विकता। विस्तारावी अति क्रूरता। उपजेलतव इच्छिल्या अर्था। अनायासें पाविजे ॥११॥ शोधिजे परबुद्धिचा ठाव। कळों न दिजे आपला भाव। स्वार्थ साधे तो उपाव। नाना यत्नीं साधावा ॥ १२ ॥ दया आर्जव साधुवृत्ती। वर्ततां वदनीं पाडे माती" हा कणिकनीतीचा मथितार्थ आहे. कणिकनीतींतही कांहीं भाग ग्राह्य आहे. शत्रूशीं वागतांना सावधानता कशी ठेवावी व स्वकार्यापुढें कांहींही मानूं नये हा त्यांतील उपदेश विचारणीय आहे. 'वैरी थोर अथवा सान' असला तरी सावधान असावें.

कंटक भेदिला असतां चरणीं । सोमक्षिका दिघाली कर्णीं ।
कण खुपत असतां नयनीं । स्वस्थ कैसें बैसवें ? ॥ १७ ॥
आपलो अमल्य रातली परा । स्वतांची लक्ष्मी आणिका घरा ।
आतां, खेद राजेश्वरा ! । केवीं तोंडें बोलावा ? ॥ १८ ॥

हें अयथार्थ कोण म्हणेल ? शत्रुनिःपात करतांना सामदामदंड व भेद यांपैकीं ज्या वेळीं जें युक्त तेंच योजावें व शत्रूचें मर्मस्थान समजून घेऊन तेथेंच नेमका प्रहार करून शत्रु घायाळ करावा व जिंकावा हें राजनीतीचें सूत्र इतिहासांत अनुभवसिद्ध आहे, व तेंच कणक सांगतो.

मूळें खांडिल्या तरुवर । स्तंभ पाडिल्या कोसळे घर ।
बळ भंगिल्या अमित्र नर । मशकप्राय मारितां ॥ ३९ ॥
मुखीं ताडितां दंदशूक (सर्प) । पुच्छीं ताडितां वृश्चिक ।
वर्मीं ताडितां शत्रूचें मुख । होय विन्मुख स्वभावें ॥ ४० ॥

कणिकनीतीचें तात्पर्य हें आहे. आतां नारदनीति किंवा जिला मूळभारतीं 'कच्चित्' शब्दानें सर्व श्लोक आरंभिले गेल्यामुळें कच्चित्प्रश्न म्हणतात ती–सर्व राजकारणी पुरुषांना अत्यंत उपयोगीं पडण्यासारखी असल्यानें तिचा उतारा शेवटीं मुक्तेश्वरनीतिरत्नमालेंत दिला आहे तो सर्वांनीं पाहून चित्तांत ठेवावा. राजांनीं किंवा राष्ट्रचालक राजकारणी पुरुषांनीं स्वतः नीतिमार्गानें चालावें, प्रधान किंवा मंत्रिमंडळ योग्य प्रकारें नेमून त्यांच्या गुणांचें ग्रहण करून त्यांना आपापल्या कार्यांत उत्तेजित करावें, दूतमुखानें राज्याचा अंतर्बाह्य कारभार जागरूकपणें समजून घ्यावा, परराष्ट्राशीं दक्षतेनें वागावें, प्राज्ञपुरुष, शेतकरी, व्यापारी वगैरे अनेक वर्गांतील प्रजेला प्रेमानें व न्यायानें वागवावें व स्वतः एकांतीं मोक्षविचार करावा इ० गोष्टी या नारदनीतींत फार उत्तम प्रकारें सांगितल्या आहेत. संसारांत आपत्काळ ज्याच्या त्याच्या मानानें येतच असणार. पुढें येणाऱ्या आपत्तींत उपयोगीं पडण्यासारखी विवेकाची शिदोरी जी व्यासानें पांडवांस दिली ती ( सभा० अ० १२ ) सर्वांनीं जवळ बाळगावी म्हणून 'व्यासाचा धर्मराजास उपदेश' या सदराखालीं रत्नमालेंत जो उतारा दिला आहे त्यांत पहावी. पांडवांस गुप्तरूपानें वर्षभर विराटराजाच्या वाड्यांत त्याचे सेवक म्हणून राहण्याचा प्रसंग

झाला ( विराट० अ० १ ) त्या समयीं धौम्यमुनीनें त्यास जो बोध केला आहे तो अपरिहार्य अडचणींमुळें राजाश्रयास राहणें प्राप्त झालेल्या पुरुषांनीं ध्यानीं ठेवावा, या सर्व प्रसंगांवरून मुक्तेश्वराची विशाल बुद्धिमत्ता व व्यवहारचातुर्य यांची खरी कल्पना होते. त्याची भाषाही अति सुबोध, असंदिग्ध व स्फूर्तिप्रद आहे.

## ११. मल्लयुद्ध किंवा कुस्ती.

१९ कौरवपांडवांना धनुर्वेद शिकविणारे जे द्रोणाचार्य त्यांनीं युद्धोपयोगी कोणकोणत्या विद्या त्यांना शिकविल्या व सर्व विद्यांत अर्जुन अत्यंत निपुण कसा झाला, याचें व कर्णार्जुन व दुर्योधनभीम यांच्या मल्लयुद्धांचें वीररसप्रचुर वर्णन ( आदि. अ. ३० । ३१ ) तरुणांनीं अवश्य वाचावें. मुक्तेश्वराचीं युद्धवर्णनें, व मल्लयुद्ध, कुस्त्या वगैरेंचीं वर्णनें अत्यंत वीरश्रीचीं असतात. वीररस मुक्तेश्वराला फारच उत्कृष्ट साधतो. वीररसवर्णनांत मुक्तेश्वर आपल्या वेळच्या युद्धकलेचें, शस्त्रांचें, कुस्त्यांच्या पांचपेंचाचे व क्वचित् भारतवर्षांतल्या अनेक प्रांतांतल्या युद्धपद्धतीचेंही इतकें हुबेहूब वर्णन देतो कीं या बाबतींत तो सर्व मराठी कवींत खरोखरच अद्वितीय आहे. पुढें शिवकाळीं व नंतरच्या प्रत्यक्ष स्वराज्याच्या काळांत अनेक शाहीर व पोवाडे रचणारे कवि झाले आहेत, पण मुक्तेश्वराच्या वीररसवर्णनाची सर कोणालाच येत नाहीं. युद्धाचीं अनेक अंगें सांगतांना गौड युद्ध, महाराष्ट्रीय भुज, आंध्रदेशस्थ युद्ध, फिरंगी युद्ध यांचें दिग्दर्शन ( आदि. अ. ३१ ) त्यानें केलें आहे ! भारती योद्धयांच्या कृतींतला ' वीरश्रियेचा आवेश । सिंह गर्जनेचा घोष ' त्याच्या वाणींत प्रतिबिंबित झाला आहे. त्याची वाणी पूर्णत्वें वीररसानुसारिणी आहे. भीमदुर्योधन ' सिंह उफाळती हुंकारें । कुंजर लक्षिती कुंजरें । कीं वृषभ माजले डिंबरें ( डुरकावणी फोडून ) फुंपाटती अतिरागें ' याप्रमाणें ' अधरदशनें चावीत व वामकरीं श्मश्रू पिळीत ' एकमेकांस कसे भिडतात याचें व अशाच अनेक प्रसंगांचें त्यांचे वर्णन अत्यंत बहारीचें आहे. एकदा कौरवपांडवांची सेना पांचाळपति जो द्रुपदराजा त्याच्या नगरावर चालून गेली:—

वाद्यें वाजूं लागलीं अपार । बळें चालिले कौरवभार ।
हडबडलें पांचाळपुर । वार्ता पुढें परिसोनी ॥ ६ ॥
कडकडाटें वीरभारीं । पांचाळ पातला बाहेरी ।
उभयदळांचे झुंजारीं । रणकल्लोळ माजला ॥ ८ ॥
बळें दुर्धर पांचाळदळ । लोटलें जैसें समुद्रजळ ।
कौरवसेना वडवानळ । धडधडीत प्रतापें ॥ १५ ॥
कुंजरावरी कुंजरभार । राउतावरी अश्वस्वार ।
नानाशस्त्री पार्थीचे वीर । घोर कंदना मिसळले ॥ १७ ॥
शंखभेरी मृदंग काहाळी । गोंधळ माजे पांचाळदळीं ।
महावीरांची आरोळी । जयजयकार प्रवर्तला ॥ ३१ ॥
गदा घेऊनि उतावीळ । पुढें धांविन्नला भीम सबळ ।
जेवीं मांडल्या प्रळयकाळ । दंडपाणी ( यम ) भूतांतें ॥ ४० ॥
तिमिंगल निघे समुद्रजळीं । तैसा भीम पांचाळदळीं ।
बळें मिसळतां खळबळी । सेना पांचाळपतीची ॥ ४२ ॥
असंख्य कुंजर थाट । स्रवती मदोदकाचे पाट ।
त्यावरी उठावला बलिष्ठ । गदाघायीं ताडित ॥ ४३ ॥
कुंभस्थळापासूनि धरणीं । रक्तप्रवाह ताम्रवर्णीं ।
मुक्ताफळांचिया श्रेणी । उभयभागीं विखुरल्या ॥ ४४ ॥
येरीकडे विजयी पार्थ । पुरवावया गुरूची आर्त ।
द्रुपद लक्षूनियां रथ । वातवेगें प्रेरिला ॥ ५० ॥
अश्वरथ कुंजरभार । विभांडीत रणझुंजार ।
रथ योद्धे शतसहस्त्र । बाणधारा खंडिले ॥ ५१ ॥
बाणधारा अकस्मात । शिरें उडती मुगुटांसहित ।
शस्त्रीं उभारिले हात । ते नभांत उसळती ॥ ५३ ॥
अशुद्धनदीचे खळखळाट । पुसती सागराची वाट ।
मार्ग दावावया नीट । अपार प्रेतें चालती ॥ ५५ ॥
' हाहाकार ' माजला प्रबळ । फुटलें पांचाळाचें दळ ।
एक म्हणती प्रळयकाळ । अत्यद्भुत मांडला ॥ ५७ ॥

२० युद्धवर्णनें मुख्यतः भीष्मपर्व, द्रोणपर्व, कर्णपर्व यांत सांपडावयाचीं

पण तीं पर्वे उपलब्ध नाहींत, तरी वरील सारखे कांहीं प्रसंग मुक्तेश्वराच्या पांच पर्वांत कांहीं कमी नाहींत. सौप्तिक पर्वांत अभिमन्यूचें शौर्य बरेंच चांगलें वर्णिलें आहे, पण त्यांत क्रूरपणाचा भाग असल्यामुळें त्याचें उदाहरण येथें देत नाहीं. मल्लयुद्धांचीं किंवा कुस्त्यांचीं वर्णनें वीररस-परिपूर्ण आहेत, व हीं मुक्तेश्वराला फार उत्तम साधतात. भीमाचीं जरासंध, किर्मीर, कीचक, बकासूर वगैरेशीं जीं मल्लयुद्धें झालीं त्यांचा थोडासा नमुना पाहूं:—

भीम व जरासंध यांच्या मल्लयुद्धाचें म्ह० कुस्तीचें मुक्तेश्वरानें जें अप्रतिम वर्णन केलें आहे ( सभा० अ० ७ ) तें मूळाशीं ( सभा० अ० २३।२४ ] ताडून पाहिलें असतां मुक्तेश्वरी वर्णनांत तत्कालीन ' महाराष्ट्रीय झुंज ' कसे चालत असावें याची कल्पना करितां येईल. या वाणींत वीररस मूर्तिमंत अवतरला आहे असें वाटतें.

सरसावूनि वीरगुंठी । भीम लक्षिला दारुणदृष्टी ।
जैसा मदोन्मत्त करटी । सिंहेश्वरें लक्षावा ॥ १७ ॥
भीमाअंगीं वीरश्रीलोटू । धरितां न धरवे अतिउद्भटू ।
अगस्ती धांवें समुद्र घोटूं । तैसा झगटे पुढारां ॥ १८ ॥
दोघे पिटिती पाणितळें । जानुमूळें बाहुमूळें ।
मही ताडितां पादतळें । शैलमोळे थरकती ॥ १९ ॥
किरीट काढोनि हस्तकीं । केश आवळिले मस्तकीं ।
चंड गर्जना करिती मुखीं । काळ कांपे चळचळां ॥ २२ ॥
धांवोनि भीमाची वीरगुंठी । मागधें कवळोनियां मुष्टी ।
दक्षिण हस्त सूदला कंठीं । काळपाशासारिखा ॥ २३ ॥
दांत खाऊनि करकराटी । गुडघा स्थापिला हृदयपुटीं ।
' सावध ' म्हणे कृष्णजगजेठी । 'बापा भीमा बळिष्ठा !' ॥ २४ ॥
भीमें भैरवाकार दृष्टी । हृदयीं चेपिली वज्रमुष्टी ।
सोडवूनि मगरमिठी । झिंजाडोनि लोटिला ॥ २५ ॥
तेणें कोंपर दोंनी मुष्टी । चारी आघात चेपिले पृष्ठीं ।
मागध क्षोभोनि उफराटी । धुमणी (बुकी) हाणी मस्तकीं ॥२७॥
झोंबी सोडवोनि तवकें । मस्तका मस्तकें देती धडकें ।

सहस्रसंख्या लोट भडके । अशुद्धाचे चालती ॥ २८ ॥
हस्त वांढिती तोडावया । पाय कवळती मोडावया ।
डोळे टोंचिती फोडावया । पाडावया दशनातें ॥ ३० ॥
करप्रहार लत्ताप्रहार । मुष्टिप्रहार मस्तकप्रहार ।
मोजोनि मारिती शतसहस्र । ' उसणें घे घे ' म्हणोनी ॥ ३१ ॥
मस्तकीं वाहती करूनि मोट । भूमी टाकिती जैसा घट ।
तळीं पाषाण होती पिष्ट । आंगलोटें दोघांच्या ॥ ३२ ॥
बाहु गदा बाहु मुसळें । बाहु मुद्गल कर त्रिशूळें ।
एकमेकांचीं मर्मस्थळें । पाहोनियां मारिती ॥ ३३ ॥
तळवे तळपणें चपेट झटपा । ताडितां दोघे दाटती धापा ।
उडिया टाकिती सकोपा । येरयेरां मस्तकीं ॥ ३४ ॥
व्याघ्राऐसे कोंथानळीं । झोंबों पाहती कंठनाळीं ।
सिंहाऐसे कुंभस्थळीं । भेदूं म्हणती मस्तकें ॥ ३५ ॥
सर्पाऐसे फुस्कारिती । सिंहाऐसे हुंगारती ।
वृषभाऐसे फुंकाटती । उफाळती इसाळें ॥ ३८ ॥
मुष्टिघातांचिया ध्वनी । थरथराटें थरके धरणी ।
वोथरोनि पाताळफणी । मार्ग पाहे पळावया ॥ ४० ॥
मोहो माजला विवेकासी । क्रोध संघटे सात्विकासी ।
खळ बडबडी सर्वज्ञासी । तेवीं भीमासी मागध ॥ ५० ॥
प्रवर्तला महामारी । पतंग जैसा वैश्वानरीं ।
झगटे तैसा मुष्टिप्रहारीं । रागें ताडी भीमातें ॥ ५१ ॥
भीमें रगडोनियां दाढा । मध्यभागीं कर्षिला गाढा ।
माथां वाहोनिया भवंडा । चक्राकार दाविला ॥ ५२ ॥
पाडोनियां उताणा । वामपादें दक्षिणचरणा ।
रगडोनि सव्यपाद जाणा । उभयहस्तीं कवळिला ॥ ५४ ॥
आसडोनि बळ उद्भटें । मधें उघडिला तडतडाटें ।
अशुद्धनदीचे खळखळाटे । रंगभूमिके लोटले ॥ ५५ ॥
जयजयकार करूनि सकळीं । उभयलोकीं पिटिली टाळी ।
देवीं वोपिल्या पुष्पांजळीं । कृष्णभीमामस्तकीं ॥ ६१ ॥

हें वर्णन मल्लयुद्धविशारदांनींही मान तुकविण्याइतकें हुबेहुब आहे. किर्मीर व भीम यांच्या कुस्तींत (वन० अ० २) असाच वीररस आहे:—

मुष्टिलत्ता लथडवे थडका । हुमणिया कोपर हाणिती देखा ।
चडकणा ताडुनियां मुखा । दंत पाडूं माविती ॥ ५४ ॥
मर्मस्थळीं लाविती कळे । ग्रीवा पिळिती हस्तबळें ।
थापा हाणोनि डोळे । फोडूं म्हणती बलिष्ठ ॥ ५५ ॥
हस्तपाद कवळूनि चरणीं । उखळोनि सांडिती उर्ध्व गगनीं ।
उडी घालोनिया मूर्ध्नी । फोडावया तळपती ॥ ५६ ॥
न लेखिती येरयेर । माजले व्याघ्र काळकुंजर ।
अरण्यरोही वृषभ थोर । फुंफाटती अतिरागें ॥ ५७ ॥
पशु ओढिजे गळबंधनीं । तेवीं दोर्दंड उचलोनि ग्रीवास्थानीं ।
कवळूनि आसुडितां चरणीं । शैलपाडें पडियेला ॥ ६० ॥

विराटपर्वांत ( अ० ३ ) भीमानें कीचकाला कुस्तींत कसा लोळविला त्याचें वर्णन आहे:—

हस्त धरूनि हासडिला । तंव कीचक झोंबिये मिसळला ।
दोघां संग्राम मानला । अत्यद्भुत ते काळीं ॥ १४० ॥
घाय घालिती परस्परें । दणाणती दिगंतरें ।
महाप्रासादांचीं शिखरें । खचोनि पडती दडदडां ॥ १४२ ॥
उडोनि हृदयीं मारिली लात । वक्ष:स्थळीं मुष्टिघात ।
पृष्टीं ताडितां निघात । दणदणाट माजला ॥ १४४ ॥
कोपर हुमणिया चपेट । ताडितां अस्थि होती कूट ।
कीचक ह्मणे ' मरीन घोट । मित्रवर्णासारिखा ' ॥ १४५ ॥
शत्रू नवनागसहस्रबळी । भीमें कवळितां कंठनाळीं ।
बळें ताडूनि बाहुबळी । हस्त उखडोनी टाकिला ॥ १४७ ॥
मिडती नक्र आणि गजेंद्र । शरभपक्षी आणि मृगेंद्र ।
वृत्रासुर आणि देवेंद्र । मूळवैरी झुंजती ॥ १४८ ॥
मागें सरोनि धांवती पुढें । हृदयीं थडका मारिती गाढे ।
एकमेकां इडेपाडे । महापर्वत पैं जैसे ॥ १५१ ॥
यानंतरें भीम जगजेठी । मर्मस्थळीं सहस्रमुष्टी ।

बळें ताडितां भूतळीं । मूर्च्छा दाटोनि पाडियेला ॥ १५६ ॥
निवटूनियां अस्थिजाळ । शीर केलें गोळांगुळ ।
सोडले रक्ताचे खळाळ । नदीलोटासारिखे ॥ १५७ ॥

बकासुराशीं असाच चुरशीचा सामना झाल्याचें वर्णन ( आदि० अ. ३८ ) कवीनें केलें आहे:—

राक्षस क्षोभला दुर्धर । विक्राळ तुंड पर्वताकार ।
घरघराटें गगनोदर । प्रतिशब्दें गाजवी ॥ ७८ ॥
दांत खाऊनि करकराटी । दोन्ही वळोनि वज्रमुष्टी ।
भीमसेन ताडिला पृष्ठीं । सिंह जैसा कुंजरें ॥ ७९ ॥
राक्षस चढोनि तवका । भीमहृदयीं मारी थडका ।
लत्ताप्रहारें ताडितां खडका- । वरी पडे उताणा ॥ ८५ ॥
पुढती उठोनि सहस्र झाडें । मोवंडोनि मारिले धोंडे ।
तिवुकीं साहूनि जुंबाडें । जटा मुष्टीं कवळिली ॥ ८६ ॥
वामहस्तें धरूनि केशीं । सव्य न्यासिला कंठप्रदेशीं ।
मान मोडितां कासाविशी । हाक मारी आक्रोशें ॥ ८७ ॥
मध्यें तोडिजे इक्षुदंड । त्यापरी केला तो दुखंड ।
नाना नखधारी प्रचंड । गरुड खंडी सर्पातें ॥ ८८ ॥
वज्र हाणितां निधातें । दुखंड होइजे पर्वतें ।
तेविं मारूनि राक्षसातें । भीम झाला यशस्वी ॥ ८९ ॥
चूर्ण झालिया अस्थिजाळें । बाहेर पडलीं नेत्रबुबुळें ।
मुखीं नासिकीं कर्णबिळें । रक्त वाहे भडभडा ॥ ९० ॥

कुस्तींतले डावपेंच मुक्तेश्वराला जात्या माहित होतेसें दिसतें. मुक्तेश्वराचा काळ शिवाजीतानाजींसारख्या मल्लांच्या वीरश्रीचा उगम असल्यामुळें महाराष्ट्रांत चहूंकडे तालमी आणि आखाडे फार झाले होते. पुढें यवनांशीं झुंज खेळायला तयार होणारे वीर आखाड्यांत झोंबी खेळत होते, शरीर कमावीत होते, युद्धाला लागणाऱ्या डावपेंचांची तालीम घेत होते. याप्रमाणें बालवीरांच्या शाळा महाराष्ट्रांत सर्वत्र निघाल्या होत्या. पुढें रामभक्त रामदासस्वामींच्या प्रेरणेनें दरएक तालमींत कडकडीत ब्रह्मचर्य, विलक्षण स्वामिनिष्ठा, शारीरिक व मानसिक सामर्थ्य हे गुण अंगीं असणाऱ्या

'बुद्धिमतां वरिष्ठं' अशा मारुतीची स्थापना झाली. जितेंद्रिय व ईश्वरभक्त असा हनुमान् तालमींच्या उस्तादांचा उस्ताद होऊन बसला. असो; मुक्तेश्वराच्या काळीं तालमींची सार्वत्रिकता होती म्हणून त्याच्या भारतांतही कुस्तीचें हें मनोहर वर्णन येऊं शकलें.

---

## १२ मुक्तेश्वरकालीन भोजनाचे प्रकार.

२१ मुक्तेश्वरी भारतांत भोजनाचीं वर्णनें सविस्तर आलीं आहेत तीं पाहिलीं असतां तीन शतकांमागें महाराष्ट्रीय उच्च घराण्यांत कोणकोणते पदार्थ खाण्यांत येत असत हें समजतें. कवीचे आजे नाथमहाराज हे गर्भश्रीमंत होते व त्यांचे घरीं अन्नसंतर्पण हा त्यांचा नित्यांतला क्रम होता. नाथ व मुक्तेश्वर हे दोघेही गृहस्थाश्रमी असल्यामुळें खाण्याचे विविधप्रकारचे स्वादिष्ट पदार्थ घरींच नित्य होत असत. पैठण गांवही तेव्हां भरवस्तीचा व सुसंपन्न असून विद्येचें केवळ माहेरघर होता. शिवाय मुक्तेश्वर हे एकलकोंडे नसून महाराष्ट्रभर किंबहुना सर्व हिंदुस्थानभर हिंडलेले असून ठिकठिकाणच्या खाण्यापिण्याच्या तऱ्हा त्यांना चांगल्या माहीत झालेल्या होत्या; तथापि मुक्तेश्वरानें वर्णिलेले पदार्थ बहुतेक सर्व महाराष्ट्रीय आहेत व आजही ते महाराष्ट्रीय स्त्रीपुरुषांच्या चांगल्या परिचयाचे आहेत यांत शंका नाहीं. पुढें रावबाजींच्या कारकीर्दींत सूपशास्त्राची भरभराट झाली व नानाविध पक्कान्नें नित्यशः खाण्यांत महाराष्ट्राचे व विशेषतः पुण्याचे ब्राह्मण चूर होऊन गेले असा ब्राह्मणी राज्यावर अपवाद ठेवण्यांत येत असतो, तथापि मुक्तेश्वराच्या वर्णनावरून पाहतां रावबाजींच्या कारकीर्दींत खाण्याच्या बाबतींत कांहीं विशेष प्रगति झाली असें दिसत नाहीं ! कांहीं गोड पक्कान्नें नवीन आलीं व तीं कदाचित् महाराष्ट्रानें उत्तरहिंदुस्थानांतून आणलीं असतील, तथापि मुक्तेश्वराच्यावेळींच आमचें भोजनशास्त्र परिपाकावस्थेला पोंचलें होतें असें म्हणण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं !! महाराष्ट्राला जसा कुस्त्यांचा छंद पूर्वीपासूनच आहे तसें त्याला खायलाही चांगलें चमचमीत पाहिजे असतें. चारी ठाव जेवण्याच्या कामांत महाराष्ट्रीय लोक कोणालाही हार जाणार नाहींत! गुजराथेंत तुपावर भर जास्त, दिल्ली

आग्रा, काशी, मथुरा या प्रांतांत साखर अधिक प्रिय, तेलंगणांत चिंचेचें खार मान्य, कर्नाटकांत तिखट व तेल यांची भक्ति–तसा महाराष्ट्रांत विशेष कोणताच नसून सर्वच पदार्थ समधातपणानें व सारख्या आवडीनें महाराष्ट्रीय लोक खात असतात. कुस्त्यांची आवड, मारुतीचीं मंदिरें, तालीमखाने, आखाडे या सर्वांवरून त्यांच्या वीरत्वाची जशी ओळख पटते, तसा षड्रस पदार्थांचे व नानाविध पक्वान्नांचे विविध प्रकार करून ते सुस्वादपूर्वक खाण्याच्या आवडीवरून त्यांच्या रसिकत्वाचाहि परिचय होतो. फार तिखट नाहीं, फार खारट नाहीं, फार आंबट नाहीं, फार गोड नाहीं, असे नानाविध स्वादिष्ट पदार्थ रसिकपणानें खाण्याची रखवताही महाराष्ट्रीयांसारखी दुसऱ्या कोणांत नाहीं. खाण्याचे नानाविध पदार्थ रुचिपूर्वक सेवन करण्याची महाराष्ट्रीयांची करामत विलक्षण आहे खरी, तथापि हेंही लक्ष्यांत ठेविलें पाहिजे कीं भक्तिरसास्वादनानें वैराग्याचा संचार अंगीं झाला किंवा वीररसानें स्वातंत्र्यप्रीतीची ज्योत अंगीं पेटली कीं मराठ्यांना ह्या उच्च भावनांपुढें खाण्यापिण्याचें भानही उरत नाहीं. ह्मणून विलक्षण रसिकता व तसलाच आडदांडपणाचा कंटकपणा या गुणांत ते कोणालाही हार जाणार नाहींत. पुढें मुक्तेश्वरानें भोजनप्रकाराचें वर्णन केल्याचें जें वर्णन येणार आहे तें पाहून कोणास वाटेल कीं ‘ या विषयाचें कवीला एवढें काय महत्त्व वाटलें असावें?’ तर प्रस्तुत विषयाचें महत्त्व तसेंच आहे. चतुर्विध पुरुषार्थाचें मूळ शरीर आहे व शरीर अन्नाधीन आहे. मनाचे सर्व व्यापार ज्या तऱ्हेचें व जसें अन्न आपण खातों त्यावर अवलंबून आहेत. अन्न परब्रह्म आहे असें श्रुति सांगते व आपला अनुभवही आहे. तैत्तिरीयोपनिषदांतर्गत भृगुवल्लींत अन्नाचें व अन्नदानाचें महत्त्व व पावित्र्य वर्णिलें आहे. ‘ अन्नं ब्रह्मेति व्यजानात् ’ ‘ अन्नं न निंद्यात् ’ ‘ अन्नं न परिचक्षीत ’ म्ह० अन्न देणाऱ्याला निवारूं नये किंवा अन्न पानांत टाकूं नये, ‘ अन्नं बहु कुर्वीत ’ म्ह० अतिथींना देण्यासाठीं पुष्कळ अन्न संपादावें, इ० वचनें मननीय आहेत. गीतेंत भगवंतांनीं (अ० १७) त्रिविध आहाराचें वर्णन केलें आहे तें ज्ञानोबारायांच्या भाष्यासह अवश्य पहावें. ‘जैसा घेपे आहार । धातु तैसाचि हो आकार । आणि धातुऐसा अंतर–। भाव पोखे ॥ ११६ ॥ एरवीं तरी पाही । स्वभाव-

वृद्धीच्या ठायीं । आहारावांचूनी नाहीं । बळी हेतु ॥११४॥ ( ज्ञाने० )
असो. आपल्या आहारांत सामान्यतः सर्व रस आले असून तो आरोग्य-दायक, पवित्र व संतोषजनक आहे. सर्वांना सर्वच पदार्थ नेहमीं मिळतात असें नाहीं, कधीमधीं कोणाला कांहीं मिळतात, पण म्हणून समाजशास्त्रज्ञ कवीनें त्यांचें वर्णन करूं नये असें थोडेंच आहे !

( १ ) कौरवपांडवांच्या बाळपणच्या एका वनक्रीडेचें वर्णन आदि० अ० २९ मध्यें आलें आहे. खेळानंतर सर्वांचें भोजन झालें, तेव्हां ज्याला जें जें आवडलें तें तें वाढण्यांत आलें. ' दुग्धशर्करामिश्रित । क्षीरभोजनीं एका आर्त । एक वटककथिकायुक्त । शाल्योदनें भक्षिती ' ( ८२ ) कोणाला दूधसाखर, कोणाला नुसता भातच वडे [ वटक ] व कढी [ कथिका ] बरोबर खाणें आवडलें. दधिसार [ दह्याची साय ] दुग्धसार [ दुधाची साय ], दध्योदन [ दहींभात ], घृतप्लुत खिचडी, गुळपोळ्या, खाज्या, करंज्या, घृतपुऱ्या, मोदक, अपूप [ अनारसे ] इ० अनेक पदार्थ तयार असून 'चणकवाटाण्यांचे सोले । निंबरसें लवण आलें' म्ह० हरबऱ्याचे [चणक, चणे] व वाटाण्याचे सोले—त्यांत आलें, मीठ व लिंबाचा रस घालून तयार केलेले—असे सोलेहि होते. भोजनोत्तर ' फणसें डाळिंबें जांभळें । द्राक्षें नारिंगें अमृतफळें । अंजिरें केळें नारिकेळें [ नारळ । महालिंगें खर्जुरी [ खजूर ] ॥ ८९ ॥ कपित्थें [ कवठें ] गंगाफळें सुरस । इक्षुदंड [ ऊंस ], इक्षुरस ' इ० प्रकारची फळफळावळहि होती.

( २ ) नारळ, कंकोळ, लवंगांचा उल्लेखही [ सभा० अ.८—१३७] आहे.

( ३ ) राजसूययज्ञप्रसंगीं ' यादव कौरव सुहृदांतें । ऋषी राजे वृद्ध वडिलांतें । द्रौपदी वाढील उदारहस्तें । अन्नपूर्णा भगवती ' ॥ ३१ ॥ ( सभा० अ० ९ ) याप्रमाणें उदारहस्त द्रौपदीची वाढण्याच्या कामावर नेमणूक झाली होती. द्रौपदी पाककर्मांत निष्णात व वाढण्यांत उदार होती हें प्रसिद्ध आहे. ' कोणी भक्ष्य कोणी भोज्य । कोणी दुग्ध कोणी आज्य ' याप्रमाणें मागमागून तिची धांदल उडवीत. श्रीकृष्ण जेथें प्रत्यक्ष हजर तेथें काय कमी होतें? 'शर्करेचिया वाळवंटीं । घृतसरिता धांवती लोटीं'

स्वयंपाकाचा घमघमाट सुटलेला—असा कीं स्वर्गीं देवांच्या तोंडाला पाणी सुटावें ! दधिमधूंचें सरोवर झालें होतें. ओदन [ भात ] वरान्न [वरण] शाक [ भाज्या ] यांचे पर्वत उभे होते. घारीसुद्धां अमृतभक्ष्य इंद्राला टुकटुक करीत होत्या ! ' कथिका वटक अतिसोज्वळ ' म्ह० वडे, कढी, पुरणपोळी, लाडू यांची लोकांना आवड होती असें दिसतें. मांडे इतके सफेत होते कीं, पौर्णिमेचा जणु चंद्रप्रकाशच ! कानवले आंत खसखस घातलेले किती प्रकारचे होते ! घृतपुऱ्या [ तुपांतल्या पुऱ्या ], वेळा [ वेलदोडे ] मिरीं घमघमित ' घालून केलेल्या अरुवार [ पातळ, नाजूक ] पूर्णपोळ्या हें मुक्तेश्वराच्या वेळचें मुख्य पक्वान्न दिसतें. अष्ट वटक म्ह० उडीद, हरबरे, तांदूळ इ० आठ धान्यांचे बनविलेले 'अष्टवटक,' तशींच पांच प्रकारचीं वरान्नें [ वरणें ], आठ प्रकारच्या शिखरिणी [ शिकर्णी ], कोशिंबरी, कुटें, सांबारीं, रायतीं, ' पापड सांडगे सांडया । तिळवड कडकणें कुरवडिया । मिरगुंडी मुगवडिया । ' किती प्रकार सांगावे ? तक्र शक्रासी दुर्लभ ' पण तेथें विपुळ होतें. असा भोजनप्रकार एक संवत्सरपर्यंत चालला होता. हें वर्णन मूळ भारतांत नाहीं.

[ ४ ] अभिमन्यूच्या विवाहाचें वर्णन [ विराटपर्व अ० ८ ] फार रमणीय आहे. देवकप्रतिष्ठाविधानापासून झेंडा नाचविण्यापर्यंतचे आजचे लग्नांतले सर्व सोहळे ३०० वर्षांपूर्वी असेच होते हें ह्या प्रकरणावरून व विशेषत: नाथांच्या ' रुक्मिणीस्वयंवरा ' वरून उघड होतें. आपण फक्त भोजनप्रकारच पाहूं. 'सूक्ष्म ओदन श्वेतवर्णीं' म्ह० पांढऱ्या शुभ्र तांदुळाचा बारकाचा भात व त्याशेजारीं पांच प्रकारचीं वरणें—कांकीं ज्याला जें रुचेल तें त्यानें घ्यावें !– ' जया रुचे जें आवडे । तें तेणें सेविजे कोडें । यालागीं पांच वरान्नें गोडें । ओदनानिकटीं वाढिलीं ' [ ५९ ]

' सेवया सरळिया मालतिया । गव्हले बोटवे कुसुमकाळिया ' यांतले बहुतेक प्रकार पुरुषांस नसले तरी आजच्या स्त्रीवर्गास चांगले माहीत आहेत हें घरांतल्या अनुभवावरून सांगतां येतें !

कोरवडे कथिकावडे । दधीवडे मधुवडे ।
चिंचवडे निंबवडे । रायवडे–अरुवार [ खुसखुशीत ] ।। ६१ ।।

तुपांतले घारगे, श्वेत गुळवरिया [ गुरोळ्या ], साखरमांडे, पुऱ्या,

क्षीरधारोळ्या, तसेच सेवयाचे, बिब्याचे, चारोळ्यांचे, खसखसखोबऱ्यांचे, अक्रोडाचे, बदामाचे, पद्मकंदाचे, फणसबीजांचे, चणकपिष्ट वडियांचे, इ० अनेक प्रकारचे लाडू:—

खाज्या करंज्या अनारसे । फेणिया घृतपुरिया पयरसें ।

मुगवड्या, मुगधिरडीं, वेटण्या ( कडबोळीं )–' वेटण्या भक्षितां आवडी । मुखपालटाकारणें ! '–सुवासिक पाणी वाढणारे व वाळयाच्या पंख्यानीं वारे घालणारेही पंक्तींत हिंडत होते:—

वाळेकर्पूरसुवासीं । उदक ओपिती हेमकलशीं ।
भोजनीं भागले तयांसीं । वाळविंझणें विंझिती ।। ६८ ।।

शाखभाज्या, लोणचीं, चटण्या वगैरे बहुत प्रकारच्या होत्या:–

वांगीं तोंडलीं पडवळें । दोडकें कारलीं भोपळें ।
कोहळे कांकडी ' कोवळे । गोड वाळकें परिपाकीं ।। ७१ ।।
पत्रशाखा चक्रवर्ती [ काशीफळ ] । चाकवत अळुशाख मेथी ।

' कडोचीं [ कारलीं ] कोमलें तळलीं घृतीं ' त्याप्रमाणेंच अरुवार काचऱ्या–भाज्या आतां पुरे झाल्या ! आतां लोणचीं घ्या:—

बेलें नेपतीं आवळें । कांकडीं करवंदें साळफळें ।
भोंकरें माइनी सेवगें मुळें । कोंभ कोंवळे वंशाचे [ बांबूचे ] ।।
आंबे आलें निंबे सुरसें । हळदी कचोरिया सुवासें ।
सुरण मिरें पिप्पली घोसें । कुहरिया आणि खरसिंगें ।। ७५ ।।
ऐसीं लोणचीं चाखतां ओठीं । अरुची पळे बारावाटीं ।
जैसें धन्वंतरियाचे दृष्टी । दोष पळती दशदिशा ।। ७६ ।।

भोजनांत तूप उत्तम सुवासिक ताजें पाहिजे, नाहीं तर अशा सुंदर जेवण्याची गोडी जाते, म्हणून ' नवनीत साजूक सद्यस्ततें ' अशीं घृतें होतीं. तीं हिमटेपणानें वाढीत होते काय ? छे ! ' वाटिया उचंबळती घृतें ' कोणाला पातळ तूप आवडतें व कोणाला घट्ट आवडतें. तेथें दोन्हीं होतीं. ' एक शोधिलीं नवनीतें । एक थिजलीं सुवासें ' आटीव दुधाच्या व तवक्षीराच्या [ तवकिलाच्या ] वाटया रगड. चंद्रकळेचा रस गाळून त्यांत सुवास मिळवावा–' ते (अशा) कथिकेचा घेतां वासू ; परतें म्हणती अमृता ! ' त्या सुंदर कढीपुढें अमृत काय पदार्थ आहे ! ' कामधेनूच्या

तर्के ' म्ह० गाईच्या दुधाची कढी अशी खुमासदार बनवलेली कीं तिचा एकदां स्वाद मिळेल तर इंद्रसुद्धां मृत्युलोकीं मनुष्य होऊन वस्ती करायला येईल ! तक्रतिथिनी [ताकतई] भातावर, मग काय रुची त्या भाताची ! आमटीं, मेतकुटें,—

बदरी कपित्थ आम्रचूर्ण । अंबसोलसालचूर्ण ।
मिरें यांचें पित्तशमन । दक्ष जन सेविती ।। ८५ ।।
ऐशा नानाविध कथिका । भिन्नभिन्नपात्रीं भरल्या देखा ।
ज्या कां आस्वादत्तां मुखा । ओदन चाले द्विगुणें ।। ८६ ।।
नानाशाकारसांचीं सारें । ओदनासंगीं अत्यंत मधुरें ।
जें सेवितां कुपथ्यवारें । कदाकाळीं बाधेना ।। ८७ ।।
सांडया कुरवडिया पापडें । अळण सांबारीं स्वादिष्ट गोडें ।
कोशिंबिरीं रायतीं मिरगुंडें । मेथकुटें मघमघिती ।। ८८ ।।

आणखी वर्णन किती करावे ? ' परम भाग्याचे जेवणारें । जे जेविती तये पंक्ती ! ' यांत संशय काय ? ' विराटभार्येची कुशलता ' सर्वांनीं वानिली. ' सर्व कर्मीं ब्रम्हभावना ' या भावनेनें विराटराजानें सर्वांना याप्रमाणें महिनाभर भोजनें दिलीं. विस्तार होईल ' म्हणुनि आच्छादिला ठावो ' म्ह० आतां हें वर्णन आवरतें घेतों ! शेवटचा एकच गोड घांस. श्रीकृष्णपरमात्म्याच्या पंक्तीचा लाभ ज्यांना येथें मिळाला ते धन्य होत.

कृष्णपंक्तींचे जेविले जाणा । ते आंचवले जन्ममरणा ।
कृष्णरंगीं रंगून वदना । श्रीकृष्णाचि झाले मानसें ।। ९५ ।।

अभिमन्युविवाहप्रसंगींच्या या भोजनाचें हें वर्णन वाचून असें वाटतें कीं सवाई माधवराव पेशव्यांच्या लग्नप्रसंगीं नाना फडणविसानें मुक्तेश्वराचा सल्ला खास घेतला असावा ! ४० ओव्या नुसत्या पक्वान्नें, भाज्या, लोणचीं, कोशिंबरी, रायतीं यांच्या वर्णनास कवीनें दिल्या आहेत ! मुक्तेश्वराच्या वर्णनांत आले नाहींत असे कोणकोणते पदार्थ पेशव्यांच्या लग्नांत अधिक होते याचें संशोधन करून तें सविस्तर प्रसिद्ध करण्याची जबाबदारी इतिहाससंशोधकांवर येऊन पडते !

( ४ ) असेंच भोजनाचें मनोरम वर्णन 'थालीपाक' प्रकरणांत [वन० अ० ११ ] आलें आहे. दुर्योधनाचे चिथावणीवरून दुर्वासऋषी पांडवांचें

सत्व हरण करण्याकरितां मध्यरात्रीं ऋषिगणासमवेत द्रौपदीपाशीं येऊन भोजन मागूं लागले. त्या सतीनें थाली पालथी घातली होती. सत्व जातें या भीतीनें तिनें श्रीकृष्णाचा धांवा केला; देव आले. थालीला लागलेलें पान या जगन्नाथानें खातांच जगाचें पोट भरलें. दुर्वासादि ब्राह्मण जेवायला बसले. या प्रसंगीं जो भोजन प्रकार वर्णिला आहे तो सामान्यतः वरील सारखाच आहे; तरी त्यांतील ४।५ ओंव्या देतों व पुढें अतिरिक्त भोजनानें ब्राह्मणांची काय दशा झाली याचें मुक्तेश्वरानें अत्यंत विनोदचतुर वर्णन केलें आहे त्याचा प्रकार सांगतों:—

अमृतप्राय शिखरिणी । कथिका वटक शाखाश्रेणी ।
उष्ण वाफा धांवती गगनीं । घमघमीत सुवासें ॥ ११६ ॥

मोगऱ्याच्या कळ्यांसारखा फुललेला भात 'वोगराळ्यांनीं' वाढलेला, त्यावर 'घृत साजूक पंचधारा' नंतर 'पूर्ण पोळिया आज्यें तर्ते' इ० अनेक पदार्थ वाढले होते. 'गयेची शर्करा' तेव्हां इकडे प्रसिद्ध होती असें दिसतें.

आम्ररसेसीं साखरमांडे । दधिसायेसीं कुरवडे ।
दुग्धसायेसीं वांकुडे । कानवले स्वादिष्ट ॥ १२९ ॥
दुग्धें आळूनि केलीं दाटें । श्वेत पोळिया शुभ्र सपीटें ।
जेवितां प्रेम वाटे मोठें । अधिकाधिक सेवाया ॥ १३० ॥

अनेक पक्वान्नें, लोणचीं, भाज्या वगैरे दिव्य पदार्थ ब्राह्मण यथेष्ट जेवले. मागील वर्णनांत 'गाजरें' नव्हतीं तीं यांत आहेत ! असो.

अमर्यादेनें फुगलीं पोटें । धोत्रें ढिलाविती बोटें ।
रिता ठाव न दिसे कोठें । उदक तेंहीं घ्यावया ॥ १३७ ॥
'भोजन करितां गेला प्राण । पुढती मिळेल होतां जनन ।
परंतु ऐसें हें परान्न । जन्मोजन्मीं न देखों' ॥ १३७ ॥
ऋषींस तृप्ती झाली मोठी । चंद्रमंडळीं लागली दृष्टी ।[1]
वस्त्रें न दिसती तळवटीं । फिटलीं किंवा राहिलीं ॥ १४१ ॥
म्हणती 'माथां असती मुखें । तरी होतें बहु निकें ।

---

१ चंद्री लागली. डोळ्यांची बुबुळें मोठीं होऊं लागलीं. मरणाची पूर्वतयारीच ती !

ग्रास उचलूनी हस्तकें । ऊर्ध्व वदनीं घालितों ! ' ।। १४२ ।।
करूनि सागरतुल्य उदर । सेविजे धर्माचेंचि घर ।
द्रौपदीहस्तीं निरंतर । हेंचि भोजन करावें ! ' ।। १४३ ।।
उठले हस्त प्रक्षाळूनी । विडे दिधले त्रयोदशगुणी ।
बैसका न करवे म्हणोनी । सुखशयनीं पहुडले ! ।। १४४ ।।

ह्या कथेचें तात्पर्य हेंच आहे कीं:—

कृष्णकृपेच्या शशिमंडळीं । सर्वदा वसती पांडव बळी ।
ते पोळिजेत विघ्नजाळीं । हें कैसेनी घडेल ? ।। ।। १५४ ।।
मनीं कृष्ण वदनीं कृष्ण । भूतमात्रीं देखे कृष्ण ।
त्यांचीं विघ्नें होती कृष्ण । स्वयें होत सुखदाता ।। १५९ ।।

तीनशें वर्षांपूर्वीं भोजनशास्त्राची प्रगति कोठपर्यंत झाली होती, हें या तीन प्रसंगांवरून समजेल. पाकशास्त्रज्ञांनीं हे प्रसंग पाहावे, म्हणजे पाक-शास्त्रप्रवर्तक दुसरे बाजीराव यांनीं या महत्त्वाच्या विषयांत काय काय सुधारणा केल्या आहेत हें समजून येईल. 'तक्र शक्राशीं दुर्लभ' ही म्हण सभापर्वांत आहे. वाचकांनाही अजीर्ण होईल या भयानें मी हें वर्णन आवरतें घेतों. नवरसांत साहित्यशास्त्रकारांनीं ' अन्नरसा ' चा अंतर्भाव केला नाहीं, तथापि नवरसांचा आत्मा अन्नरस आहे हें सर्वमान्य होणारें आहे. कवि म्हणतो:—

अन्न द्यावें अन्न भक्षावें । अन्नापरतें नाहीं बरवें ।
अन्न परब्रह्म हें स्वभावें । वेद बोले निश्चितीं ।। १२० ।।
अन्नाचि एक परब्रह्म । यावेगळा सर्वही भ्रम ।
अन्नोदकीं सुखविश्राम । त्यावीण श्रम सर्वही ।। १२' ।।
उबगोनियां अमृतपाना । अमर इच्छिती कथिकोदना
मृत्युलोकावेगळी जाणा । तृप्ति नाहीं द्वयलोकीं ।। १२२ ।।
स्वर्गा आणि पाताळांत । नाहीं अन्नसुखाची मात ।
म्हणोनि देवांचा मनोरथ । जन्म इच्छी भूतळीं ! ।। १२३ ।।

## १३ वस्त्रांचें वर्णन.

२२ अन्नामागून वस्त्र हें आलेंच पाहिजे. अन्नवस्त्र यथास्थित मिळालें आणखी काय पाहिजे ? द्रौपदीला भगवंतांनीं अनंत वस्त्रें पुरविलीं व तिची लाज राखली ही गोष्ट प्रसिद्ध आहे ( सभा० अ० १५ ). आतां देवानें आपल्या भक्ताच्या आपत्काळीं जो ' अकरावा अंबरावतार ' घेतला तो त्या विशिष्ट कार्यापुरताच होता. भांडारगृहीं ठेवण्यासाठीं दुःशासन वस्त्रें गोळा करायला गेला तेव्हां त्याच्या हातीं त्यांतलें एकही वस्त्र लागलें नाहीं; मग तीं वस्त्रें कवीच्या हातीं कोठून लागणार ? तथापि ' जें न देखे रवी तें देखे कवी' या न्यायानें मुक्तेश्वरानें आपल्या प्रतिभेनें कल्पनासृष्टींतून नानाप्रकारचीं उंची वस्त्रें काढून तीं द्रौपदीला नेसविलीं आहेत ! त्या वस्त्रांत तो आपल्या ' गोदातटीचे चंद्रकिरणासारखें शुद्धवटही ' काढायला विसरला नाहीं ! साक्षात् भगवान् जेथें अनंत वस्त्रें आपण निजांगें झाला तेथें त्या दिव्य वस्त्रांचें मोल कोणीं करावें ? पहिलें 'अंशुक' आंसडून फेडल्यावर आंत 'क्षीरोदक' ( पांढरें पातळ ) निघालें. 'नेसली वस्त्राआड वस्त्रें ' अशी दुर्जनांना शंका आली. तेंहि फेडलें ! तेव्हां वस्त्रांत वस्त्र अशीं अनंत वस्त्रें निघालीं. ' देव नेसवी अनंत हस्तीं । दों भुजांनीं फेडील किती ? ' प्रथम 'दाळिंबी कुसुमरंगी' उंचीं वस्त्र निघालें. नंतर ' झगमगी शुद्ध रजत पाटाऊ' ( पीतांबर ) निघाला. ' सभा झाली लिखिताचित्र । पातीं ढाळूं विसरले नेत्र ! ' वस्त्राहून मोलागळें वस्त्र निघूं लागलें. यानंतर क्रमानें सप्तद्वीपींचीं व छपन्नदेशींचीं चित्रविचित्र वर्णांचीं उंची वस्त्रें निघालीं. मूळ भारतांत किंवा दुसऱ्या कोणत्याही भारतग्रंथांत या वस्त्रांचें बिलकूल वर्णन नाहीं. प्राचीनकाळीं भरतखंडांत कसल्या प्रकारचीं लुगडीं कोणकोणत्या प्रांतांत तयार होत होतीं याचा शोध घेणाऱ्या स्त्रीवेषमीमांसकांना हें मुक्तेश्वराचें वर्णन फार उपयोगीं पडेल.

कांहीं लुगडीं पलाशकुसुमासारखीं, कांहीं शेंदूर कन्हेरी किंवा गुंजा यांच्या वर्णाचीं, कांहीं सुवर्णकेतकीसारखीं पिवळीं, कांहीं तमाळदळासारखीं निळया वर्णाचीं, कांहीं अतसीपुष्परंगाचीं ( जवसाच्या फुलांसारखीं निळींजांभळीं ), कांहीं नीलोत्पलशुकासारखीं हिरव्या रंगाचीं, अशीं

नाना पुष्पवर्णाचीं लुगडीं निघालीं. कांहीं कांठाला पिवळीं असून पदराला मोत्यीं खिळलेलीं, कांहीं कोकिळकस्तुरी वर्णाची ह्म० काळीं असून पदराला तांबुस पद्मराग किंवा माणिकें जडलेलीं, कांहीं ' दुग्धसमुद्रीं ओप दिलेलीं' म्ह० दुधांत भिजवून उन्हांत वाळवून शुभ्र केलेलीं, कांहीं अभ्रकाचीं पुटें ओलेपणीं दिल्यामुळें तकाकणारीं, कांहीं काश्मीर (स्फटिक) कर्दळीगर्भ किंवा दुग्ध यासारखीं पांढरीं शुभ्र, कांहीं जांभूळवर्णी, कांहीं धोतरा, पुंडरीक, किंवा शंखासारखीं किंवा रौप्यतगटासारखी हंसढवळीं, ' कांहीं तापीतीरचीं अतिमवाळ, पातळें, भरीत म्ह० कलाबतु भरून कशिदा काढलेलीं, मुगी म्ह० काळ्या व तांबड्या रेशमाच्या मुगाएवढ्या बारीक चवकटी करून काढलेलीं, कांहीं इंद्रगोप म्ह० मृगनक्षत्रारंभीं येणारा जो तांबडालाल किडा त्यासारखीं, कांहीं कनकपत्रवेलीचीं, कांहीं हरिहरांचीं नांवें किंवा देवाचीं नांवें किंवा चित्रें काढलेलीं अशीं ' सप्तद्वीपवतीचीं वस्त्रें । छपन्नदेशीचीं विचित्रें । कृष्णहस्तींचीं पवित्रें । पर्वतप्राय पडियेलीं'—कारलीं, चंद्रकळा, साड्या, चुनड्या, चौकड्या किती सांगाव्या!

> तैलंग त्रिगुण मल्याळीचीं । सिंहलकोशलवैदर्भीचीं ।
> गौडगुर्जरबंगालीचीं । बहुवर्णाची सावुलीं ( लुगडीं ) ॥
> प्रावरणाचा पीतांबर । शेवटीं नेसवी जगदीश्वर ।
> तेजें ग्रीष्मींचा दिनकर । किंवा वीज प्रळयाचीं ॥

असो याप्रमाणें भगवंतानें तऱ्हतऱ्हेचीं लुगडीं नेसवून आपली बहीण व भक्त जी द्रौपदी तिची लाज राखिली कीं जेणेंकरून ' उघडें न पडे अंगुष्ठ नख । न दिसे मुख अपवित्रा. ' कौरव फजीत पावले.

## १४ सृष्टिवर्णनाची बहार.

२४ मुक्तेश्वराच्या वर्णनशैलीचे प्रकार आपण येथवर पुष्कळ पाहिले. वर्णनीय वस्तु कोणतीही असो, आंतरिक मनोविकाराचें वर्णन असो कीं बाह्य सृष्टींतल्या सजीव निर्जीव पदार्थांचें वर्णन असो, मुक्तेश्वर तें वर्णन इतकें हुबेहुब करितो कीं त्या त्या वस्तूचें साक्षाद्दर्शन झाल्याप्रमाणें वाचकांस वाटतें व वाचकही देशकालादिकांचें भान विसरतो. मुक्तेश्वराच्या कवितेंत सृष्टिवर्णनें बहुत आहेत. मनुष्याचीं, मनुष्याच्या स्वभावाचीं व कृती-

चीं वर्णनें हीं सृष्टिवर्णनांतच येतात; कांकीं मनुष्यप्राणी सृष्टीच्या बाहेर थोडाच आहे ! पण अशा प्रकारचीं वर्णनें आपण येथवर बरींच पाहिलीं आहेत म्हणून सृष्टिवर्णन असें ज्याला अलीकडे रसिक लोक समजतात त्या जातीचे कांहीं नमुने दाखवितों. पूर्वीं शकुंतलाख्यानांत [पृ० ५५ ते ५७] असा एक उत्कृष्ट नमुना आपण पाहिला आहे.

पंडुराजा उभय स्त्रियांसह हिमाचलावर गेला तेव्हांचें हिमाचलाचें सुंदर वर्णन [ आदि० अ० २७ ] मुक्तेश्वरानें तो प्रदेश स्वतः पाहिल्याप्रमाणें केलें आहे:–

सेवेसि घेऊनि उभय पत्नी । जटाधारी वल्कलवसनी ।
कंदमूळफळसेवनी । महारण्यीं प्रवेशला ।। ३९ ।।
हिमालयाचेनि परिसरें । सिद्धाश्रमगुहागव्हरें ।
हिमोदकाचीं कासारें । स्फटिक तैसीं भासती ।। ४३ ।।
हिरेकनकाचें वाळवंट । खडक सोमकांती निघोट ।
माजी जान्हवीजळाचे लोट । दुग्धवर्ण भासती ।। ४४ ।।
तेथें तापसांचा मेळ । दृष्टीं देखिला निर्मळ ।
ज्याचेनि दर्शनें तात्काळ । चित्तशुद्धी पापिया ।। ४५ ।।
तेथूनि पुढां अतिशोभित । गंधमादन पर्वत ।
जेथें औषधी अमृतभरित । महाभूतीं रक्षिल्या ।। ४६ ।।
इंद्रद्युम्न सरावर । दृष्टी देखिलें मनोहर ।
हंसकूट लंघूनि वीर । शतशृंगा पातला ।।४८ ।।
ताम्ररजतसुवर्ण भूमिका । पद्मरागपाषाण देखा ।
चिंतारत्न–सरोवर वापिका । मठमंडप उभविले ।। ५२ ।।
शतशृंगगिरिपरिसरीं । काननें लागलीं चौफेरीं ।
वृक्ष लवले फळसंभारीं । तृप्ती देती परिमळें ।। ५४ ।।
पर्वतनितंबाहूनि देखा । सरिता वाहती अधोमुखा ।
जैशा मेखळे पल्लवसडका । गजाननातें शोभती ।। ५५ ।।

ह्या सर्व वर्णनाला मुळांतल्या एकाच श्लोकाचा आधार आहे:—

महानदीनितंबांश्च गहनान् गिरिगव्हरान् ।
सन्ति नित्यहिमादेशान्निर्वृक्षमृगपक्षिणः ।। अ० १२०–१२।।

पण या मूळ चित्राला मुक्तेश्वरानें आपल्या प्रतिभेचे रंग भरून तें किती उठावदार केलें आहे ! या वर्णनावरून मुक्तेश्वर बद्रिकेदाराकडे जाऊन आल्यावर त्यानें आपलें भारत रचिलें असावें असें वाटतें. प्रस्तुत लेखकालाही हिमाचलाकडचे अतीव रम्य भूभाग पाहण्याचा प्रसंग असल्यामुळें वरील वर्णनाची यथार्थता जाणवत आहे.

आतां एका भीषणरात्रीचें व नंतरच्या प्रभाताचें वर्णन पहा [ आदि० अ० ३६ ]:—

भीमसेन पाहे दृष्टी । तंव अंधकारें कोंदली सृष्टी ।
गुल्मलता वृक्षदाटी । तृणें मार्ग लक्षेना ॥ ५४ ॥
निशाचरी श्वापद पक्षी । थोर गर्जना करिती कक्षीं ।
वोळकंबली महावृक्षीं । आस्वलें आणि वाघुळें ॥ ५५ ॥
वनदेवता यक्षिणीपाळें । धुमस घालिती गदारोळें ।
दीपिका लावुनि भंवाळें । गुप्त होती एकसरा ॥ ५६ ॥
प्रेतगण स्मशानवासी । रूपें धरूनि भ्यासुरवेषीं ।
छळिती अशुचि मानवांसी । झोंबती मांस भक्षावया ॥५७॥
दिवाभीतांचे घुंघाट । पिंगळियांचे किलकिलाट ।
भालू भुंकती सैराट । टिटिवे थोर टिवटिवती ॥ ५८ ॥
चक्रवाकांचे आर्तस्वरीं । कुमुदीं भ्रमरांचे झुंकारीं ।
मस्तकमणितेजाविखरीं । जीव आहारा शोधिती ॥ ५९ ॥
असो हे निशा दाटली कोळीं । जेवीं काळपुरुषाची कांबळी ।
ब्रह्मांडदेवतेवरी सगळी । पांघुरविली आप्तत्वें ॥ ६० ॥
ऐसें देखोनि तयेकाळीं । भीमसेन बळियांबळी ।
धैर्यकांस घालोनि कवळी । पांचांतही एकला ॥ ६२ ॥

---

१ रत्न झांकणें समुद्रीं पाडिलें । ब्रह्मांडकरंडा काजळ भरलें ।
विश्वलोचनीं भरोनि उरलें । अपरिमित दशदिशा ॥ —आदि० अ० ४०।४

२ गडद अंधकारावर 'काळपुरुषाची कांबळी' असें मुक्तेश्वरानें रूपक केलें आहे. शेक्सपीअरनें अगदीं हेंच रूपक मॅकबेथ नाटकांत (अंक १ प्र० ५) केलें आहे ! त्यानेंही तेथें Blanket of the Dark असाच उद्गार काढला आहे !

खांदीं वाहूनियां जननी । कडिये माद्रीकुमर दोनी ।
धर्मार्जुना बाहुस्थानीं । पाणितळें कवळिले ॥ ६३ ॥
पाठी देऊनि ध्रुवमंडळा । अगस्तिचक्रा लक्षूनि डोळां ।
वामीं कृत्तिकांचा मेळा । याम्यदिशे चालला ॥ ६४ ॥
झडपाआड मोडीत झाडें । तळवा चूर्ण करीत धोंडे ।
श्वापदसर्पांचीं जुंबाडें । पायातळीं रगडीत ॥ ६६ ॥
शेष वेंचिता अठरा घटिका । पूर्व दिशेनें क्षाळिलें मुखा ।
कुंकुम रेखिलें त्या तिलका । अरुणोदय बोलिजे ॥ ६८ ॥
मार्गवाचार्य उदया येत । तरे अपार क्रमूनियां पंथ ।
पुढें जान्हवीजळाचा वात । शीतळ मंद पातला ॥ ६९ ॥
हस्त आवरितां कुमुदीं । अवमान मानिला षट्पदीं ।
त्यातें आदरें कोकनदीं । पाचारिलें जवळिके ॥ ७० ॥
गाढालिंगनें पडली गांठी । सोडितां दंपत्यें होती कष्टी ।
वस्त्रें वेढिती परी पोटीं । अपूर्णकामें जळजळ ॥ ७२ ॥
वेश्यागारा सोडोनि विट । लोकाचारा मिनले निकट ।
वामी कौळिक धूर्त शठ । वेष घेती शिष्टांचे ! ॥ ७४ ॥

हें सर्व वर्णन अत्यंत मनोहर आहे. भाषाशैली, कल्पनाशक्ति व सृष्ट्यवलोकन या तीनहि दृष्टींनीं वरील अत्युत्कृष्ट उतारा जगांतील कोणत्याही कवीच्या उत्तमोत्तम सृष्टिवर्णनाशीं यशस्वी रीतीनें सामना देईल.

**वर्षाकाळ म्ह०** पावसाळा, त्याचें वर्णन ( वन० अ० १० ):—

यावरी पातला वर्षाकाळ । पंचम ऋतु झाला प्रबळ ।
सुटला पश्चिमेचा अनिळ । मेघमाला मोकली ॥ १९२ ॥
इंद्रचाप धरूनि मुष्टी । रोहिणीमृगाचिया पाठी ।
मेघधारा जीवनवृष्टि । करीत वेगें पातला ॥ १९४ ॥
विद्युल्लतांचे कडकडाट । घनगर्जना गडगडाट ।
गंगादिसरितांचे संघाट । महापूर माजले ॥ १९८ ॥
अठराभार वनस्पती । अंकुरवसनें वेढिली जगती ।
फळशाका धान्यसंपत्ति । पृथ्वी पिके जगातें ॥ १९९ ॥

मुक्तेश्वराला सृष्टिसौंदर्याची मनःपूर्वक आवड असून वनें, उपवनें,

वृक्षवल्ली, पशुपक्षी यांचे रम्य देखावे त्याच्या प्रतिभेला उत्तेजवीत असा-वेत असें जागजागच्या वर्णनांवरून दिसतें. वर्णनौघांत वनोपवनांचा संबंध आला कीं चार दोन सुरस ओव्या बोलल्याशिवाय त्याला राहवतच नाहीं. ' गगनचुंबित तरुवर । माजी तुंबळ सरितापूर ' हे यायचे. ' पीयूषातुल्य शीतळोदकें । अक्षोभ तडागें अनेकें ' त्याला दृष्टिसमोर दिसायचेच. मुक्तेश्वराला अरण्य म्हटलें कीं ' नाना वनें नाना द्रुम । नाना सरितांचे संगम । नाना श्वापदें विहंगम । नानावर्ण भासती ' ( वन० १०–१२ ) ही सारी सृष्टीची रम्यता त्याच्या दृष्टीसमोर उभी राहते, आणि मौज ही कीं तो जसा निर्जन वनोपवनांत रमतो तसाच राजेरजवाडे, त्यांचे दरबार, राष्ट्रांत चाललेल्या उलाढाली यांचींहि वर्णनें तो मनापासून सुंदर करितो. दुष्यन्त, नळ व हरिश्चंद्र यांच्या वर्णनांत व राज्यपद्धतींत मुक्तेश्वराला उत्कृष्ट राजकारणकौशल्य दाखवितां येतें.

समुद्रवासीय नानायवनीं । रत्नें वसनें अनेकवर्णीं ।
विशाळ कांचेच्या रांझणीं । सुविचित्र फळातें ॥(सभा० १२–१७२)

ही ओंवी पाहिली कीं, मुक्तेश्वर १९२२ सालीं मुंबईच्या कोटांतून फिरून गेला होता कीं काय अशी शंका येते !

नगरशृंगार !—बडा पाहुणा बड्यांच्या घरीं आला म्हणजे सारी नगरी शृंगारून त्याचा सत्कार कसा होतो याचें वर्णन सुभद्राविवाहानंतर रामकृष्ण हस्तिनापुरास (दिल्लीस) आले तेव्हां केलेलें पहा. (आदि० अ० ४८)

वार्तिक जाणविती गोष्टी । धर्मराजनृपाचे भेटी ।
घेऊनि यादवांच्या कोटी । रामकृष्ण पातले ॥ १ ॥
द्वारकेहूनि बळ अचाट । पातलें इंद्रप्रस्थानिकट ।
कुंजरभेटींचा बोभाट । जाणवीत धर्मातें ॥ २ ॥
सन्मुख धाडोनि माद्रीकुमर । रायें शृंगारिलें नगर ।
मखरें तोरणें अपार । गुढिया नगरीं उभविल्या ॥ ३ ॥
मंडप घातले अपार । अवघे नगरीं झगझगीत थोर ।
दिधलीं वितानें विस्तार । अतिसुंदर साजिरे ॥ ४ ॥
श्रीगंध कस्तुरी केशर । शिंपोनि मार्ग केले सुंदर ।
स्थळोस्थळीं कृष्णागर । परिमळधूपें धूपिले ॥ ५ ॥

स्थळोस्थळीं मुक्ताझल्लरी । नानारंगीं रंगकूसरी ।
चित्रीं चितारिलीं परोपरी । सुशोभित मंदिरें ।। ६ ।।
अवघीं घरें शृंगारिलीं । पटपाटावे बांधिली ।
ध्वजपताका गगनमंडळीं । चित्रविचित्र शोभती ।। ८ ।।
उपायनें घेऊनि भेटी । पातल्या पौरांच्या कोटी ।
अक्षवाणें कनकतार्टी ! वोवाळिती जनवधू ।। ११ ।।

गोरक्षणकार्यांत पडलेल्या लोकांना गाई व बैल या मुक्या जनावरां-विषयीं करुणेनें भरलेला पुढील उतारा पाहून ( वन० अ० १ ) बरें वाटेल. शेतकऱ्यापासून बैलाला फार त्रास होतो यामुळें कळवळून कामधेनुनें इंद्राकडे गाऱ्हाणें नेलें व इंद्रानें पाऊस पाडून त्या कृश बैलाला क्लेशमुक्त केलें एवढीच साधी गोष्ट मूळांत आहे. श्रीधरानें हा प्रसंग गाळला आहे व मोरोपंतानें एकाच आर्येंत त्याची बोळवण केली आहे पण मुक्तेश्वरानें स्वतंत्र बुद्धीनें सर्व वर्णन पदरचें घालून गोधनांच्या कैवारानें फार कळवळ्यानें लिहिलें आहे. गाय इंद्रास म्हणते:—

माझे पुत्र वृषभ सकळ । कष्ट भोगिती सर्वकाळ ।
दुःख देखोनि तळमळ । मज अपार वाटतसे ।। १२० ।।
नांगर, शकट, रथ, गोणिया । धान्यमळणीं तेलघाणिया ।
पाठीं बहुभार वाहोनियां । अहोरात्र शिणताती ।। १२१ ।।
दगडमाती काष्ठभार । सदा मारिती निष्ठुर ।
गाळीप्रदानें अपार । कष्ट करितां वोपिती ।। १२२ ।।
शीत उष्ण पर्जन्य वात । निराश्रयें सर्व साहत ।
भुके तृणोदक नेदित । उपेक्षिती निर्दय ।। १२३ ।।
वत्सें बंधनीं तळमळती । भुकेल्या आक्रोशें बोभाती ।
धेनुकांसेहूनि काढिती । पय प्राशितां मातेचें ! ।। १२४ ।।

बैल नांगराला लावतात, शकटें म्ह० माल वाहून नेणाऱ्या गाड्यांला जुंपतात, रथांला म्ह० युद्धोपयोगी सामान नेण्याचे कामीं योजतात, धान्याच्या गोण्या त्यांच्या पाठीवर घालून नेतात, शेतांत धान्यमळणीच्या कामीं किंवा तेलाचे घाणे ओढण्याचे कामीं त्यांचा उपयोग करितात, याप्रमाणें बैलांना अहोरात्र राबवून हे कठोर लोक बैलांचे उपकार स्मरण्याचें

तर दूरच–पण त्यांना कठोरपणें दगडमातीकांठ्या यांनीं मारून वर वेड्यावांकड्या शिव्या देतात ! लहान वत्सांना दुधाच्या लोभानें हे पोटभर ‘ मातेचें पयही पिऊं देत नाहींत !’ कामधेनूची ही तक्रार ऐकून इंद्रानें सहानुभूति दाखविली व “ सर्वच बैलांना असें दुःख देणारे क्रूरात्मे भेटतात असें कांहीं नाहीं; बैलांतही इतर प्राण्यांप्रमाणें कांहीं सुखी व कांहीं दुःखी आहेत, दीनदुर्बळांसाठीं इतकें कासावीस न होतां सभाग्य सुखी बैलांकडे पाहून आनंद मानीत जा ” असें अधिकाराच्या तोऱ्यानें उत्तर केलें ! पण कोरड्या सहानुभूती दाखविणाऱ्या त्या सत्ताधीशाचें हें उत्तर ऐकून कामधेनूचें समाधान झालें नाहीं. शिवाय ती पडली आई. आईचें हृदय किती कोमळ असतें ! तिचा ‘ सकळांवरी समान स्नेह ’ असतो कां कीं, ‘मातृस्नेहाभीतरीं । भेदभावना असेना’. आईला अनेक मुलें असलीं तरी—

त्यांमाजी सात्विकें भाग्यहीनें । जें जें दुःख भोगिती दारुणें ।
त्यालागीं मातेचेनि मनें । खेद अपार पाविजे ।। १३१ ।।

कामधेनु महाबुद्धिमती. इंद्रानें सर्व प्राण्यांविषयीं भूतदया दाखविण्याचें औदार्य प्रगट केलें, त्याला अनुसरून तिनें पुन्हां उत्तर केलें कीं, “सर्वच प्राण्यांत जे जे कोणी उन्मत्तपणानें वागत असतील त्यांच्या तोंडीं दावण घालून त्यांना रस्त्यावर आणणें हें तुमचें काम आहे. बैलांनाही लाजविणारीं माणसें काय कमी आहेत? स्वेच्छ भक्षून काम व मद यामुळें बोकाळणारे व दुर्बळांना बडविणारे जे असतील त्यांना वेदाज्ञेची वेसण घालून विहिताचाराच्या दावणींत बांधून दंडावें असा तुम्हांलाही ब्रह्मदेवाचा हुकूम आहे कीं नाहीं ? ” सुरेंद्र बिचारा निरुत्तर झाला. त्यानें या खटल्यावर अखेरचा निकाल लिहून टाकला:—

“ पुत्रांतुल्य पशूतें पाळी । त्यालागीं मेघ इच्छिले काळीं ।
पाडूनि पिकवी महीतळीं । तृणधान्य सर्वदा ।। १३६ ।।
करिती वृषभांचें पीडण । त्यांवरी पाडुनि अवर्षण ।
शेतीं न पिके तृण धान्य । नासे प्राण दुर्भिक्षीं ।। १३७ ।।
स्वचक्र, परचक्र, टोळ, मूषक, । चिकट, तांबरा, आळिक ।
दुग्धश्रवादि अनेक । रोग उठती धान्यातें ।। १३८ ।।
कष्ट घेउनी सर्वकाळ । न करिती वृषभांचा सांभाळ ।

त्या दोषाचें हें फळ । मी भोगवी तयातें ।। १३९ ।।
वत्सा अभ्यास नाहीं तृणीं । क्षुधित ओढिती कांसेहुनी ।
तेणें दोषें मी क्षोभोनी । क्षय करी वंशाचा " ।। १४० ।।

मुक्तेश्वरासारखा कामधेनूंची फुकट वकीली करणारा असा सकरुण व बुद्धिमान् वकील कोठें सांपडेल ? हा गोरक्षणाचा विषय त्यानें थोडक्यांत इतक्या उत्कृष्ट रीतीनें मांडला आहे कीं वाईच्या चौंडेबुवांना सुद्धां मुक्तेश्वराचे आभार मानावेसेंच वाटेल. आपल्या कवीच्या बुद्धीची व्यापकता, चतुराई व भूतदया हे गुण अलौकिक आहेत असें कोण ह्मणणार नाहीं ? जड सृष्टींत आपल्या प्रतिभेनें चैतन्य ओतण्याचें सामर्थ्य जसें त्यांत आहे तसें सजीव पण खालच्या समजल्या गेलेल्या योनींतल्या जीवसृष्टीविषयींही त्याच्या मनांत अनुकंपायुक्त प्रेम आहे हें वरील गोष्टीवरून दिसून येतें. मुक्तेश्वराचें बोलणें नेहमीं शास्त्रशुद्ध असतें. त्याच अध्यायांत सूर्याच्या वर्णनप्रसंगीं "रस शोषी उत्तरायणीं । जळ मोकली दक्षिणायनीं । औषधी पोषी चंद्रकिरणीं । हें सामर्थ्य सूर्याचें ।। ४३ ।। सूर्यकिरणें होती घन । घनवृष्टीपासाव अन्न । अन्नापासूनि प्रजा जाण । वेदप्रमाण निर्धारीं ।। ४५ ।।" या महत्त्वाच्या शास्त्रीय गोष्टी सांगितल्या आहेत.

इंग्रजी काव्यांत घुबडाचें कोणी कोणी वर्णन केलेलें आढळतें व कांहीं अर्वाचीन कवींचा घुबड फार आवडता प्राणी आहे. रात्रीच्या वेळीं ज्या झाडावर कावळे बसले असतील त्या झाडावर झडप घालून घुबड कावळे मारून जातो. या प्रसंगाचें हुबेहुब वर्णन पहा. ( सौप्तिक० अ० १ )

प्रगटतां रात्रीचें मंडळ । उलूकभयें काककुळ ।
न्यग्रोधपादपीं निश्चळ । सहस्त्रावधी राहिले ।। ३५ ।।
करूनि निद्रेसी सख्यत्व । अज्ञानांसी विकिलें जीवित्व ।
आयुष्यमर्यादेचें सत्व । काळ घेवोनी जातसे ।। ३६ ।।
त्याअवसरीं उलूक घोर । पातला ज्याचें दीर्घशरीर ।
मुखें करीत विकृत स्वर । हर्यक्ष, चंचू पिंगळा ।। ३७ ।।
आयत ग्रीवा नखें तीक्ष्ण । वेगासी तुळावा सुपर्ण ।
तेणें वायसांचें सैन्य । बहुत सांडिलें मारुनी ।। ३८ ।।

सती व सुगृहिणी द्रौपदीचें वर्णन [ सभा. अ. १४ ]:—

त्रैलोक्यलावण्याची खाणी । सकळांविषयीं कुशळ जनीं ।
इंद्रनीळकीळवर्णी । जे ओतिली सुढाली ॥ १५९ ॥
सुवर्णसौंदर्यचंपककळिका । परिमळमल्याचळमल्लिका ।
लावण्यवनींची कनकलतिका । कुचमंडळीं विराजे ॥ १६० ॥
वेदी( कृश )मध्या दीर्घकेशी । नित्यनूतना गुणैकराशी ।
पर्वतकन्येहूनि विशेषी । कसा आगळी सुकुमारी ॥ १६१ ॥

ह्या प्रसंगींचें पंतांचें 'शरदुत्पलपत्राक्षी' इ० वर्णनही सरसच आहे.

हरिश्चंद्राख्यानांत [ अ० २ ] निद्रावर्णन दोनच ओव्यांत अति मार्मिकपणे केलें आहे:—

अपरदेहीची सृष्टिजननी । मानसविलासराजधानी ।
नसोनि साचोकार जनीं । दावी जैसें मृगांबु ॥ २ ॥
कीं श्रमसागरीं वडवानळी । मानसवृक्षीं कामनावल्ली ।
सुरवाडोनि स्वप्नफळीं । सुखदु:खरसेसीं ॥ ३ ॥

नारदमुनि व विश्वामित्रादि ऋषि यांचीं वर्णनें बहुत ठिकाणीं आलीं आहेत तीं अगदीं स्वाभाविक आहेत. येथें एकच ओवी देतों. 'ज्ञान, वैराग्य आणि विवेक यांचा पुतळा' असें साधें गद्य आपण बोलूं. कविवर्य तेंच काव्यात्मक भाषेंत कसें वर्णितात पहा [हरिश्चंद्रा० अ० १]:—

जो ज्ञानारविंदमकरंदू । वैराग्यवल्लीचा मूळकंदू ।
विवेकसागरीचा पूर्णेंदू । तो नारदू पातला ॥ १५ ॥

ह्या एका ओवींत उत्कृष्ट काव्य आहे. या एका ओवीवर एक सुंदर व्याख्यान होईल. ज्ञानावर अनेक पाकळ्यांच्या कमळाचें रूपक कां केलें, ज्ञानभोगाचा किंवा ज्ञानानंदाचा रसास्वाद कसा घ्यावा, शनैः शनैः वाढत जाणाऱ्या वैराग्यावर वल्लीचें रूपक कसें सफल बसतें व व्यासवाल्मीकिशुकांचे गुरु जे नारद त्यांना वैराग्यवल्लीचा मूळकंद कां म्हटलें, तसेंच सागर व चंद्र यांच्या अन्योन्यसंबंधांत कवीला विवेकाची स्फूर्ति कशी झाली याचें वाचकांनीं स्वतःच मनन करावें व नारदांचा दर्शनानंद भोगावा.

वनाचीं वर्णनें आपण पाहिलीं; आतां उपवन, किंवा उद्यान याच्या वर्णनाचें एक स्थळ दाखवितों. हरिश्चंद्र विश्वामित्राच्या आश्रमांत आला तों तेथील 'वनश्रीशोभा पहातच राहिला':—

वनश्री वर्णावी कवणें ? । उपमे नंदनवन उणें ।
नानावृक्षीं फळें सुमनें । रससुवासें दाटलीं ।। १०६ ।।
कर्पूरकर्दळी नारीकेळीं । चूतवृक्ष लवले फळीं ।
कंटकी फळांची नव्हाळी । लागलीं मूळीं असख्य ।। १०८ ।।
द्राक्षीमंडपातळीं दाट । धांवती अमृतरसाचे पाट ।
फणसफळें त्यागूनि देंठ । दाविती वाट सिंधूची ।। १०९ ।।
जाई जुई चंपक मालती । बकुळ मोगरे कांचन शेवती ।
केतकीवनें मघमघिती । पराग क्षिती सुगंधें ।। ११० ।।
अनेक वृक्षांचिया जाती । माजी पशुपक्षी क्रीडती ।
कनककल्हारीं शोभती । पूर्ण जीवनीं तडाग ।। ११३ ।।

अशा वनश्रींची वर्णनें गोवे प्रांतांतील किंवा हिमाचलाकडील कित्येक अवर्णनीय स्थळें पाहून मला यथार्थ वाटूं लागलीं ! अशा एखाद्या वाटिकेंत सर्व भूतांतरात्मा असा एखादा महात्मा जर वास करीत असला तर त्याच्या तपःप्रभावानें 'व्याघ्र धेनु एके स्थानीं । एकमेकां चाटिती ' हा दिव्य प्रसंग पाहतां येणें अशक्य नाहीं. ' नकुळ सर्प क्रीडती सुखें । मार्जारी-स्तना लागती मूषकें । सिंह करिण कौतुकें । वनामाजी विचरती. ' चित्त-शुद्ध पुरुषाला व्याघ्रसर्प खात नाहींत हा तुकोबांना भंडारा डोंगरावर अनुभव आला होता. अंगावर सर्प चालून व चढून येत असतांना त्यांशीं पुष्पमाळांप्रमाणें खेळणारा एक पुण्यपुरुष मीं पाहिला आहे ! असो.—

मोक्षसिंहासनाची पायरी । प्रथम, नाम अयोध्यापुरी ।
धर्मस्वरूप जीमाझारी । राज्य करी हरिश्चंद्र ।। १-५ ।।

असा धर्मशील राजा स्वप्नांत दान केलेलें राज्य विश्वामित्रास देऊन टाकून सस्त्रीक नगरीबाहेर चालला असतांना त्याच्या नगरींतले प्रजाजनच काय पण पशुपक्षीही कसे शोकाकुल झाले याचें हृदयभेदी वर्णन (हरि० अ० २) पहा:—

राजा अवलोकीं सदनाकडे । पशुपक्षी तितुका रडे ।
आहार विसरोनि तोंडें । शब्द करूं लागले ।। ७३ ।।
वाजी वारण उष्ट्रें । पयोधरपशूंचीं खिल्लारें ।
शिकारी श्वापदें महाक्रूरें । तींही गहिंवरें दाटलीं ।। ७४ ।।
कनकपंजरीं सारिका रावे । हंस तित्तिर मयूर लावे ।

त्यांतें सोडोनि म्हणे ' जावें । निजस्थाना आपुलिया ' ॥ ७५ ॥
तया सोडितां गगनोदरीं । पक्षी बोलती मंजुळस्वरीं ।
' आम्हां निरवूनी कवणा करीं । केउता जासी स्नेहाळा !' ॥७६॥
चित्रशाळेचीं निर्जीव लेपें । गहिंवरें बोलती विलापें ।
' आम्हां सांडोनि कवणापें । स्वीकारिसी प्रवासा ? ' ॥ ७७ ॥

या वर्णनप्रकाराला साहित्यशास्त्रज्ञ ' अतिशयोक्ति ' म्हणतात, इंग्रजींत याला Pathetic Fallacy म्हणतात; पण हरिश्चंद्रासारख्या निष्पाप व प्रेमार्द्र अंत:करणाची ओळख सजीव सृष्टीला व कांहीं अंशानें निर्जीव सृष्टीलाही कशी पटते याचें हें उदात्त उदाहरण विचार करण्यासारखें आहे. सर्व सृष्टि सचेतन आहे हा वेदशास्त्राचा सिद्धांत-अलीकडच्या प्रो. बोस यांनींही विद्वानांस पटविलेला सिद्धांत-आचरणांत आला तर सजीव व निर्जीव हा कृत्रिमभेद जाऊन आपल्या अंत:करणाचा ध्वनिच सर्व विश्वांत प्रतिध्वनि उत्पन्न करूं शकतो असा अनुभव होणें काय अशक्य कोटींतलें आहे ? हरिश्चंद्राचा सत्वधीरपणा पाहून छलक विश्वामित्रालाही वाटलें कीं:—

आतां याची कायावाहिनी । भरूनि चाले सत्वजीवनीं ।
नाना विघ्नगिरी भंगूनी । कैवल्यसागरीं मिळेल ॥ २-११७ ॥

यांतील काया=नदी, सत्व=पाणी, विघ्नें=पर्वत व मोक्ष=सागर हें रूपक किती बहारीचें आहे व आंतील अर्थ तर त्याहून किती मनमोहक आहे हें रसज्ञ जाणतीलच.

जरेनें खंगलेल्या क्षुधापीडित वृद्धब्राह्मणाचें चित्र पहा:—

ज्वरें करूनि व्यापिली वपू । तेणें कंपरा प्राप्त कंपू ।
संहनन लवोनि झाला चापू । आला खोंकत टेंकीत ॥२-१०१॥
उदरपृष्ठींची वडी । करूनि चरणांची वेंगडी ।
झोंक सावरितां दंडीं । शब्द तोंडीं न बोलवे ॥ ४-७२ ॥

याहून अधिक हुबेहुब शब्दचित्र कोण काढूं शकेल ? मुक्तेश्वराची शब्दचित्रें अपार सुंदर आहेत, आणि मौज ही कीं इतक्या विविध प्रकारचीं शब्दचित्रें त्यानें इतकीं बेमालूम काढलीं आहेत कीं समर्थांनीं म्हटल्याप्रमाणें तो खरोखरीच ' शब्दसृष्टीचा ईश्वर ' आहे असें म्हणावें

लागतें. अगदीं हुबेहुब मनोरम शब्दचित्रें रेखाटण्याचें कामीं मुक्तेश्वराची बरोबरी करणारा महाकवि पृथ्वीच्या वाङ्मयांत सुद्धां विरळच सांपडेल.

## १५ वर्णनशैली.

२५ येथवर जें विवरण केलें व प्रसंगोपात्त अवतरणेंही दाखल केलीं त्यावरून मुक्तेश्वराच्या वर्णनशैलीची व भाषाशैलीची वाचकांस कल्पना आलीच असेल, तथापि सिंहावलोकनानें या विषयाची पुन्हा एकवार छाननी करूं.

(१) मुक्तेश्वराची कविता प्रासादिक आहे याविषयीं शंका नाहीं. समर्थांनीं धीटकवि, पाठकवि, व धीटपाठकवि असे गौण कवींचे तीन प्रकार सांगितले असून जातिवंत कवि प्रासादिक असतात असें म्हटलें आहे. इतर कलांप्रमाणें काव्यकलाही श्रमसाध्य आहे, पण काव्यांत प्रसाद नसेल तर तें चिरकाल टिकत नाहीं. व्युत्पत्तीच्या जोरावर जी ग्रंथरचना होते तिचा लोकांच्या अंत:करणावर परिणाम होत नाहीं व ती दीर्घकाळ टिकतही नाहीं. प्रसाद ही ईश्वरी देणगी आहे; हा सत्यनिष्ठ, सच्छील, पवित्र व अकृत्रिम अशा मानवावर होणारा ईश्वराचा थोर अनुग्रह आहे. जगांतले महाकवि प्रासादिक आहेत व म्हणूनच त्यांच्या कवितेची जनतेवर छाप बसली आहे. महाकवि जन्मावा लागतो, तो बनवून बनत नाहीं. त्याच्या अंगीं काव्यशक्ति उपजत असते. विद्वत्ता, देशाटण, समागम यांनीं त्या शक्तीचा विकास होईल पण मूळांत नसल्यास ती उत्पन्न होणार नाहीं. मुक्तेश्वराच्या अंगीं ही काव्यशक्ति निसर्गत: होती व परिस्थितीनें त्या शक्तीचा प्रादुर्भव झाला. मुक्तेश्वराची भगवद्भक्ति, त्याची न्यायनीतिप्रियता, आणि उन्नतत्व सौंदर्य व पावित्र्य याविषयींची त्याची नैसर्गिक प्रीति या गोष्टी प्रसादाच्याच द्योतक आहेत. त्याची कविता प्रासादिक आहे हें कोणासही तिचा थोडासा समागम होतांच कळून येतें.

( २ ) मुक्तेश्वराची प्रतिभा उज्ज्वल होती व ती त्याच्या काव्यांत सर्वत्र दृग्गोचर होते. अत्युत्कृष्ट रूपकें, समर्पक दृष्टांत, सहज सुचलेल्या उपमा, या गोष्टी त्याच्या कवितेंत पदोपदीं सहज स्फुरलेल्या दिसतात. त्याच्या वर्णनशैलीचा हा मोठा गुण होय. पण हीं रूपकें दृष्टांत व

उपमा ज्यामुळें स्फुरत जातात, सामान्य दृष्टीला सहसा न दिसणारें गूढ प्रमेय ज्यामुळें सहज उकलत जातें व उकलतां उकलतां वाणींत प्रसादाचा रंग भरत जातो तो गुण म्हणजे प्रतिभा होय. मुक्तेश्वराची प्रतिभा फार प्रभावशाली होती. प्रतिभा ही देखणी शक्ति आहे! कवीची वनोपवनांचीं वर्णनें प्रतिभेशिवाय इतकीं रमणीय उतरलीं नसतीं. ज्या देखाव्यांचें, मनुष्यस्वभावांचें, प्रसंगांचें, स्थळांचें वर्णन करायचें असतें त्यांशीं तन्मय होऊन जाणें व श्रोत्यांचीही तशी तन्मयता करणें हें प्रसाद व प्रतिभा ह्या दोन दिव्य शक्ति ज्याच्यांत नैसर्गिक आहेत त्यालाच सहजसुलभ आहे. मुक्तेश्वर प्रतिभावान् व प्रासादिक महाकवि होता ही गोष्ट त्याचें भारत वाचतां वाचतां कोणाच्याही मनाला तात्काळ पटते.

(३) तिसरा गुण त्याच्या भाषेसंबंधाचा. हा वरील दोन गुणांच्या मानानें गौण आहे, तथापि अर्थ व वाणी यांचा नित्यसंबंध ध्यानांत आणतां भाषेचेंही महत्त्व कमी नाहीं. भाषा अर्थवाहक असणें ही गोष्ट सामान्य नाहीं. मुक्तेश्वराच्या मराठीचा अस्सलपणा हा त्याच्या लेखनशैलीचा तिसरा मोठा सद्गुण आहे. जेथें अस्सल शब्द लोकभाषेंत रूढ आहे, तेथें तोच शब्द नेमका पडणें याला भाषेचा अस्सलपणा म्हणतात. हा अस्सलपणा जे कोणी लोकांत मिसळतात, व लोकांच्या आचारविचारांशीं एकरूप असतात त्यांनाच साधतो. मराठीभाषेचा अस्सलपणा ज्ञानेश्वरींत आहे, नाथांच्या ग्रंथांत आहे, समर्थांच्या वाणींत आहे, नामदेवतुकोबांच्या अभंगांत आहे, लावण्यांत व पोवाड्यांत आहे. हा अस्सलपणा मुक्तेश्वराच्या भाषेंत आहे, तसा व तितका तो मोरोपंतांत नाहीं, अर्वाचीन गद्यलेखकांत नाहीं—निबंधमालेंत नाहीं व गीतारहस्यांत नाहीं. मुक्तेश्वररामदासांच्या मराठी भाषेचा अस्सलपणा पुष्कळ प्राचीन व बहुतेक अर्वाचीन कवींच्या व गद्यलेखकांच्या ग्रंथांत नाहीं. मराठी गद्याची भाषा बनत आहे, वाढत आहे व विष्णुशास्त्री-टिळकप्रभृति गद्यग्रंथकारांचे प्रयत्न थोर आहेत यांत शंका नाहीं अर्वाचीन राजकारणाची टिळकांनीं थोडी नवीन भाषा बनवून मराठी वाङ्मय समृद्ध केलें आहे. जे शास्त्रीपंडित किंवा कवि पंचमहाकाव्यें किंवा साहित्यशास्त्र व छंदशास्त्र घेऊन नुस्तीं पोथ्यांचीं पानें उलथीत एकलकोंडेपणांत काळ घालवितात त्यांना लोकभाषेचा अस्सलपणा माहीत नसतो; तसेंच

जे पंडित इंग्रजी वगैरे पाश्चात्य भाषांच्या वाङ्मयव्यवहारांत आयुष्य घालवितात, ज्यांना इंग्रजी वाक्यरचनेनेंच विचार करायची संवय झालेली असते, ज्यांचे लेख व व्याख्यानें पुण्यामुंबईसारख्या अर्वाचीन सुधारणेनें इवरलेल्या शहरांत अर्धवट शिकलेल्या लोकांसाठींच होत असतात त्यांना अस्सल मराठीची ओळख नसते. त्यांची भाषा पढिक व घेडगुजरी असते. अस्सल मराठी भाषा इंग्रजीचा गंध नसलेल्या जुन्या वळणाच्या बायकांत अजून थोडीफार जिवंत आहे, पण तसल्या बायकांचा व्याप फार कमी म्हणून त्यांचा राष्ट्राच्या ग्रंथसंपत्तीवर फारसा परिणाम होत नाहीं. इंग्रजी किंवा संस्कृत भाषेचा अडचणीच्या वेळीं आश्रय करून मराठी गद्यपद्यलेखक व वक्ते वेळ मारून नेत असतात; पण तुकारामरामदासमुक्तेश्वरांच्या अस्सल मराठीची त्यांना ओळख नसते. असो. हा विषय येथें असाच सुचवून सोडून देतों. मुक्तेश्वराच्या मराठीचा अस्सलपणा हा त्याच्या लेखनशैलीचा तिसरा प्रधानगुण आहे.

( ४ ) मुक्तेश्वराच्या कवितेंत रूपकांची गर्दी असते व त्याचीं रूपकेंही सर्वांगपरिपूर्ण असतात. ज्ञानेश्वराप्रमाणेंच मुक्तेश्वर पूर्ण रूपकें योजण्यांत कुशल आहे. उत्तमांतलें उत्तम रूपक कोणास पाहिजे असेल तर तें ज्ञानेश्वरीच्या १६ व्या अध्यायाच्या मंगलाचरणांत (ओवी १ ते १६) पहावें. असेंच दुसरें सुंदर रूपक मुक्तेश्वराच्या 'उठि रे गोपाळा! उघडी स्वरूपलोचना' ह्या भूपाळींत पहावें. मुक्तेश्वरी रूपकांचीं उदाहरणें या पुस्तकांत घेतलेल्या अवतरणांतही पुष्कळ येऊन गेलीं आहेत.

(१) संसारगजकेसरी श्रीकृष्ण जरासंधास (सभा. अ० ७)म्हणतात:—

सरला सुकृताचा तंतु । आयुष्यतैला झाला अंतु ।
माझिये हस्तीं व्यजनवातु । भीमरूपें उदेला ।। ३ ।।
तो झडपतां सत्वरगती । प्राणदीपक पंचज्योती ।। ४ ।।
मालवोनि पडेल क्षिती । गात्रपात्र पालथें ।। ४ ।।

( २ ) हरिश्चंद्राचें वर्णन पहा ( सभा० अ० ५ ):—

हरिश्चंद्र नरकेसरी । एकरथी पृथ्वीवरी ।
भूपकुंजर कोटीवरी । विभांडूनि प्रतापें ।। १६ ।।
मदगर्वाचीं कुंभस्थळें । भेदूनि संपदा—मुक्ताफळें ।

विखुरलीं तीं ब्राह्मणकुळें । अपार नेतां भागलीं ॥ १७ ॥
नरव्याघ्रें आपुले अंगे । त्रासूनि मुपाळें कस्तुरीमृगें ।
कीर्तिकस्तूरी भरलीं वेगें । या ब्रह्मांडकरंडीं ॥ १८ ॥

( ४ ) नळाच्या सुराज्याचें वर्णन पहा:—

धरामंडळीं प्रतापतरणी । प्रसन्नवदना प्रजानलिनी ।
धर्मसंपदा हीं दोन्हीं । चक्रवाकें एकत्र ! ॥
दारिद्र्यदोषाची हो राती । नाहींच केली सर्व जगती ।
दुर्जनतारकांची वस्ती । पाहतां कोठेंही दिसेना ॥
पाषंडउलूकांचे घुंगाट । नाही कुतर्कतस्करवाट ।
हंसकोकिल साधु श्रेष्ठ । विष्णुस्मरणें गुंजती ॥
वसुधा पाळिली बहुतकाळ । कीर्तीनें भरला ब्रह्मगोळ ।
पुण्यश्लोक राजा नळ । स्मरणें अघें नासती ॥

( ५ ) मुक्तेश्वराचीं रूपकें बहारीचीं असतातच, पण प्रसंगीं उपमादृष्टांतांचीही गर्दी उसळून देण्याच्या कामीं त्याचा हातखंडा आहे. याचें एकच उदाहरण देतों. कौरवांनीं कपटप्रयोगानें पांडवांस जाळून टाकण्यासाठीं लाक्षागृह तयार केलें व तेथें त्यांस गौरवानें नेलें. त्या गृहाची रचना पाहून अज्ञजनांनीं दुर्योधनादिकांची वाहवा केली, पण कवि म्हणतो ( आदि० अ० ३५ ):—

दांभिकजनांचा पसारा । आदर उपजवी नारीनरां ।
अंतरीं दोषांचा थारा । तें एक जाणे ईश्वर ॥ १२८ ॥
जेवीं मैंदाचा पवित्राचार । प्रगट दिसे अतिसुंदर ।
कीं वेश्येचा मुखशृंगार । भुली पाडी कामिका ॥ १२९ ॥
बचनागाची कांडी गुळगुळी । सर्पांआंगीची मवाळी ।
खदिरांगाराची सोज्ज्वळी । रत्नमाळा आभासे ॥ १३० ॥
व्याघ्र दयाशीळ लोकीं । धेनु कुरवाळी निजनखीं ।
फणाग्रीं वाहूनि उदकीं । सर्प खेळवी बेडुका ॥ १३१ ॥
संवचोराची निर्लोभ सेवा । जाणतां विश्वास नुपजवी जीवां ।
तेवीं तें गृह देखोनि पांडवां । गोड न वाटे मानसीं ॥ १३२ ॥

(६) मुक्तेश्वर सृष्टिसौंदर्याचा भोक्ता होता व त्याची सृष्टिवर्णन करण्याची

मनोहर शैली आपण यापूर्वी पाहिलीच आहे. लोककल्याणकर्ता राजा, सुराज्य, सुंदर स्त्री, ब्रम्हर्षि, वनें, उद्यानें, घुवड, रात्र, प्रभात, निद्रा, कुस्त्या, मृगया, भोजनप्रकार, वस्त्रोपवस्त्रें इ० वर्णनें अतीव रम्य आहेत. राजकारणीं उपदेश, आपत्काळीं धैर्य, सामान्य नीति यासंबंधाचे त्याचे उदात्त विचार डोळ्यांपुढें नित्य ठेवण्यासारखे आहेत व ते पुढील एका प्रकरणीं एकत्र केलेले आढळतील. शृंगाररसाचे क्वचित् स्पष्ट उद्गार त्याचे तोंडून निघालेच तर ते नेहमीं विवेकवैराग्याच्या लगामीं लावलेले असल्यामुळें व त्याच्या एकंदर कथानकांचें धोरण नीतिधर्माचा विजय ठसठशीतपणें श्रोत्यांच्या मनावर बिंबवावयाचें असल्यामुळें त्यांत फाजीलपणा बिलकूल नाहीं. मुक्तेश्वराला ढोंगाची चीड फार असे म्हणून त्याच्या वेळीं खोट्या गुरूंचें प्रस्थ माजत चाललें होतें व स्त्रिया नेणतेपणानें त्यांच्या नादीं लागत या गोष्टीचाही त्यानें इनकार केला आहे. असो. असा प्रतिभाशाली व धर्मनीतीचा पुरस्कर्ता महाकवि महाराष्ट्रभाषेस लाभला हें आपलें भाग्य होय असें म्हणून हें मुक्तेश्वरी भारताचें निरीक्षण येथेंच संपवितों.

# रामायण व स्फुट प्रकरणें.

१ मुक्तेश्वरी भारताचा सर्व बाजूनीं विचार केला, व त्याचें अंतः-स्वरूपही आपण पाहिलें; आतां मुक्तेश्वराच्या इतर कवितेचा थोडा विचार करूं. बाकीच्या कवितेंत त्याचें रामायण संपूर्ण आहे. 'संक्षेपरामायण नाम यातें । संक्षेपता ये श्रवणीं भवातें ' ( ४६६ ) याप्रमाणें कवीनेंच याला संक्षेपरामायण हें नांव दिल्याचें स्पष्ट आहे. हें रामायण कवीनें भारता-पूर्वी व आपल्या तारुण्यांत काव्यनाटकादि ललितवाङ्मयाचे संस्कार बुद्धी-वर ताजे असतांनाच लिहिलेलें दिसतें. हें रामायण विविध छंदांत लिहिलें आहे, हाच याचा विशेष आहे. मुक्तेश्वराच्या पूर्वी विविधगणवृत्तांतले श्लोक फार करून कोणी लिहिले नाहींत. आज मराठी भाषेंत ज्यांची श्लोक-बद्ध रचना प्रसिद्ध आहे ते सारे कवि मुक्तेश्वराच्या मागूनचे आहेत. राम-दास, वामनपंडित व मोरोपंत यांची श्लोकबद्धरचना मुक्तेश्वराच्या मागू-नची आहे. समर्थांचे मनाचे श्लोक सुप्रसिद्ध आहेत. त्यांची घाटणी लोकप्रिय झालेली आहे. वामनी श्लोकांची माधुरी व सुश्लिष्टता सर्वजनमान्य आहे. मोरोपंताच्या १०८ रामायणांपैकीं बहुतेक रामायणांत अनेक प्रकारच्या श्लोकांची केलेली रचना अत्यंत निर्दुष्ट असून त्याचे श्लोक रसभरित आहेत. मुक्तेश्वराला श्लोकबद्धरचना नीट साधलेली नाहीं व त्याचें रामा-यणही विशेष सरस उतरलें नाहीं. मोरोपंताचीं बहुतेक रामायणें मुक्तेश्वरी रामायणापेक्षां सरस आहेत, तथापि भाषेचा साधेपणा व शुद्ध मराठी वळण हे मुक्तेश्वराचे गुण त्याच्या रामायणांतही दृष्टीस पडतात. मुक्ते-श्वराला वीररस चांगला साधतो व त्याचे सुंदरकांड व युद्धकांड या दोन कांडांतले श्लोक समर्थांच्या या दोन कांडांतल्या श्लोकांशीं ताडून पाहण्या-सारखे आहेत. एकनाथ व मुक्तेश्वर या दोन मराठी कवींची कविता सम-र्थांच्या पाहण्यांत आली असावी असें मानण्यास आधार सांपडतो. विविधगणवृत्तांत प्रथम रचना करण्याचा मान मुक्तेश्वरास मिळाला नाहीं तरी तो या प्रकारची रचना करणाऱ्या पहिल्या पंचकडींतच आला पाहिजे.

रामदासवामनमोरोपंतांचे श्लोक अधिक सरस, निर्दुष्ट व लोकप्रिय असले तरी ही प्रवृत्ति त्यांच्यापूर्वीं मुक्तेश्वरानें पाडली ही गोष्ट नजरेपुढून जाऊं देऊं नये. त्याच्या भारतरचनेचा काळ शके १५४०–५० हा आपण ठरविला आहे. त्यापूर्वीं म्ह० शके १५२५।३०च्या सुमारास म्ह० समर्थांच्या जन्मकाळापूर्वीं मुक्तेश्वराचें रामायण झालेलें असावें. असो. त्याच्या रामायणाच्या मंगलाचरणांत पुढील सुंदर श्लोक आला आहे.

रघुकुलतिलकाचें नाम वाचे वसो दे
विषयरतिसुखाचा काम जीवीं नसो दे ।
मग तुज नलगे ती मुक्तिचिंता कराया
परमगति विमुक्ती आप लागे वराया ॥ ५ ॥

परशुरामरामाच्या कलहांत पुढील श्लोक मौजेचा आलेला आहे:—

( परशु० ) ' परम अधम तूं रे! क्षत्रियांमाजि रामा ! '
( राम ) ' भृगुपति ! तव कर्मे सांगती ब्रह्मकर्मा ! '
( परशु० ) ' अनुचित कृत नष्टा ! मारिली मार झुंजीं '
( राम ) ' शिव शिव ! परि नोहे ताटिका माय माझी ! '

( बाल० ११६ )

परशुरामानें काढलेल्या वर्मावर रामानें खोंचदार उत्तर दिलें आहे ! भरतमातुलगृहाहून परत आल्यावर त्याचा व कैकेयीचा झालेला संवाद ( ८३–८५ ) मूळ हनुमन्नाटकांतील एका श्लोकावरून घेतला आहे, ह्या श्लोकाचें पंतांनीं केलेलें भाषांतर अधिक सरस आहे (मो०च० पृ० ३७).

मुखीं शब्द एकू, करीं बाण एकू । जगीं पत्नि एकू, व्रतें काम एकू ।
प्रतापी महीमंडळीं राम एकू । ह्मणे सोडिजेना कधीं नेम एकू ॥ ११६॥

या मुक्तेश्वरी श्लोकावर(अयोध्या०)मनाच्या श्लोकांतील समर्थांचा श्लोक:—

भजाया जनीं पाहतां राम एकू । करीं बाण एकू मुखीं शब्द एकू ।
क्रिया पाहतां उद्धरी सर्व लोकू । धरा जानकीनायकाचा विवेकू ॥१३१।

वामनानें पुढें जी यमकानुप्रासरचना इतकी लोकप्रिय केली तिचा उगम मुक्तेश्वरी श्लोकांत दिसतो:—

गजगती जगतीवरि चामके । मलमती लपती पतिसामुकें ।
कपटणी नटणी वधु पातकी । रघुपती कुमती मन पारखी ॥

उदारा कुदारा त्यजी रामदारा । म्हणे मानिसी हे सुधेची सुधारा ।
भरे काळजी कल्पितां काळधारा । मणी भूषणीं सर्पिणीचा उबारा ॥

पहिला श्लोक अरण्यकांडांतला व दुसरा युद्धकांडांतला आहे.

युद्धकांडांत मुक्तेश्वराच्या वाणींतही खणखणाट भरला आहे, पण त्याचीं उदाहरणें देण्यास स्थलावकाश नाहीं. आतां स्फुट प्रकरणांकडे वळूं.

२ स्फुट म्हणून जीं प्रकरणें स्वतंत्र छापलीं आहेत तीं खरोखरीच स्फुट आहेत कां भारतभागवतांतलीं असून कवीनें वेळोवेळीं स्वतंत्र लिहून ठवलेलीं आहेत हें सांगतां येणें आज कठिण आहे. या स्फुटांपैकीं १ मूर्खांचीं लक्षणें २ शुकरंभासंवाद व ३ हरिश्चंद्राख्यान हीं तीनच विचार करण्यासारखीं आहेत. भारताच्या उद्योगपर्वांतील अ० ३३ मध्यें जीं मूर्खांचीं लक्षणें सांगितलीं आहेत त्यावरूनच मुक्तेश्वरांस व रामदासांस हीं सुचलेलीं आहेत. मूळांत हीं मूर्खलक्षणें थोडींच दिलीं आहेत, पण मुक्तेश्वर व समर्थ यानीं लोकव्यवहारनिरीक्षणानें तीं पुष्कळ वाढवून सांगितलीं आहेत व तीं परस्पर व मूळाशीं ताडून पाहण्यासारखीं आहेत. मुक्तेश्वराच्या मूर्खलक्षणाचा नमुना पहा :—

अर्थ लोभियाचे घरीं । पुस्तकें ठेवी पंडिताचे घरीं ।
स्त्री ठेवी जारशेजारी । तो एक मूर्ख जाणावा ॥ २३ ॥
पंक्तिभेद करूनि कदन्न वाढी । आपण एकला मिष्टान्न झोडी ।
' मज न साहे ' हे संपादी प्रौढी । तो एक मूर्ख जाणावा ॥५१
पुढें स्तुति मागें निंदा । स्वल्पअपराधें चढे क्रोधा ।
समयीं जो न मिळे संवादा । तो एक मूर्ख जाणावा ॥ ५४ ॥
उत्तरवयीं करी लग्न । जो जीविकेवीण बांधी सदन ।
प्राणत्यागीं न वेचीं धन । तो एक मूर्ख जाणावा ॥ ८९ ॥
संन्यासी आणि सालंबी । गृहस्थ आणि निरालंबी ।
सत्यशील आणि दंभी । हे तिघे मूर्ख जाणावे ॥ १०७ ॥

मूर्ख लक्षणें अपार आहेत, तीं कोठवर सांगावीं ? मुक्तेश्वराची भगवद्गीता छापली आहे पण ती त्याची आहे किंवा नाहीं याविषयीं मला तरी संशय वाटतो. ती अत्यंत नीरस आहे. तिला नाहीं मंगलाचरण, नाहीं

तिच्यांत कांहीं अर्थ ना अलंकार ना रस! असली रचना मुक्तेश्वराची नसावी असेंच वाटतें. शुकरंभासंवाद हें प्रकरण सुंदर आहे. त्यांत शृंगार आहे, जुगुप्सा म्ह० विषयनिंदा उर्फ वैराग्य आहे, शुद्ध परमार्थही आहे. शृंगाराचा उठावही रंभेच्या भाषणांत चांगला साधला आहे, पण शुकाच्या उत्तरानें तो शृंगारभाव मोडून वैराग्याचाच बोध होतो अशी या प्रकरणाची मांड झाली आहे. सुशील सासूच्या नजरेखालीं नांदणाऱ्या कुलवंत सुनेच्या शृंगारासारखा या प्रकरणांतील शृंगार आहे; म्हणजे प्रकरण वाचतांना शृंगा-ररसाचा उद्बोध होतो पण तो लगेच वैराग्याच्या उठावणींत लय पावतो व याच कारणामुळें प्रस्तुत प्रकरण कोणीही पाहण्यासारखें प्रौढ झालें आहे. ' विष्ठामूत्राचें भाजन ' अशा स्त्रीदेहाची निंदा करितांनाः—

स्त्रीच्या देहीं दोषदृष्टी । देखिजे जैसें विवेकनिष्ठीं ।
तैसेंच आत्मदेहानिकटीं । विचारवंतें पाहिजे ॥ ३६४ ॥

असें सुचविण्यास आपला उदारमनस्क कवि विसरला नाहीं. वेश्येच्या देहाचें वर्णन व विनियोग ( ४११–४२४ ) वाचून हाडाची वेश्याही आपल्या निंद्यकर्माबद्दल अनुताप पावेल. शुकानें स्वात्मसुखाचें जें अनुपम वर्णन ( ३२४–३५८ ) केलें आहे तें मात्र सर्व अवश्य वाचावें:—

स्वगतभेदातीत म्हणिजे । ब्रह्मीं ब्रह्मत्व विसरिजे ।
जैसें सैंधव सिंधु होईजे । वेगळेपणें नुरोनी ॥ ३२७ ॥
तो नित्य शुद्ध बुद्ध मुक्त । सत्यस्वभाव निर्गुणवंत ।
निरावेव सर्वगत । निष्कळंक स्वरूप ॥ ३२८ ॥
निरामय मायातीत । सर्वकल्पनाव्यतिरिक्त ।
तया अतरीं अनंत । सुखसंवाद साधका ॥ ३३० ॥
तया सुखासी नाहीं अंत । यालागीं बोलिजे अनंत ।
ज्याचा अळुमाळ स्पर्शतां वात । संसारभाव विसरिजे ॥ ३३१ ॥
ज्या सुखाचेनि स्वानंदें । विषय भोगाचीं आस्पदें ।
सार्वभौमादि महेंद्रपदें । विरस मानिलीं विरक्तीं ॥ ३३२ ॥
पृथुपुरूरवायुधिष्ठिर—। जडभरतादि नृपवर ।
राज्य सोडूनि अपार । गेले वना वीतरागें ॥ ३३३ ॥
ज्या सुखाच्या प्राप्तीलागीं । जाले सर्पव्याघ्रसंगी ।

वैराग्याचे प्रबळ आगीं । इंद्रियें करिती इंधनें ॥ ११४ ॥
महायोगाचे सागर । गोष्पदप्राय मानिती नीर ।
अवघड तपाचे डोंगर । उडोनि मागा सांडिले ॥११५॥
ऐशिया सुखाचेनि बोधें । ठावीं नव्हती देहद्वंद्वें ।
म्हणोनि आघात प्रल्हादें । न लेखितां साहिले ॥११६॥

याच प्रकरणांत दृष्टांतांची गर्दी झालेली पाहणें असल्यास ओव्या ३८०–४०० पर्यंत पहाव्यात. मुक्तेश्वराचें हरिश्चंद्राख्यान त्याच्या मतानें मूळ भारतवनपर्वांतर्गत आहे, पण तें भारताच्या वनपर्वांत आज सांपडत नसल्यामुळें स्वतंत्र छापलेलें आहे. हें आख्यानही त्याच्या शाकुंतलाख्यान किंवा नलोपाख्यान असल्या उंची आख्यानाच्या तोलाचेंच अतिशय मधुर व रसपूर्ण उतरलें आहे. यांतील कांहीं अवतरणें पूर्वीं येऊन गेलीं आहेत. महापुरुषांवर संकटें आलीं असतां तो समुद्रासारखें वाड पोट करून तीं कशीं सोसतो व आपल्या सत्यनिष्ठेच्या जोरावर शेवटीं यश-कीर्ति पावतो हें हरिश्चंद्राच्या कथेवरून सर्वांस माहीत आहेच. हरिश्चंद्रकथा ही मार्कंडेयपुराण ( अ० ७।८ ) व देवीभागवत ( अ० १७ते२७ ) यावरून घेतलेली आहे; तथापि मुक्तेश्वरानें संक्षेपविस्तारकुशलता खर्चून कथा फारच मनोरम वर्णिली आहे. मुक्तेश्वराच्या कांहीं पदांत त्याचा निर्भीड स्वभाव चांगला दिसतो. ' सांग पा वैराग्य कोठें रे । सर्व विटंबलें पोटें रे ' ह्या पदांत व ' गुरु गुरुपणें गाजे रे । शिष्य शिष्यपणें लाजे रे ' ह्या पदांत लबाड गुरूंचा व नालायख शिष्यांचा त्यानें खरपूस समाचार घेतला आहे व ' जीवत्व दवडुनि शिवत्व प्रगटवी । तोचि एक सद्गुरु रांवो रे ' असें सद्गुरूचें लक्षण सांगून ज्ञानेश्वरएकनाथांच्या गुरुशिष्य-त्वाचें वर्म ओळखून सत्यमार्गानें उद्धरून जा असा बोध केला आहे.

# मुक्तेश्वरनीतिरत्नमाला.

( ह्या ग्रंथांत घेतलेल्या अवतरणांत येऊन गेलेलीं नीतिरत्नें लक्ष्यांत ठेवावींच, पण त्याशिवाय आणखी संस्मरणीय अशीं जीं विचाररत्नें मुक्तेश्वर-कवितार्णवांत आढळलीं तीं पुढें एकत्रित केलीं आहेत. तरुणांच्या नीति-शिक्षणास ह्या रत्नमालेचा फार उपयोग होईल. मनाशीं गुणगुणावयाचा अभ्यास लागला असतां ही माला सहज कंठगत होईल. )

### १ तो नारायण नररूपें.

जो ऐश्वर्यें न चढे मदा । दरिद्रें दीनत्व न शिवे कदा ।
निंदी त्याची न करी निंदा । तो नारायण नररूपें ॥ १ ॥
कामक्रोधाच्या भूतसंचारीं । न चळे सुविचारपंचाक्षरी ।
परधनपरस्त्रीपासूनि दूरी । तो नारायण नररूपें ॥ २ ॥

### २ मृत्यूची सर्ववशता.

अभ्रें वितुळलीं निराळीं । नाना बुद्बुद विराले जळीं ।
तैसे अचूक काळानळीं । भस्म झाले असंख्य ॥ ३ ॥

### ३ चतुर कोण !

वेदशास्त्रांच्या अर्थविचारें । आचार्यांचेनि वाक्यनिर्धारें ।
प्रपंचापासूनि बुद्धि चतुरें । स्वरूपनिष्ठा करावी ॥ ४ ॥
देहेंसी विश्व मिथ्या सकळ । जाणोनि, ब्रह्म चिंती निर्मळ ।
तेणें शमेल शोकजाळ । स्वानंदसुख पावसी ॥ ५ ॥

### ४ हें दुर्लभ तिहीं लोकीं.

विवेकासारिखा जोडण गुरु । जीवासारिखा मित्र उदारु ।
चित्तासारिखा शिष्य चतुरु । हे दुर्लभ तिहीं लोकीं ॥ ६ ॥
कुलीन सुरूप पतिव्रता । धनिक उदार प्रियबोलता ।
सर्वज्ञतेवरी अगर्वता । हे दुर्लभ तिहीं लोकीं ॥ ७ ॥
पुत्र गुणाढ्य पितृभक्त । शास्त्रवेत्ता वैराग्यभरित ।
ब्रह्मज्ञानी शुचिष्मंत । हे दुर्लभ तिहीं लोकीं ॥ ८ ॥

### ५ तोचि शंकर म्हणों ये.

वनिता मनोरम एकांतीं । आपण होऊनि पुरुषा प्रार्थी ।
तेथें जो निर्विकल्प चित्तीं । तोचि शंकर म्हणों ये ॥ ९ ॥
विजनीं भरलीं कनकें पाहे । देखिल्यावरी लोटी पाये ।
ऐसी निर्लोभता आहे । तोचि शंकर म्हणों ये ॥ १० ॥
जया आधीन मन इंद्रियें । न मनी सुखदुःखाचे घाये ।
छळितांहि पर क्रोधा न ये । तोचि शंकर म्हणों ये ॥ ११ ॥

### ६ परोपकारी पुरुष धन्य होय.

जेणें घडे परोपकार । घडे तोचि गा पवित्राचार ।
परांतें पीडाकारक थोर । तोचि अधर्म जाणिजे ॥ १२ ॥
जिहीं आपुल्या सर्वयत्नें । पराचे क्लेश परिहरणें ।
श्रमोनि पुढिल्या सुख दावणें । तो एक धन्य संसारीं ॥ १३ ॥
प्रेरणा न करितां संकटीं । कृपनें अनाथ घाली पोटीं ।
केला उपकार न बोले वोठीं । तो एक धन्य संसारीं ॥ १४ ॥

### ७ विरोधबीज.

श्रेष्ठ दुर्लभ जो पदार्थ । त्यावरी सकळांचीही आर्त ।
तेथें एकेंचि केलिया स्वार्थ । विरोध उपजे सहजचि ॥ १७ ॥

### ८ थोरपणाचें लक्षण

करणी करुनियां लपवी । महिमा दुजियाची वाढवी ।
महायशाची तो पदवी । आपआप पावतू ॥ १६ ॥

### ९ विवेकीहि चुकतात.

ईश्वरमायेचा बडिवार । कीं पूर्वकर्माचा बलात्कार ।
विवेकवंतही अविचार । राहाटे विचार असतां कीं ॥ १७ ॥
मोहिनीनें छळिला गिरिजावर । मायामृगें श्रीरामचंद्र ।
कीं कपटपाश युधिष्ठिर । ढाळिता झाला आदरें ॥ १८ ॥

### १० दारिद्र्य.

दारिद्र्य जीताचें प्रेत जाण । दारिद्र्यें योग्यता तृणासमान ।
दारिद्र्यें विद्यासमुद्र द्रोण । द्रुपदें छळोनि दवडिला ॥ १९ ॥
दारिद्र्यें उदास पुत्रदारा । दारिद्र्यें सुहृद पाठिमोरा ।

दारिद्र्यें नैषधयुधिष्ठिरा । रानोरान भवंडिलें ॥ २० ॥

### ११ परस्त्रीपरधन.

परस्त्री आणि परधन । अखंड वांछी ज्याचें मन ।
तो जितचि प्रेतासमान । त्यासी सज्जन नातळती ॥ २१ ॥

### १२ आपले आपण !

विवेकें आप आपणां मित्रु । कुबुद्धी आपआपणां शत्रु ।
आपणां आपण गुरु स्वतंत्रु । शिष्यहि आपणां आपण ॥२२॥

### १३ कुलवर्तीनें काय टाकावें ?

स्वयें नर्तन गायन । गीतनृत्यअवलोकन ।
शृंगारकामशास्त्रश्रवण । हें कुलक्षण कुलवंते ॥ २३ ॥
परघरअटण परघरवस्ती । जारजारिणींची संगती ।
एकटशय्या एकटपंथी । हें कुलक्षण कुलवंते ॥ २४ ॥
बहु हांसणें बहु बोलणें । सदा हांसत गोष्टी करणें ।
परतपरतोनि निरखणें । हें कुलक्षण कुलवंते ॥ २५ ॥

### १४ क्रोध.

क्रोध आधीविण आधी । क्रोध तोचि महाव्याधी ।
क्रोधें सूदले हे प्रमादीं । सारासार जाणते ॥ २६ ॥
क्रोध तोचि अपस्मार । क्रोध तोचि भूतसंचार ।
क्रोधें कीजे पिशाच नर । परमचतुर विवेकी ॥ २७ ॥

### १५ दुरुक्तीचा संताप. ( आदि० १८ ).

बहुकाळींचा मित्रसंबंधु । तोडी एक वोखटा शब्दु ।
जैसा कांजीचा स्वल्पबिंदु । घटाचि नाशी दुधाचा ॥ २८ ॥
नाना तपांचिया जोडी । स्वल्पकामना नासती कोडी ।
परगृहीं षड्रसांची गोडी । दवडी एक हेळणा ॥ २९ ॥
ज्वर वन्ही ग्रीष्मातप । यांचा उष्मा अत्यंत स्वल्प ।
त्याहूनि बोलाचा संताप । आगळा ऐसा मज वाटे ॥ ३० ॥
हृदयीं तप्त लोहाचें सळ । साहों येईल चिरकाळ ।
परी दुष्ट शब्दाची जळजळ । मरणांतींही शमेना ॥ ३१ ॥
सोनें अथवा हस्तचरण । मोडिल्या सांधिती विचक्षण ।

फुटलें मोतीं, तुटलें मन । सांधूं न शके विधाता ! ।। ३२ ।।

१६ दुर्वाक्य न बोलावें. ( आदि० १९ ).

छळितां क्रोध नुपजे ज्यातें । तेणें जोडिलीं सर्वसुकृतें ।
कोपिष्टाचीं सुपुण्यें बहुतें । भस्म होतीं क्षणार्धें ।। ३ ।।
कठोर वाग्बाण वर्मांठायीं । मरणांत शल्य पराचे हृदयीं ।
राहे, ऐसें दुरुक्तिघाई । मरण न कीजे कवणातें ।। ३४ ।।
परवर्मभेदनी दुरुक्ती । ते अकीर्ती अवलक्ष्मी अवगती ।
ते प्रत्यक्ष राक्षसी व्यक्ती । हिंसा करी अशस्त्रें ।। ३५ ।।
म्हणोनी दुर्वाक्य न बोलावें । परांचें आपण साहीत जावें ।
याहूनि श्रेष्ठ साधन बरवें । भुवनत्रयीं असेना ।। ३६ ।।
साधु सद्भावें पूजावे । सज्जन संकटीं रक्षावे ।
खळापवाद साहोनि जावे । तेंचि वर्तन श्रेष्ठांचें ।। ३७ ।।
सत्य विनीत मधुरभाषी । सकळ प्राणी वश्य त्यासी ।
कोणापासोनि तयासी । अपाय कांहीं असेना ।। ३८ ।।
मुखें सत्य अंगें विनीत । तेणें जिंकिले जन समस्त ।
इहीं सद्गुणीं अलंकृत । चतुरें जालें पाहिजे ।। ३९ ।।

१७ कर्मफळभोग.

जीव कर्माधीन सकळ । कर्में पावती सुखदु:खफळ ।
सुखापेक्षेची जळजळ । व्यर्थ वाहे अविवेकें ।। ४० ।।
'सर्व नश्वर' जाणती ज्ञानी । तेथ कायसा लाभ? कायसी हानी?।
स्वप्नीं दारिद्र्य लक्ष्मी दोनी। जागृती यतां केउती? ।। ४१ ।।

१८ समानाशीं मैत्री, विषमाशीं नाहीं. (आदि० ३०)

धनिका आणि द्रव्यहीना । उदारा आणि परमकृपणा ।
हृदयशुद्धा चित्तमलीना । मैत्री नाहीं परिसिली ।। ४२ ।।
कर्मभ्रष्टा आचारशीळा । मूर्खा आणि शास्त्रकुशळा ।
सज्जना आणि कुटिला खळा । मैत्री नाहीं परिसिली ।। ४३ ।।
क्लीबा आणि झुंजारशूरा । अधैर्यवंता परमधीरा ।
अश्रोत्रिया आणि श्रोतिया नरा । मैत्री नाहीं परिसिली ।।४३।।
रत्न रत्नाचिये पंक्ती । मित्र भूपाचा भूपती ।

योग्य शर्करा समरस घृतीं । लवण तकें नेमिलें ॥ ४४ ॥
कुळशीळ ज्ञानवैभव । समान योग्यता मित्रभाव ।
सखा पार्थिवा पार्थिव । भणगा भणग सोयरा ॥ ४५ ॥

### १९ अहंकार.

मद्यप्याहातीं नागवें खड्ग । झाडितां निवटी आपलें अंग ।
तेविं अहंकार मिरवितां चांग । मूळ होय नाशातें ॥ ४६ ॥

### २० बाह्यरंगाला भुलूं नये.

दांभिक भजनाचा पसारा । आदर उपजवी नारीनरां ।
अंतरीं दोषांचा थारा । तें एक जाणे ईश्वर ॥ ४७ ॥
बचनागाची कांडी गुळगुळी । सर्पांआंगीचीं मवाळी ।
खदिरांगाराची सोज्ज्वळी । रत्नमाळा आभासे ॥ ४८ ॥
व्याघ्र दयाशीळ लोकीं । धेनु कुरवाळी निजनखीं ।
फणाग्रीं वाहूनि उदकीं । सर्प खेळवी बेडुका ॥ ४९ ॥

### २१ जगाची नश्वरता.

एका आधीं एका पाठीं । प्रत्यक्ष नाश देखिजे दृष्टीं ।
हे मृत्युलोकींची राहाटी । कोण अक्षयी उरलासे ? ॥ ५० ॥
गेलें अंतवंत ह्मणावें । दिसतें साच केविं मानावें ? ।
संसारस्वप्नींचे राणिवें । भुलों नये सर्वथा ॥ ५१ ॥

### २२ कृतघ्नतादोष.

जेणें जन्मावरी प्रतिपाळिलें । दिव्य मंत्रातें उपदेशिलें ।
संकटीं प्राणातें रक्षिलें । आणि पोसिलें दुर्भिक्षीं ॥ ५२ ॥
जळतां राखिलें वैश्वानरीं । बुडतां तारिलें महापूरीं ।
त्यातें विसरे तो अघोरीं । नरकीं पडे दुरात्मा ॥ ५३ ॥
कृतघ्नदोषें दोषभरित । आपुल्या कोटिकुळांसहित ।
जोंवरी तपती चंद्रादित्य । तोंवरी पचे रौरवीं ॥ ५४ ॥
( आदि० अ० ३६ )

### २३ परोपकार.

आपला सांडूनियां स्वार्थ । यत्नें पुरवी परांचें आर्त ।
तोचि ईश्वर मूर्तिमंत । सत्य सत्य जाण पां ॥ ५५ ॥

### २४ चित्त द्विधा नसावें.

युक्त अथवा अयुक्त । कार्यजातीं द्विधा चित्त ।
केलियां स्वार्थ ना परार्थ । एकही अर्थ साधेना ॥ ५६ ॥
कार्याकार्थीं एक पक्ष । अंगिकारी तोचि पुरुष दक्ष ।
जितां अर्थ, मेल्या मोक्ष । साधूनि जाय प्रतापें ॥ ५७ ॥

### २५ दारिद्र्याचा गुण.

मनुष्यलोकीं जन्मल्या जना । नरकभोग यमयातना ।
दारिद्र्य ऐसें माझिया मना । विचारितां मानलें ॥ ५८ ॥
दरिद्री आंधळा देखतां नयनीं । परी तो डोळस एके गुणीं ।
सुमित्रकुमित्रांचीं नाणीं । पारखूं जाणें निवाडें ॥ ५९ ॥

### २६ नारदनीति ऊर्फ राजकारण (सभा० अ० ३).

नारद ह्मणे " धर्मराजा ! । धर्मस्वरूप धर्मात्मजा ।
नामासारिखी सुतेजा । करणी निर्मळ असे कीं ? ॥ ६० ॥
ऐश्वर्य लाधल्या संपूर्ण । धर्मीं वर्तत असे कीं मन ? ।
राज्यमदें दुरभिमान । तुज संचरला नाहीं कीं ? ॥ ६१ ॥
वडील आचरले जो धर्म । तोच चालविसी कीं नेम ?
विहितभंगाचा कर्दम । तुज लेपला नाहीं कीं ? ॥ ६२॥
धर्मासी अविरोधी जो काम । तोचि सेविसी कीं सुगम ।
इंद्रियलोलुपतेचा भ्रम । प्राप्त झाला नाहीं कीं ? ॥ ६३॥
अनायासीं हो कीं सायासीं । भाग्यें जोडिल्या संपत्तीसी ।
विभागूनि समस्तांसी । सेविसी कीं सुजाणा ? ॥ ६४॥
अनुकूल अथवा प्रतिकूळ । अदृष्ट झालियाही विकळ ।
धर्मापासून बुद्धि अचळ । भ्रंश कांहीं न पवे कीं ? ॥ ६५ ॥
अखंडैकनामस्मरणीं । देव केला असे कीं ऋणी ? ।
जो पावोनि देहभरणीं । दास्य करी निजांगें ॥ ६६॥
काम नसावा परस्त्रियेचा । लोभ नसावा शरीराचा ।
क्रोध नसावा सत्पुरुषाचा । मोह पुत्राचा बाधक ॥ ६७॥
मद नसावा सुहृज्जातीं । मत्सर नसावा सर्वांभूतीं ।
तुझी वर्तणुकीची शक्ती । सांग ऐसी आहे कीं ? ॥६८॥

काम असावा ईश्वरभजनीं । क्रोध असावा इंद्रियदमनीं ।
तीर्थप्रसादशेषग्रहणीं । लोभ अपार असावा ॥ ६९॥
मोह असावा सज्जनासीं । मद असावा दुर्जनासी ।
मत्सर संसारशत्रूसी । असावा तो असे कीं ? ॥ ७० ॥
आशा कीर्ति द्विजपालन । दान भोग मित्रसंरक्षण ।
साही गुणीं तव प्रधान । सालंकार असती कीं ? ॥ ७१ ॥
उत्तम मध्यम कनिष्ठ पदीं । योग्यायोग्य विचारनिधी ।
परीक्षूनि विशाळबुद्धी । योजिसी कीं नरेंद्रा ? ॥ ७२॥
अचाट कार्य साधी भृत्य । वेतनाहूनि कोटिगुणित ।
द्रव्य देऊनि त्याचें चित्त । तोषवीत अससी कीं ? । ७३॥
परगुणपरीक्षा जाणणें । चित्त कळवळे परवेदनें ।
हीं मुख्य प्रभूचीं लक्षणें । तुझ्या ठायीं असतीं कीं ? ॥ ७४ ॥
मंत्रियांच्या राहटी कैशा । देती यशा कीं अपेशा ।
चारमुखें नित्य नरेशा । विचारीत अससी कीं ? ॥ ७५॥
नेमाहूनि आगळें धन । घेऊन प्रजांतें पीडन ।
करिती जे अयोग्य प्रधान । ते पदातीत करिसी कीं ? ॥७६॥
वनचरदूतांचिया गोष्टी । राष्ट्र अवलोकिसी कीं दृष्टी ? ।
नष्टां तस्करांचिया राहटी । भंगिसी कीं ऐकतां ? ॥ ७७॥
सांगावया क्लेशगोष्टी । दुर्बळ येऊं इच्छिती भेटी ।
तयां येतयां आडकाठी । तुझ्या द्वारीं नाहीं कीं ? ॥ ७८॥
परराष्ट्र घ्यावया धाडिसी सैन्य । जुंझती त्यांचें करूनि कंदन ।
त्यावांचूनि प्रजांतें नागवण । तुझेनि होत नाहीं कीं ? ॥ ७९॥
अंगींचें एक रोम उपडे । तें जैसें हृदयांत ठाउकें पडे ।
तेंवि प्रजा पावतां पीडे । जाणसी कीं तात्काळ ? ॥ ८०
तुझिया राज्यामाजी प्राज्ञा ! । पुत्र पाळिती पितृ–आज्ञा ? ।
न करितां पुरुषांची अवज्ञा । स्त्रिया स्वधर्में असती कीं ? ॥८१॥
अंगबळ, सेनाबळ, । कोशबळ, दुर्गबळ, ।
शस्त्रबळ, मंत्रप्रधानबळ, सुहृद्बळ, आठवें ॥ ८२ ॥
वेदत्रय, बुद्धिबळ, । ब्राह्मणशेषसुकृतबळ, ।

अन्य रायांचें साह्यबळ ऐसीं । चौदा जाणावीं ॥ ८३
श्रोत्रिय कुटुंबी निर्धन । साधू सात्विकवृत्ति क्षीण ।
त्यांचें परिहरूनि दैन्य । सदा पाळण करिसी कीं ? ॥ ८४
रोगी प्रवासें पीडिले । कारागृहीं जे कां आटकले ।
ते ते सांभाळूनि भलें ! क्लेशातीत करिसी कीं ? ८५
जितेंद्रिय ज्ञानवंत । परम पवित्र साधुसंत ।
सदाचारी सभेआंत । निकटवर्ती असती कीं ? ॥ ८६ ॥
जागा होवोनि अपररात्रीं । सारासारविचारनीति ।
मोक्षोपायें भवनिवृत्ती । विचारीत असती कीं ? ॥ ८७ ॥
अजिंक्य शत्रूतें जिंकावें । जिंकिल्यातें प्रतिपाळावें ।
शरणागतातें रक्षावें । ऐसें करीत असती कीं ? ॥ ८८ ॥
सहस्र मूर्खांतें दवडून । एक पंडित ज्ञानसंपन्न ।
संग्रहून त्याचें मन । स्वस्थ ऐसें करिसी कीं ? ॥ ८९ ॥
आढ्य व्यसनी अनुरक्त । मित्र उदासीन शत्रु अमात्य ।
या सातांचें चित्ताकर्षित । जाणसी कीं सुजाणा ? ॥ ९० ॥
तुवां अथवा प्रधानीं । रहस्य बोलिजे एकांतस्थानीं ।
तें बाहेर लोकांचे कर्णीं । प्रगट होत नाहीं कीं ? ॥ ९१ ॥
एक उघड बोलिजे जनीं । एक प्रेरिजे महंतकर्णीं ।
एक ठेविजे मनींचे मनीं । हें जाणत आहेस कीं ? ॥ ९२ ॥
वैरिवर्गाचें वर्तन । क्षणक्षणा व्हावया ज्ञान ।
गुप्त ठेवूनि चारगण । विचारीत असती कीं ? ॥ ९३ ॥
दुज दावूनि आसता । शत्रूसी पाठविसी वार्ता ।
ऐसें कोण ते तत्त्वता । वोळखोनी असती कीं ? ॥ ९४ ॥
नापेक्षितां मेघजळें । सर्वदा पिकें पिकती सकळें ।
अभंग तडागे पाटस्थळें । पै निर्मिलीं असती कीं ? ॥ ९५ ॥
कृषीवळें सगळीं भणगें । धनधान्य वोपूनि अंगें ।
शेताचेनि राजमार्गें । पाळिसी कीं नरेंद्रा ? ॥ ९६ ॥
उदरपीडेचिया महामारीं । उत्तमेंही करितां चोरी ।
धरूनि आणितां राजद्वारीं । मानें मुक्त करिसी कीं ॥ ९७ ॥

औषधनेम शरीरातें । वृद्धसेवन मानसातें ।
दोंप्रकारें आपणातें । रक्षिसी कीं सुजाणा ? ।। ९८ ।।
अग्नि सर्प चोर व्याघ्र । रोग राक्षस कां परचक्र ।
यांपासूनि आपलें राष्ट्र । रक्षिसी कीं बलिष्ठा ? ।। ९९ ।।
अंध मुके पंगु व्यंग । आतुर संन्यासी अध्वांग ।
पितया ऐसें सांगोपांग । पाळण त्यांचें करिसी कीं ? ।। १०० ।।
निद्रा आलस्य भय क्रोधता । अमार्दव आणि दीर्घसूत्रता ।
साही अनर्थांचिया माथां । पाय देउनी असती कीं ? ।।१०१।।
परद्वीपींच्या अमोल्य पदार्थां । वणिक आणिती इच्छूनि अर्था ।
त्यांच्या पुरवूनि मनोरथा । लाभ चौगुणी देसी कीं ? ।। १०२
वैद्य चिकित्सक मर्दक । हडपी साळी नापिक ।
निकटवर्ती विश्वासिक । हितकारक असती कीं ? " ।।१०३
एवं सर्वापरी जाण । राजा असावा सावधान ।
हेंचि विस्तारें निरूपण । पुण्यश्लोका! बोधिलें।। १०४।।

## २७ पहिलीचा काळ, दुसरीचा प्रतिपाळ.

नूतन भार्येची कामकळा । वाढिल्या नर होय आंधळा ।
सुकल्या सांडिजे सुमनमाळा । जीर्ण भार्या त्या रीती ! ।। १०५
कनिष्ठ भार्येची आवडी । पुत्रोत्पादनीं इच्छा गाढी ।
ज्येष्ठ स्त्रियेचीं बाळें सांडी । कटुक फळांसारिखीं ! ।। १०६

## २८ सत्पुत्र.

श्रावण पुंडलीक श्रीराम । भगीरथ मारुती भार्गवोत्तम ।
यांचे पंक्तीं राजा धर्म । सुपुत्र ऐसें जन म्हणती ।। १०७ ।।
जितां पाळी पितृवचन । वर्षां श्राद्धीं द्विजभोजन ।
गयेसी वोपी पिंडदान । तो एक धन्य सुपुत्र ।। १०८ ।।
पिता गुरु पिता देवो । पितृसेवे शरीर जावो ।
ऐसा जयाचा निश्चयभावो । तो एक धन्य सुपुत्र ।। १०९ ।।

## २९ पांडवांची कृष्णभक्ति.

धर्म म्हणे ' गा ! पुरुषोत्तमा ! । तुझी कृपा कवच आम्हां ।
'पांडवरक्षिता' ऐसा महिमा । लोकत्रयीं प्रसिद्ध ।। ११० ।।

तूं कूर्म हे अवयव । तूं पादप हे पल्लव ।
कृष्ण आत्मा हे पांडव । पंच प्राण पैं तुझे ' ॥ १११ ॥

### ३० निस्पृहाची रीत.

तुझी तुष्टी आणि रुष्टी । दोन्ही तृणप्राय माझिये दृष्टी ।
जैसी निर्धनिकाची मुष्टी । झांकली उघडी समान ! ॥ ११२ ॥

### ३१ व्यासाचा धर्मराजास उपदेश (सभा० अ० १२).

राजा नेऊनि एकांतीं । व्यास वदे निजहितार्थी ।
म्हणे "पुत्रा ! विचित्र गती । प्रारब्धाची कळेना ॥ ११३ ॥
ईश्वर निष्ठुर कीं कृपाळु । काय करील कीं केव्हां काळु ।
याचा निश्चय विवेककुशळु । करूं नेणे सर्वथा ॥ ११४ ॥
नकळे विष्णुमायेचा महिमा । जे विचार हिरोनी पाडी भ्रमा ।
म्हणोनि नळा आणि रामा । अपाय घडले जाणतां ॥ ११५ ॥
पुण्यमार्गी खेळतां निखिळ । दु:खें प्राप्त होती प्रबळ ।
पाप करितां क्षेमकुशळ । दिसे ये काळीं वाटतें ॥ ११६ ॥
पाप करितां पाविजे दु:ख । सुकृतें भोगिजे अक्षयी सुख ।
ऐसें बोलती मन्वादिक । वेदवाक्य प्रमाण ॥ ११७ ॥
नकळे पापपुण्याचें रूप । पापी पुन:पुन्हा करी पाप, ।
पाप करितांही अमूप । पुण्यफळें भोगिती ! ॥ ११८ ॥
अधर्मेचि धर्म एकांतें । विहित तें अविहित सर्वांतें ।
दिसे सर्वत्र बहुतातें । समाधानासारिखें ॥ ११९ ॥
यालागीं कांहीं नेणवे मनें । ईश्वराचें ईश्वर जाणे ।
ऐशा वेदवाक्याप्रमाणें । पुरुष जाणते वर्तती ! ! ॥ १२० ॥
विचारें पाहतां न मिळे साक्षी । म्हणोनि मिळिजे प्रारब्धपक्षीं ।
जैसा समुद्रीं भ्रमोनि पक्षी । नौकास्तंभीं आरूढे ॥ १२१ ॥
सर्वास अदृष्ट प्रमाण पाहीं । आणीक वदावया आश्रय नाहीं ।
ज्ञानदृष्टीं पाहतां देहीं । मिथ्या मायिक कल्पना ॥ १२२ ॥
जीवांसि जीवित्व अभिमान । तंवचि वर्ते कर्माधीन ।
स्वरूपीं लागल्या अनुसंधान । सुखदु:ख असेना ॥ १२३ ॥
असो युक्तीचे जाळमाळ । सूचना सांगतसे अळुमाळ ।

धैर्यापासूनि अचळ । बुद्धी विकळ होऊं नेदी ।। १२४ ।।
तेरा वर्षेपर्यंत राया ! । पडेल अवदशेची छाया ।
मांडवल उरेल काया । कौपीनेसी दिसतसे ! ।। १२५ ।।
होईल ऐश्वर्याचा नाश । चिरकाल घडेल अरण्यवास ।
तेथेंही क्षणक्षणा त्रास । दुराचारी देतील ।। १२६ ।।
इतकें सोसून धरिल्या धीर । कृपा करील जगदीश्वर ।
होईल शत्रूंचा संहार । पुढती राज्य पावाल ।। १२७ ।।
दुर्योधनाचेनि अपराधें । भीमार्जुनांच्या बळविषादें ।
कौरव आणि नृपांचीं वृंदें । क्षया जाती जाण पां ।। १२८ ।।
पृथ्वी होईल निःक्षेत्री । अशुद्धें रंगेल सर्व धरित्री ।
मृत्तिका भिजोनि भूमिपात्रीं । गोठोनि होईल गोळिका ।।१२९।।
विवेकबुद्धीनें जितुकें टळे । तितुकें टाळिजे विवेककुशळें ।
यालागीं माझीं हीं प्रांजळें । वचनें हृदयीं धरावीं ! ।। १३० ।।
पुढें वोढवूनि प्रारब्धा । जो टाकी प्रयत्नधंदा ।
तो पुरुष मतिमंदा— । माजी गणिती जाणते ।। १४१ ।।
न कीजे कोणाची हेळणा । न बोलावे दुष्टवचना ।
जाणोनि पराची वेदना । परोपकारीं भजावें ।।१३२।।
घ्यावे ऋषींचे आशीर्वाद । भूतीं न करावा विरोध ।
वर्मस्पर्शाचे कुटिल शब्द । न बोलावे कवणातें ।। १३३ ।।
उगेचि न जावें परसदना । विनोदेंही न कीजे परछळणा ।
दुरुक्ती बोलतां दुर्जना । प्रत्युत्तर न द्यावें ।। १३४ ।।
संसर्ग न करावा नीचाचा । विश्वास न मानावा गोत्रजाचा ।
क्रोधमदमत्सर यांचा । विटाळ मानी मानसें. ।। १३५ ।।
द्यूतव्यसनीं न धरी गोडी । हेंचि करूनि सांगे गोडी ।
द्यूतें नासे पुण्यजोडी । दुःखकोडी सांगणें ।। १३६ ।।
जो जो प्राप्त होईल भोग । त्याचा मानूं नको उबग ।
तेणें सत्वर रमारंग । कृपा करील निर्धारें ।। १३७ ।।

## ३२ भक्ताची निर्विघ्नता.

जेथें श्रीकृष्णकथाश्रवण । मुखीं श्रीकृष्णनामस्मरण ।

हृदयीं श्रीकृष्णमूर्तीचें ध्यान । तेथें विघ्न स्पर्शेना ।। १३८ ।।

### ३३ वंशतिलकाचा हर्ष.

आपणांमाजी सुहृद एक । भाग्यें झाला वंशतिलक ।
त्याचा आप्तलोकीं हरिख । सांग कां पा! न मानावा ?।। १३९।।

### ३४ उत्तम पुरुषलक्षण.

विदुर म्हणे " धर्मराया ! । ईश्वरीं निश्चयो असे जया ।
एकमार्गी वर्तती तयां । अपाय कांहीं असेना ।। १४० ।।
अपकारियाचें लक्षण अपार । आपण केला कोटिउपकार ।
न बोले तो उत्तम नर । उत्तम पुरुष बोलती ।। १४१ ।।
गेलें हृदयीं नाठवावें । केलें मुखीं न बोलावें ।
सत्य सर्वथा न सांडावें । साधुवर्तन या नांवें ।। १४२ ।।

### ३५ नांव मोठें लक्षण खोटें !

धत्तूर पुष्पातें कनकफळ । पृथ्वीपुत्राचें नाम मंगळ ।
दिवाभीतालागीं बरळ । कौशिकशब्दें बोलती ।। १४३ ।।
विषनागाचें नाम अमृत । कुंभकारातें भार्गव म्हणत ।
तेवीं करणीवीण व्यर्थ । नाममहिमा वाउगा ।। १४४ ।।

### ३६ कन्यादान.

देव ब्राह्मण वेद वन्ही । साक्षी करूनि पिता जननी ।
कन्या वोपिती पाणिग्रहणीं । वराहातीं स्वधर्मे ।। १४५ ।।

### ३७ वडिलांचा अपमान.

श्रेष्ठवृद्धाचा अपमान । तेंचि अवलक्ष्मीचें स्थान ।
विघ्नें येती तेथें ठाकून । जेथें दुर्वचन वडिलांतें ।। १४६ ।।

### ३८ भोग सुटत नाहीं.

ठाकूनि आलें जें कपाळें । भोगिल्यावीण सुटेना ! ।। १४७ ।।

### ३९ आपत्काळीं धैर्य

शोकभयाचे आघात । क्षणक्षणां होती प्राप्त ।
मूर्ख होती व्याकुळचित्त । ज्ञानें पंडित भ्रमेना ।। १४८ ।।
आपत्काळ देखोनि पुढें । ज्ञानिया आंगीं वीरश्री चढे ।
कोटिदुःखांचें दळवाडें । विवेकलता विभांडी ।। १४९ ।।

ज्ञानें नासे संसारभ्रम । विष्णुस्मरणें पातकें भस्म ।
कळिकाळ अतिदुर्गम । धैर्यबळें लोटाशा ॥ १५० ॥

### ४० ब्राह्मण व क्षत्रिय.

पवन पावक एकमेळीं । काननें जाळिती समूळीं ।
तेविं मंत्रें शस्त्रें होळी । शत्रुकुळांतें होतसे ॥ १५१ ॥

### ४१ शिव विष्णु एक.

शिव म्हणतां विष्णु जाण । विष्णु म्हणतां महेश पूर्ण ।
नोळखोनि मूढश्वान । भेदवादें भूंकती ॥ १५२ ॥

### ४२ प्रारब्ध.

आपण करूं जावें एक । प्रारब्ध घडवी आणिक ।
ईश्वरी मायेचें कौतुक । ब्रह्मादिकां न कळे ॥ १५३ ॥

### ४३ उत्तम पुरुष.

बोलिला बोल उत्तम पुरुष । चळों सहसा नेदिती ॥ १५४ ॥

### ४४ परोपकारी.

आपुला सांडूनियां स्वार्थ । यत्नें पुरवी पराचे आर्त ।
तोचि ईश्वर मूर्तिमंत । सत्य सत्य जाण पा ॥ १५५ ॥

### ४५ ब्रह्मसूत्र.

ईश्वरें प्रेरिलें प्रारब्धातें । प्रारब्धें प्रेरिलें मनातें ।
यास्तव घडेल तेंचि निरुतें । ब्रह्मसूत्र जाणावें ॥ १५६ ॥

### ४६ ब्राह्मण.

ब्राह्मणांचें आशीर्वचन । तें क्षत्रियां शस्त्र बाण ।
ब्राह्मणकृपेचें आंगवण । वज्रकवच अक्षयी ॥ १५७ ॥
जया सर्वत्र ब्रह्मसृष्टी । ब्रह्मबोधें तोषले पोटीं ।
ब्रह्म जाणोनि लोकीं राहाटी । सदाचारें वर्तती ॥ १५८ ॥

१ या मुकेश्वराच्या उद्गारासारखेच उद्गार 'पवनाग्निसमागमोह्ययं सहितं ब्रह्म यदस्त्रतेजसा' [ कालिदास ] व 'दुरासदं च तत्तेजो क्षात्रंच ब्रह्मसंयुतम्' [ भवभूति ] ह्या संस्कृत कवीश्वरांनीं काढले आहेत. शिवाजीसमर्थांसारख्या क्षत्र-ब्राह्मणांचा संग राष्ट्रोन्नतिकारकच असतो.

२ 'Man proposes, God disposes'

हृदयवृत्ती वृत्तसंपन्न । अग्निसेवा वेदाध्ययन ।
शमदमयुक्त तपोधन । सुखसंतोषें ब्राह्मण ॥ १५९ ॥

### ४७ तीर्थस्वरूप कोण?

जो शुचिर्भूत शुद्धमती । ईश्वरभावना सर्वभूतीं ।
तो वसे सर्वदा तीर्थीं । तीर्थें वसती त्यासंगीं ॥ १६० ॥
इंद्रियनेमाचा व्यसनी । सत्यमधुर असे वाणी ।
अहंकार ज्याचिया मनीं । संचरेना सर्वथा ॥ १६१ ॥
परधनीं अंधत्व नयना । परस्त्री पाहतां क्लीबत्व मना ।
परापवादीं मूकत्व वदना । तो जनक जाण तीर्थांचा ॥ १६२ ॥
सकल तीर्थांचा धात्रा । तीर्थें करिती त्याची यात्रा ।
पादोदकालागीं पवित्रा । तीर्थें माथा वोढवती ॥ १६३ ॥
तीर्थीं असोनि इच्छारहित । प्रतिग्रहा न घाली हात ।
यथालाभें संतोषभरित । तो तीर्थस्वरूप जाणावा ॥ १६४ ॥

### ४८ कोणाचें तीर्थ कोणतें ?

सुबुद्ध शुद्ध विद्या-तीर्थीं । साधु सुस्नात सत्य-तीर्थीं ।
कुलांगना लज्जा-तीर्थीं । पवित्र होती जाण पा ॥ १६५ ॥
धनाढ्य निर्दोष दान-तीर्थीं । पाप निःपाप गंगा-तीर्थीं ।
क्षत्रिय राजे धारा—तीर्थीं । प्रक्षाळिती अघातें ॥ १६६ ॥
योगी आत्मज्ञान—तीर्थीं । आत्मस्वरूप स्वयें होती ।
श्रवणादिक नवही तीर्थीं । भक्त होती हरिरूप ॥ १६७ ॥

### ४९ दया.

त्रास देणें सकळां जीवां । हा कोण पुरुषार्थ पार्थिवा ? ।
दयावंत तोचि देवा । मान्य होय सर्वस्वें ॥ १६८ ॥

### ५० ब्राह्मण कोण ?

जातिमात्र ब्राह्मण नाम । आचरे हिंसकाचें कर्म ।
तो श्वपचाहूनि अधम । नरकधाम त्या वस्ती ॥ १६९ ॥
जो ओतिला सत्वगुणें । कामादि दोषां नातळे मनें ।
तोचि ब्राह्मण निश्चय जाणें । जातिमात्र तो नव्हे ॥ १७० ॥
सत्य ज्ञान क्षमाशीलता । अनृशंसता तपोधनता ।

ज्याचे ठायीं ती तत्वता । ब्राह्मण ऐसें जाण पा ॥ १७१ ॥

### ५१ प्रारब्धाचें प्राबल्य.

आपण करूं जावें एक । प्रारब्ध घडवी आणिक ।
ईश्वरमायेचें कौतुक । ब्रह्मादिकां न कळे ॥ १७२ ॥
काळ ईश्वर आणि प्रारब्ध । सद्गु-शास्त्रें चार वेद ।
प्रमाण बोलती ते शब्द । काय कृत्रिम मानावे ? ॥ १७३ ॥
आपुलें केलें पावे सिद्धी । हे मूर्खाची मूर्खबुद्धी ।
ईश्वरें प्रेरिलियां प्रारब्धीं । जसें असेल तेंचि होतसे ॥ १७४ ॥
उत्तम सन्मार्गी वर्तावें । होईल तें उगेंचि पाहावें ।
इच्छिल्यासारिखें फळ व्हावें । हें सर्वथा अज्ञान ॥ १७५ ॥

### ५२ मनाचें उदाहरण.

वोखटें गोमटें स्वभावें । मनुष्यापासूनि घडे आघवें ।
समयीं वर्मी जरी खोचावें । तरी पुरुषार्थ कायसा ? ॥१७६॥

### ५३ आपसांतला भेद दाखवूं नये.

ज्ञातियांमाजी असलिया भेदू । बाह्य दाखवणें अभेदू ।
ऐसें बोलती वचन साधू । तैसें तुह्मीं वर्तावें ॥ १७७ ॥

### ५४ परोपकारी.

चंदन झिजोनी परातें निववी । अगरु जळोनि परिमळ दावी ।
आपण शिणोनि परातें जीववी । परोपकारी तो नर ॥ १७८

### ५५ ब्रह्मप्राप्तीचा सोपान.

सांडोनियां देहाभिमान । सर्वभूतीं समसमान ।
ते पावती पद निर्वाण । कैवल्यधाम ज्या म्हणती ॥ १७९
कर्म अर्पितां भगवंतीं । तात्काळ चित्तशुद्धीची प्राप्ती ।
चित्तशुद्धीनें वैराग्यशांती । निर्धारेसीं पाविजे ॥ १८० ॥
वैराग्यशांतीनें अचल ज्ञान । ज्ञानें कैवल्यनिधान ।
ब्रह्मप्राप्तीलागीं सोपान । सर्व सिद्धांतीं बोलिजे ॥ १८१ ॥

### ५६ सती.

रूपवंत गुणवंत कुलवंत । भ्रतारसेवनीं सदा निरत ।
ते भार्यारूपें मूर्तिमंत । महासिद्धी जाण पा ॥ १८२ ॥

### ५७ सावित्रीचा निर्धार.

येरी म्हणे "न घडे ऐसें । एकदां वरिला जो मानसें ।
तें मन आणिका स्पर्शे । तो व्यभिचार स्वधर्मी ॥ १८३ ॥
मरण पावो तात्कालिक । अथवा वांचो कल्प एक ।
सत्यवानावीण आणिक । वरणें नाहीं सर्वथा ॥ १८४ ॥
अभाग्यभाग्याचीं आभाळें । येती जाती आपुल्या काळें ।
निश्चयाचा ध्रुव अचळ । चळत्व सर्वथा न पविजे ॥ १८५ ॥
कृपेनें अवलोकीं श्रीहरी । तरी अविवेकचि विवेक करी ।
सुकृत असल्या आपुले पदरीं । सर्व अरिष्टें नासती " ॥१८६॥

### ५८ सत्संगती.

तरावया संसार–अपांपती । नौका एक सत्संगती ।
चारी पुरुषार्थ चारी मुक्ती । दासी होती सत्संगीं ॥ १८७ ॥

### ५९ अविनाशी धर्म.

कर्ण म्हणे निजनिर्धारीं । "धर्मकार्जी परोपकारीं ।
शरीर वेंचितां रणचत्वरीं । तो चढे शिरीं शक्राच्या ॥ १८८ ॥
स्वप्नप्राय संसार क्षणिक । धर्म तोचि सत्य एक ।
येर सर्वही माइक । दिसे तें तें जाण पां ॥ १८९ ॥

### ६० पांडवांनीं विराट राजापाशीं कसें रहावें याबद्दल धौम्यमुनींचा उपदेश (विराट० अ० १).

नामरूपथोरपण । कोणां न कळों द्यावें ज्ञान ।
दीनांहूनि परमदीन । ऐसें लोकां दाखवावें ॥ १९० ॥
असत्य न बोलिजे सर्वथा । धरिजे निर्लोभ निर्मळता ।
इंद्रियनियमीं नित्य वसतां । तोचि वल्लभ रायातें ॥ १९१ ॥
राजस्त्रीसंवाद । राजमित्रांशीं विरोध ।
राजपुरोहितासी विनोद । जाणते पुरुषीं न करावा ॥ १९२ ॥
मागां सरे अंतःपुरीं । पुढां ठाके रणचत्वरीं ।
दिधली आज्ञा वंदी शिरीं । तोचि वल्लभ रायातें ॥ १९३ ॥
कीजे सर्वांचें आर्जव । कोठें न दाखवी वक्रभाव ।
सर्वांपासोनि गौरव । तोचि पावे निर्धारें ॥ १९४ ॥

करणी करूनियां लपवी । महिमा दुजियाची वाढवी ।
महायशाची तो पदवी । आपेआप पावतु ।। १९५ ।।
रायें नेमिलिये व्यापारीं । सावधान अहोरात्रीं ।
आळसनिद्रा दवडूनि दूरी । तोचि रायातें आवडे ।। १९६ ।।
झालियाही मानापमान । हर्षविषादीं न घालीं मन ।
क्षमाशीळ सुप्रसन्न । तोचि पावे महिमेतें ।। १९७ ।।
राज्यपैशून्य नायके कानीं । राजनिंदा न बोले वदनीं ।
राजमान्यातें सन्मानी । तोचि मान्य नृपातें ।। १९८ ।।
आपुलें प्रकटूं नेदीं ज्ञान । नेणत्यातें न ह्मणे जो अज्ञान ।
ज्याचिये मुखीं मधुरवचन । तोचि मान्य विश्वातें ।। १९९ ।।
प्रभूनें बोलविल्या बोलणें । प्रभू पुसेल तें सांगणें ।
न पाचारितां न जाणें । तोचि पावे प्रतिष्ठा ।। २०० ।।

### ६१ ईश्वरी लीलेचा खेळ

गौतमी ( कृप) बोले 'ऐका सकळ । संकल्प करा तितुका निर्फळ
ईश्वरइच्छेचा विचित्र खेळ । मौन्यदृष्टीं पहावा ।। २०१ ।।
इच्छावें तें सहसा न घडे । न घडावें तें अंगा जडे ।
कर्मभोगाचें कुवाडें । कोणा नुमगे सहसा ।। २०२

### ६२ काळ कर्म ईश्वर.

ईश्वरइच्छेनें घडे सकळ । वाउगी मनाची तळमळ ।
अज्ञानाचें हेंचि फळ । जें सुखदु:खें प्रलपिजे ।। २०३
काळाकाळ अपेक्षयशें । घडती जावळेफळाऐसे ।
नसतें प्राणियां भासे पिसें । सुखदु:खें पाविजे ।। २०४
वेष्टूनि पांचभौतिक चर्में । जीव कोंडिला त्रिविधकर्में
त्यासी देह ऐसिया नामें । देहाभिमानी मानिती ।। २०५
कृमी मृत्तिका अथवा राख । शेखीं होवोनि जाती देख ।
त्या देहा अभिमानी मूर्ख । 'मी मी' ऐसें भाविती ।। २०६
जें जें घडे जिये काळीं । तें तें मानें वेइजे मौळीं ।
भोगविते तिघे बळी । काळ कर्म ईश्वरू ! ।।२०७
येथें आपुला उपाय यत्न । सहसा करूं न शके आन ।

हरिहरदेवांचीही क्षीण । शक्ती येथें भासती ।। २०८

## ६३ विवेकविचार.

विवेक आणि सुविचारू । ईश्वरें नेमूनि दिधले गुरु ।
त्यांचिया बुद्धी वर्ततां नरू । आघातातें न पविजे ।। २०९
हरिगुरुसज्जनांची करी निंदा । आग्रह विषाद न संडी कदा ।
त्यातें पद्मनाभाची प्रमदा (लक्ष्मी) ।त्यागूनि जाय तत्काळीं।।२१०
वडिलवृद्धांचें वचन पाळी । नीती न सांडी आपत्काळीं ।
विजयलक्ष्मी त्यातें कवळी । कल्पांतींही सोडीना ।। २११

## ६४ दैव आणि पौरुष.

दैवें आणि पुरुषाकारें । ग्रथिलीं मानवाचीं शरीरें ।
विवेकें विलोकतां तिसरें । देहाच्या ठायीं मिळेना ।। २१२
परी दैवावीण चतुरा ! । निर्फळता पुरुषाकारा ।
कर्म करितां नित्य वीरा । श्रमचि प्रांतीं उरताती ।। २१३
दैवासी करोनि नमस्कार । विचारीं होवोनि चतुर ।
उद्योगीं ठवूनि अंतर । वृद्धालागीं सेवावें ।। २१४

## पद.

( हें एका जुन्या बाडांत सांपडलें. )

आपुली करि सुटका । करि सुटका ।
भवभ्रम अवघा लटिका ।। आपु० ।। ध्रु० ।।
आधींच नरदेह फुटका । शाश्वत मानुं नको क्षण घटिका ।
गुरुचरणांबुजघुटका । सेवुनि मनासि लावी चटका ।।२।।
करुनि मनाचा मुटका । मुक्तेश्वर चुकवी यमझटका ।।३।।

# पुरवणी.

'महाभारताचे मराठी अवतार' ह्या प्रकरणांत (पृ० २६–३०) २०।२५ मराठी कवींनीं महाभारतावर ग्रंथरचना केल्याचें सांगून १८।२० कवींचीं नांवें दिलीं आहेत, व आणखीही कित्येक कवि सांदीकोपऱ्यांत पडलेले असतील असें म्हटलें आहे. वरील नाममालिकेंत ६ वें नांव माधवकवीचें आहे. या माधवाचें भारत ग्वाल्हेरीस रा. भास्करराव भालेराव यांचे संग्रहास असलेलें त्यांजकडून मला समजलें आहे. तसेंच बाळकृष्ण-नाथ राजूरकर यांचें उद्योगपर्व (ओवी संख्या १८।२० हजार) उप-लब्ध असून कर्णपर्व व स्वर्गारोहणपर्व या दोन्ही पर्वांचीं कांहीं पृष्ठें सांपडलीं आहेत असें रा. भालेराव यांनीं कळविलें आहे. बाळकृष्णना-थांची आणखी बरीच कविता असून त्यांची माहिती 'मुमुक्षु' वर्ष १३ अंक ४८ मध्यें रा. भालेराव यांनींच दिली आहे. बाळकृष्णनाथाचें संपूर्ण भारत असलें पाहिजे असें त्यांचें मत आहे. सदर उद्योगपर्व शके १७२० च्या फाल्गुन वद्यांत समाप्त झाल्याचा उल्लेख शेवटीं आहे. आणखीही कांहीं भारतग्रंथ यापुढें उपलब्ध होतील. सर्व मराठी भारतग्रंथांत मुक्ते-श्वरी भारत, मोरोपंती भारत व श्रीधरी पांडवप्रताप हे तीन ग्रंथ महा-राष्ट्रांत लोकप्रिय झालेले आहेत. मुक्तेश्वरी भारताचें स्वरूप आपणांस प्रस्तुत ग्रंथावरून समजलेंच आहे. मोरोपंती भारतावर मोरोपंतांच्या चरि-त्रांत १५ व्या प्रकरणांत पृ० २९८–३५१ मीं स्वतंत्र विवरण केलें असून ह्या ग्रंथांत मोरोपंत व मुक्तेश्वर ह्या उभय कवींच्या भारतांतलें तारतम्य प्रस्तुत ग्रंथांत जागोजाग दाखविलें आहे. श्रीधराच्या पांडवप्रता-पाची अशीच धूळभेट या पुरवणींत मी करून देणार आहें. याशिवाय मुरारी व गोपाळ (पृ० २९) यांचीही नवीनच ओळख मराठी वाचकांस करून द्यावयाची आहे. मराठींतल्या सर्व भारतग्रंथांचा सामग्र्यानें विचार करावयाचा प्रसंग आल्यास या माझ्या टांचणांचा पुढें उपयोग होईल. असो. प्रथम श्रीधराकडे पाहूं.

## १ श्रीधरकृत पांडवप्रताप (इ. स. १७१२)

श्रीधरस्वामींनीं आपला पांडवप्रताप शके १६३४ मध्यें पंढरपुरक्षेत्रीं संपविला. 'पांडुरंगनगरीं श्रीविठ्ठलमूर्तीसमीप पांडवप्रताप निपजला' ( अ. १ ). श्रीधराच्या आईबापांचीं नांवें 'ब्रह्मानंद महाराज पिता। सावित्री नामें माझी माता' [ अ. २ ]. श्रीधराचे वडील ब्रह्मानंद हे 'पूर्वाश्रमीं पंढरीहून चार योजनें दूर नैर्ऋत्यकोणीं असलेल्या नाझरे गांवचे देशपांडे' होते. पुढें पंढरीस संन्यास घेऊन ते समाधिस्थ झाले, त्यावर वाळवंटांत वृंदावन बांधलें आहे [ अ. ६४ ]. पांडवप्रताप, हरिविजय, रामविजय, जैमिनीअश्वमेध, इ० श्रीधरांचे ग्रंथ खेड्यापाड्यांतून वृद्धस्त्रियासुद्धां सर्वत्र सर्व लोक वाचतात. त्यांचा गुरु त्याचा पिता ब्रह्मानंदच होयः—

महाराज ब्रह्मानंद दिनमणी। उदय पावला हृदयचिद्गगनीं।
श्रीधरसूर्यकांतीं अवनीं। पूर्ण ज्ञानाग्नि प्रकटला॥ २४८॥ [अ.१३]

त्यांनीं आपली गुरुपरंपरा दिली आहे. ती अशीः—श्रीदत्तात्रेय-त्यांचे शिष्य सदानंद-त्यांचे रामानंद [ त्यांची समाधि काशीस आहे ]-त्यांचे अमलानंद-त्यांचे गंभीरानंद-त्यांचे ब्रह्मानंद-त्यांचे सहजानंद [ कल्याणास समाध आहे ]-त्यांचे पूर्णानंद-त्यांचे दत्तानंद [नाझरे गांवीं समाधि आहे ]-त्यांचे ब्रह्मानंद यति व-त्यांचे शिष्य श्रीधर हे होत. यांचीही समाधि पंढरीस आहे. श्रीरामदासपंचायतनातले प्रसिद्ध रंगनाथस्वामी वडगांवकर यांचे श्रीधरस्वामी हे पुतणे होत. श्रीधर गृहस्थाश्रमी होते. शके १६५१ माघ वद्य ३ सोमवारीं हे समाधिस्थ झाले. यांच्या स्त्रीचें नांव पार्वतीबाई, यांस दत्तोबा व मनोहर हे दोन पुत्र होते.

'पांडवप्रताप' ग्रंथ रचीत असतांना मुक्तेश्वराप्रमाणें श्रीधरांनींही व्यासकृत भारत पुढें ठेवलें होतें व दंतकथा, अन्य मराठी कवींचीं काव्यें व आख्यायिका यांची कास न धरण्याचा व व्यासांच्याच आधारें ग्रंथ रचण्याचा संकल्प केला होताः—[ अ० ५३ ]

ज्या मूळभारतीं कथा। त्याच येथें लिहिल्या तत्त्वता।
प्राकृत कवींचे संमता। नाहीं कदा धरियेलें॥१८०॥ (अ०६४)

कवीनें ' संकोच पाल्हाळ ' टाकून मुख्य धोरण पांडवांचे प्रतापवर्णन करण्याकडे ठेवल्यामुळें ' पांडवप्रताप ' हें नांव या ग्रंथाला फार साजतें. हा ग्रंथ स्त्रीशूद्रांस कळावा या हेतूनें फार सुलभ केला आहे:—

(१)बोलसी ध्वनित गुह्यार्थ । तरी अबळांस न कळे यथार्थ ।
तरी थोडक्यांत रस अद्भुत । कथा समस्त आवरीं ॥४३॥(अ० १)

(२)प्राकृतभाषा हे आरुष । म्हणोनि न ठेवावा दोष ।
मूळभारतीचा सारांश । अर्थ चतुरीं विलोकावा ॥ ८ ॥
बहुत बोलतां वाढेल ग्रंथ । ध्वनित बोलतां न कळे अर्थ ।
पाल्हाळ संकोच टाकूनि परिमित।रस सुरस वर्णिला॥९॥ (अ० १६)

या दोन उताऱ्यांवरून कवीनें कोणत्या हेतूनें व धोरणानें प्रस्तुत ग्रंथ लिहिला, हें चांगलें समजतें. एक लक्ष भारताचा विस्तार केला असता तर ४।५ लाख ओंव्या झाल्या असत्या; पण असा ग्रंथार्णव तरून जाण्याचें सामर्थ्य प्राकृत वाचकांत आढळणें कठीण असें ओळखून कवीनें अवांतर कथा गाळून मुख्य गोष्टीही संक्षेपानें वर्णिल्या आहेत. द्रौपदी-वस्त्रहरणासारख्या लोकप्रिय कथांचा संक्षेप केल्यास ' कथा विचित्र दिसणार ' नाहीं व श्रोतृजनांची उत्कंठा जागृत होणार नाहीं, म्हणून अशा कांहीं प्रसंगीं कवीनें विस्तार केला आहे. ' फार पाल्हाळ केला नाहीं व फार संकलित ' ही केलें नाहीं. ही कसोटी पांडवप्रतापाला लावून पाहिली असतां मोठ्या आनंदानें म्हणतां येतें कीं, कवीनें रेखलेलें धोरण संभाळलें आहे, ' मूळ भारतींचा सारांश सुरस रस वर्णून ' आणला आहे व भोळया भाविकांकरितां व अबलांकरितां ग्रंथ रचिला आहे. ' ध्वनित गुह्यार्थ बोललों तर अबळांस यथार्थ कळणार नाहीं ' म्हणून सुबोध ग्रंथ त्यांनीं लिहिला आहे.

संस्कृत इक्षुदंडीं रस गुप्त । न कळे भोळियांसी अत्यंत ।
त्याचा प्राकृतीं रस काढोनि देत । श्रीधर म्हणे भाविकां॥४॥अ०५०

प्राकृत भाषेच्या अभिमानाचे उद्गार कवीनें जागोजाग काढले आहेत. ' प्राकृत भाषा हे साचार । परी अर्थसंग्रहभांडार ' ( अ. ४७ ) असें वामनादि कवींसारखेंच श्रीधराचें मत आहे.

श्रीधरानें अनेक आख्यानांना फांटा दिला आहे. वेदांतपर, उपदेशपर,

नीतिबोधक प्रसंगही बहुतेक गाळले आहेत; तरी जेथें जेथें प्रसंग सांपडेल, तेथें तेथें समाजांतील दोषांचें आविष्करण करण्यास व प्राकृतजनांस सदुपदेश करण्यास त्याने कमी केलें नाहीं. महाभारतांतल्या ठोकळ गोष्टी व त्यापासून शिकण्यासारखीं समाजनीतीचीं अत्युदात्त तत्त्वें सहज लीलेनें समजून घ्यायची ज्याला इच्छा असेल, त्यानें श्रीधराचा पांडवप्रताप ग्रंथ अवश्य वाचावा. उदाहरणार्थ, अ. २८ मध्यें सावित्रीआख्यानांत कवीनें स्त्रीधर्म कसे वर्णिले आहेत ते पहावे.

हा मोठा ग्रंथ कसा संपेल अशी कवीला मोठी काळजी वाटत होती. एकदां तर त्यानें काम अर्धवट टाकून दिलें होतें; पण भगवंतानें त्याला थापटून जागें केलें व ग्रंथ समाप्तीस नेला:—

(१) साह्य होवोनि पंढरीनाथ । त्यांतील सारांशकथा वदवित ।
एरवीं समुद्रा ऐसा ग्रंथ । महाभारत व्यासोक्त हा ॥१४१॥
मनुष्याचें आयुष्य क्षणिक जाण । केव्हां सरेल न कळे खूण ।
त्यांत संसारव्यथा परम दारुण । आधिव्याधि पीडिती ॥१४४॥
( २ ) चंचु भरोन टिटवा । समुद्र रिता करील केव्हां ।
भारत अद्भुत रुक्मिणीधवा । माझेनि कैसें वर्णवे ? ॥ २३३ ॥
तूं जरी राखशील पाठी । तरी ग्रंथ जाईल शेवटीं ।
श्रीधरवरदा जगजेठी । कृपादृष्टी पाहें पां ॥२३४॥ (अ० ३५)

याच कारणास्तव श्रीधरानें पहिल्या पहिल्या पर्वांना पुष्कळ अध्याय देऊन शेवटीं एकेक पर्व एकेक अध्यायांत आटोपलें आहे. आदिपर्व १४ अध्यायांत; सभापर्व ८ अध्यायांत; वनपर्व ९ अध्यायांत; विराटपर्व ४ अध्यायांत; उद्योगपर्व ५ अध्यायांत; भीष्म द्रोण व कर्ण हीं तीन पर्वें प्रत्येकीं ३ अध्यायांत; शांतिपर्व २ अध्यायांत; अश्वमेघपर्व ६ अध्यायांत व बाकीचीं सात पर्वें प्रत्येकीं १ अध्यायांत; याप्रमाणें सारें महाभारत ६४ अध्यायांत आणलें आहे. श्रीधरानें स्वर्गारोहणपर्व मात्र गाळलें आहे. जैमिनी अश्वमेध श्रीधरानें स्वतंत्रपणें मराठींत केला आहेच; पण अश्वमेधपर्व रचतांनाही तो ग्रंथ त्यानें पुढें ठेवला (अ० ६३) होता:—

जैमिनीअश्वमेध पाहोन । कथा त्याच कथिल्या संपूर्ण ॥
वाउग्या दंतकथा ऐकोन । नाहीं लिहिल्या ग्रंथीं या ॥ १४७ ॥

दुंदुभी विप्रवंशी आख्यान । मूळग्रंथीं नाहींच जाण ।
इतर कवि बोलले सत्कारून । कशावरून तें न कळे ॥ १४८ ॥

गीतोपदेशकथनाचा ४१ वा अध्याय पाहण्यासारखा आहे.

'अवघी गीता वर्णावी । तरी हा—ग्रंथ—विस्तार होईल ' म्हणून कवीनें तो केला नाहीं; तरी पुढें दिलेल्या ४।५ ओंव्या पाहिल्या म्हणजे त्यांत गीतेचें सारच आणलेलें दिसेल:--

तूं मारिशी तरीच हे मरती । नाहीं तरी काय चिरंजीव होती ।
कालत्रयीं क्षय न पावती । सांग मज तूं आतां हें ॥ १२७ ॥
तुझें करून निमित्तमात्र । मी उतरितों हा भूभार ।
कर्ता हर्ता पाळिता सर्वत्र । मीच व्यापक सर्व असें ॥ १२८ ॥
या ब्रम्हांडाची राहाटी । मजपासूनियां जाहली किरीटी ।
लया पावोनि शेवटीं । मजमाजीं सर्व मिळे ॥ १२९ ॥
माणि ओविले जैसे सूत्रीं । तैसा मी व्यापक सर्वांतरीं ।
आदि अंतीं मध्यें निर्धारीं । मजवांचून नसे दुजें ॥ १३१ ॥
ऊठ घेई धनुष्यबाण । पाहसी काय माजवीं रण ।
तूं माझें स्वरूप ओळखून । होई निमग्न मजमाजीं ॥ १३१ ॥

मूळ भगवद्गीतेच्या श्लोकांची वांटणी श्रीधरानें अशी दाखविली आहे:—धृतराष्ट्रोक्त १ श्लोक, दुर्योधनाचे ९, संजयाचे ३२, अर्जुनाचे ८४ व भगवंताचें ५७४ मिळून ' सप्तशत गीता निःशेष । महापुरुष उपासिती. ' ओंव्या ५२--६३ मध्यें भगवद्गीतेची सुंदर स्तुति केली आहे व पुढें आपण स्वतः गीतेवर टीका करावी:--

तरी ज्ञानेश्वराहुन निश्चितीं । माझी नव्हे कीं आगळी मती ।
तेचि पाहावी सर्व संतीं । दिनरातीं अत्यादरें ॥ १६५ ॥
गीता हें पदक निर्धारें । वरी ज्ञानेश्वरें जोडिले हिरे ।
इतर जडतील तीं खापरें । मागें अथवा पुढेंही ॥ १६६ ॥

पुढें ' ज्ञानेश्वरी निंदिती साचार । ते नर नव्हेत प्रत्यक्ष असुर ' असें म्हटलें आहे. ज्ञानेश्वरीची निंदा करणारे कोणी मतवादी श्रीधरस्वामींच्या वेळेला होते काय ? मराठी कवींनीं ज्ञानेश्वरीचीं अनेक वेळां स्तोत्रें गायिलीं आहेत, पण तिच्यावर दोषारोप करणारा कोणी कवि

आढळत नाहीं, मग वरील टोला कोणास अनुलक्षून दिला असेल तो असो!

मूळ व्यासकृतभारताप्रमाणेंच मुक्तेश्वरी भारतही श्रीधरानें काळजी-पूर्वक वाचलें होतें यांत शंका नाहीं. कांहीं उतारे दिले आहेत त्यावरून वानकांचीही खात्री होईल; पण मुक्तेश्वराचें नांवही कोठें पांडवप्रतापांत येत नाहीं, हें मात्र थोडें आश्चर्यकारक दिसतें !

( १ ) वनिता मनोरम एकांतीं । आपण होऊनि पुरुषा प्रार्थी ।
तेथें जो निर्विकल्प चितीं । तोचि शंकर म्हणो ये ॥ ७८ ॥
विजनीं भरलीं कनकें पाहे । देखिल्यावरी लोटी पायें ।
ऐशी निर्लोभता आहे । तोचि शंकर ह्मणों ये ॥ ७९ ॥

मुक्तेश्वर -आदिपर्व, अ. २

रूपवती सभाग्य उदार तरुण । एकांतीं प्रार्थी स्वयें येऊन ।
ज्याचें विकार न पवे मन । तरी तो नारायण नर नव्हे ॥ १०७
एकांत वनीं एकला फिरत । महारजता लोह देखत ।
पायें ढकलून पुढें जात । तरी तो नारायण नर नव्हे ॥ १०८ ॥

श्रीधरकृत पांडवप्रताप, अ. १

( २ ) दुष्यंतवर्णनारंभीं मुक्तेश्वर ( आदिपर्व, अ. १५ ):—

प्राची प्रतीची दक्षिणोत्तर । चारी दिशा चतुःसमुद्र ।
आक्रमूनि मही महेंद्र । सुरेंद्र जैसा भूलोकीं ॥ १ ॥

त्याच प्रसंगीं श्रीधर ( अ. ३ )—

प्राची प्रतीची उत्तर दक्षिण । चाऱ्ही दिशा आक्रमून ।
पृथ्वीचें राज्य संपूर्ण । आज्ञेंत चालवी राव तो ॥ १ ॥

( ३ ) बहुकाळींचा मित्रसबंधू । तोंडी एक वोखटा शब्दू ।
जैसा कांजीचा स्वल्प बिंदू । घटचि नाशी दुग्धाचा ॥ ४८ ॥

मुक्तेश्वर, आदि. अ. १८.

ओखटें बोलतां उत्तर । तुटे बहुकालींचा मित्र ।
दुग्धीं कांजी पडतां बिंदुमात्र । घट नाशी दुग्धाचा ॥ १५२ ॥

पांडवप्रताप, अ. ५.

विस्तारभयास्तव ज्यास्त उतारे देतां येत नाहींत. कुलस्त्रियांचीं दूषणें उभयतांनीं दिलीं आहेतः ( मुक्तेश्वर, आदिपर्व अ. १६ ओवी ९३–१०३

व पांडवप्रताप अ. ४ ओवी १९–३९ ); नारदनीति उभयतांनीं विस्तृतपणें सांगितली आहे (मुक्तेश्वर, सभापर्व अ. ३ व पांडवप्रताप अ. १५; कालविपर्यासाचा दोष करून उभयतांनीं परराष्ट्रांचीं नांवें सांगितलीं आहेत ( मुक्तेश्वर आदिपर्व, अ. १५, सभापर्व अ. ८ व पांडवप्रताप अ. १७ आणि २१ ). हीं सर्व फार बारकाईनें वाचून पाहतां श्रीधरानें मुक्तेश्वरी भारत फार काळजीपूर्वक वाचलें होतें, यांत मुळींच शंका उरत नाहीं. अशा प्रसंगीं उभयतांच्या ओव्यांची तुलनाही चांगली करतां येते. श्रीधराची ओवी अत्यंत सुलभ व रसाळ आहे; मुक्तेश्वराची ओजोगुणविशिष्ट असून ठसकेबाज आहे. मुक्तेश्वराची कविता, एकंदरीनें पाहतां, सर्वगुणसंपन्न आहे. मुक्तेश्वराची दृष्टि अधिक व्यापक व विशाळ; त्याचें वर्णन अधिक चटकदार; त्याची घाटणी सर्वतोपरी लोकोत्तर. वाणी रसाळ व वर्णनें हृदयंगम हा मुख्य गुण श्रीधराच्या वाणीचा. अवांतर कथांना फांटा देऊन पांडवांच्या मुख्य कथा सरळ व रसाळ वाणीनें वर्णन केल्यामुळें श्रीधराचा पांडवप्रताप लोकप्रिय झाला आहे, पण कवींचे जे श्रेष्ठतम मुख्य गुण, त्यांच्या बाजूनें विचार करितां मुक्तेश्वर अतुलच दिसतो.

---

## २ मुरारिकृत भीष्मपर्व. ( इ. स. १७५४ )

हें पर्व पंढरपुरक्षेत्रीं एका सुखवस्तु कोमट्याचे घरचीं दप्तरें चाळीत असतां २० वर्षांपूर्वी माझ्या पाहण्यांत आलें. याचे १८ अध्याय असून ओवीसंख्या २३१२ आहे. याची ओवी फार सरळ व सुबोध असून हें पर्व चांगलें, उतरलें आहे. ग्रंथाचा समाप्तिकाळ "शके १६७६, भावनाम संवत्सर माघ शुद्ध ७ रथसप्तमी भानुवासर रेवती नक्षत्र सिद्धयोग माध्यान्हासी येतां दिन ग्रंथ समाप्ती पावला." मुरारी कवीनें भीष्मपर्वाशिवाय इतर पर्वें मराठींत रचिलीं असावींत, असें वाटत नाहीं. कारण त्यानें या पर्वाचे आरंभीं व अंतीं जे उपोद्घात व उपसंहार दिले आहेत, ते तसे व तितके विस्तृत–त्याचीं अन्य पर्वें असतीं तर–आपणास मिळाले नसते. त्यानें ग्रंथारंभीं नमनानंतर पूर्वकालीन मराठी कवि व मराठी भाषा

यांविषयीं व स्वतःविषयीं जे उद्गार काढले आहेत, ते असे आहेतः—

ज्ञानदेवो येकनाथ । टीकाकारांमाजी समर्थ ।
त्यांसी माझे दंडवत । ग्रंथारंभीं पावो कां ।। ५३ ।।
कृष्णदास याज्ञवल्की । कृष्णदास मुद्गल लेखी ।
रामदास वंद्य लोकीं । ग्रंथकर्ते नमियेले ।। ५४ ।।
नामा पाठक नामदेवो । महाभक्त तुकोरावो ।
त्यांच्या चरणीं धरुनि भावो । ग्रंथारंभीं नमियेले ।। ५५ ।।
महाराष्ट्रवाणी अमान । त्यासीं जे कां देती मान ।
ते म्यां पंडित दैदीप्यमान । निरभिमानी वंदिले ।। ५६ ।।
ज्यापासोनि माझें जनन । जेहीं दाविलें मनुष्यपण ।
तें मातापितरें दोघेजण । राधाकृष्ण नमियेलीं ।। ५७ ।।
जैशी पक्षीण पिलियांप्रती । रक्षितसे नानायुक्ती ।
तैसें रक्षिलें अति प्रीती । ते पितृमातां नमियेली ।। ५८ ।।
जो कां केवळ कृपासिंधु । गुरुभक्तीचा ज्यासी वेधु ।
तो म्यां नमिला वडिलबंधु । केशवनामें साजिरा ।। ५९ ।।
सुजाण राजा पौरवंशी । सत्यशीळ सद्गुणराशी ।
पवित्र कमलापुरवासी । प्रिय भक्त शिवाचा ।। ६० ।।
त्याचिया नगरामाजी जाण । शांडिल्यगोत्री आश्वलायन ।
परम पवित्र प्रवर तीन । कवि किंकर संतांचा ।। ६१ ।।
तो मुरारी नामें ब्राह्मण पाहीं । इच्छा उदेली त्याच्या देहीं ।
जे महाराष्ट्र कविता करावी कांहीं । कृपाबळें गुरूच्या ।। ६२ ।।
तेणें आरंभ केला ग्रंथा । भीष्मपर्व महाराष्ट्रकविता ।
वोवियाबद्ध ईश्वरसत्ता । सर्व सिद्धी जाईल ।। ६३ ।।
सकळ श्रोत्यां जोडोनि पाणी । वरद मागे मंजुळवाणी ।
चित्त दीजे ग्रंथश्रवणीं । अव्हेर कोणीं न करावा ।। ६४ ।।
धवल अथवा कपिला गाय । भिन्न वर्णे दिसती पाहे ।
परी दुग्धवर्णभिन्नता नोहे । स्वादीं ऐक्य सारिखें ।। ६५ ।।
तैसा संस्कृतीं जो कां अर्थ । तोचि प्राकृतीं जालिया प्राप्त ।
मग कां तेथ धरावें द्वैत । श्रवणीं सादर असावें ।। ६७ ।।

देवें संस्कृत भाषा केली । म्हणोनि विश्वा वंद्य जाली ।
तरी देवाविरहित काय आली । प्राकृत भाषा आज हे ? ॥६८॥
गौतमें आणिलें गौतमीसी । प्रथम स्नान घडलें त्यासी ।
तरी काय लोकीं वर्जिजे तीसी । उच्छिष्ट उदक म्हणोनी ॥७१॥
तैसा वदला श्रीगुरुव्यास । तोचि अर्थ महासुरस ।
महाराष्ट्रभाषे वदतों त्यास । वंद्य सर्वी करावें ॥ ७३ ॥ (अ० १)
सुवर्णपात्रीं क्षीर दुहिलें । तें काय रुची दुणावलें ? ।
तेंचि मृद्घटीं घातलें । तें काय अरुची होतसे ? ॥१३०॥ (अ९)

मुरारी कवीनें याप्रमाणें स्वतःची माहिती दिली आहे. हें भीष्मपर्व त्यानें इ. स. १७५४ मध्यें म्हणजे मोरोपंती भारताच्या पूर्वी रचिलें आहे. त्यानें ज्ञानदेव, एकनाथ, कथाकल्पतरूचा कर्ता कृष्ण याज्ञवल्की, एका काळीं महाराष्ट्रांत बराच गाजलेला रामायणकर्ता कृष्णदासमुद्गल, नामा-पाठक, नामदेव, रामदास व तुकाराम इतक्या कविसंतांस नमिलें आहे. हा कमलापूर म्हणजे कोल्हापूरचा राहणारा असून 'कांहीं महाराष्ट्र कविता करावी अशी इच्छा त्याच्या देहीं उदेली' म्हणून त्यानें हें भीष्मपर्व रचिलें. त्याचे आईबाप राधाकृष्ण व वडील बंधु केशव. ह्यास आजीचा फार लळा होता. हा त्रिप्रवरी ऋग्वेदी ब्राह्मण. याचें गोत्र शांडिल्य ( अ० ७-१३८ ). पुष्कळशी मराठी कविता वाचल्यामुळें आपलें कांहीं काव्य असावें अशा बुद्धीनें व मराठी कवितेविषयीं उत्पन्न झालेल्या प्रेमानें व अभिमानानें प्रेरित होऊन यानें हें भीष्मपर्व रचिलें. याची ओवी आटपसर, लहान असून रसभरित व मधुर आहे.

---

## ३ गोपाळकविकृत महाभारत. ( इ. स. १७६८ )

हें भारत अथवा या भारताचीं पुढील चवदा पर्वें मला श्रीपंढरीसच मिळालीं. पहिलीं चार पर्वें मुक्तेश्वराचीं व पुढील १४ पर्वें गोपाळकवीचीं, याप्रमाणें १८ पर्वांची भरती करून हा संपूर्ण भारती ग्रंथ रा. बेरी यांनीं संग्रहीत केला होता. त्यांस गोपाळकवीचीं पहिलीं चार पर्वें मिळालीं नव्हतीं, कां गोपाळकवीनेंच मुक्तेश्वराचीं पहिलीं चार पर्वें उपलब्ध

आहेत व पुढील नाहींत हें पाहून ग्रंथ साग्र होण्यासाठीं पुढील चवदा पर्वें रचिलीं, हें कांहीं सांगता येत नाहीं. कदाचित् गोपाळकवीचें समग्र भारत दुसरें कोठें सांपडेल. उद्योगपर्वाच्या प्रारंभींच गोपाळकवि म्हणतो:—

विराटपर्व समाप्त मागें । आतां उद्योग अवलंबिला उद्योगें ।
जेवीं पूर्णिमेसीं कुमुदरंगें । मावळतां होय सूर्योदयो ॥ २२ ॥

हें गोपाळानें रचलेलें भारत फार विस्तृत आहे. खालीं तेरा पर्वांची ग्रंथसंख्या देतों:—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | उद्योगपर्व ... ... | अध्याय २१— | ओंव्या | ३४६९. |
| २ | भीष्मपर्व ... ... | ,, २०— | ,, | २८७३. |
| ३ | द्रोणपर्व ... ... | ,, ३४— | ,, | ४७९९. |
| ४ | कर्णपर्व ... ... | ,, १८— | ,, | २५९४. |
| ५ | शल्यपर्व ... ... | ,, ६— | ,, | ८२९. |
| ६ | गदापर्व ... ... | ,, ७— | ,, | १०१५. |
| ७ | शांतिपर्व ... ... | ,, ७९— | ,, | १२६८०. |
| ८ | अनुशासनपर्व ... | ,, ५०— | ,, | ९७७०. |
| ९ | अश्वमेधपर्व ... ... | ,, १५— | ,, | २५१०. |
| १० | आश्रमपर्व ... ... | ,, ६— | ,, | ८९९. |
| ११ | मौसलपर्व ... ... | ,, २— | ,, | ३६२. |
| १२ | महाप्रस्तानिक ... | ,, १— | ,, | १६७. |
| १३ | स्वर्गारोहणपर्व ... | ,, २— | ,, | २४७. |
| | एकूण पर्वें १३ | अध्याय २६१ | ओंव्या | ४२२१४. |

शांतिपर्वाचा गोपाळकवीनें अतिविस्तार केला आहे. या पर्वाचीं तीन कांडें केलीं आहेत. ( अ ) राजधर्म, अ. २८, ओंव्या ४३२०; ( आ ) आपद्धर्म, अ. १५, ओंव्या २०४७; ( इ ) मोक्षधर्म, अ. ३६, ओंव्या ६३१३. एकूण अ. ७९, ओंव्या १२६८०. मधलीं सौप्तिक व स्त्रीपर्व हीं दोन पर्वें नाहींत. बाकीचीं तेरा—किंवा शल्यगदा एकच धरल्यास बारा—पर्वें मिळून २६१ अध्याय व ४२२१४ ओंव्या आहेत. बाकीचीं

हा पर्वे सांपडल्यास हा भारतग्रंथ ६० हजारांवर सहज जाईल ! एवढा या भारताचा प्रचंड विस्तार आहे.

गोपाळकवीनें अनुशासनपर्वामध्यें [ अ. ५० ] स्वतःविषयीं थोडी माहिती दिली आहे. त्यावरून त्यानें आपलें भारत शके १६९० मध्यें नेवासें मुक्कामीं रचलें असें दिसतें:—

पुण्योदकें या मेदिनीं । प्रवरानामें वरतटिनी ।
मोहनीरूपें चक्रपाणी । साक्षात् असे तटाकीं ॥ १ ॥
महालया नामें सत्क्षेत्र । भूमंडळीं परम पवित्र ।
सर्वपुराणांतरीं चरित्र । वर्णिलें असे द्वैपायनें ॥ २ ॥
मोहनीचरणपद्मभ्रमर । असे तेथें कविकिंकर ।
सेवूनियां प्रवरातीर । देवीलागीं ध्यातसे ॥ ३ ॥
शके सोळाशें नवती । सर्वधारी संवत्सर क्षितीं ।
फाल्गुनमास उत्तरतिथी । वद्य पंचमी जाणिजे ॥ ४ ॥
वारांमाजी उत्तमवार । सोमनामें परम सुंदर ।
दानधर्म हा सविस्तर । मेदिनीं समाप्ती[२] पावला ॥ ५ ॥

कवीनें कर्णपर्व अ. १ मध्यें:—

मातापुरनिवासिनी । भावें स्मरली कुलस्वामिनी ॥

कवीचे गुरु अनंत नांवाचे होते, त्यांजविषयीं गोपाळानें जागोजाग प्रेमोद्गार काढले आहेत:—

अनंतकृपेच्या पाल्हाळें । भारत वर्णिजे गोपाळें ।
ज्ञानदेवाच्या कृपाबळें । जैसा म्हैसा श्रुतीतें ॥१५७॥ उद्योग. ७॥

इतर भारतपर्वें रचणाऱ्या कवींप्रमाणें गोपाळानेंही मूळ भारत रचणाऱ्या श्रीव्यासांची व भारताची योग्य स्थिति प्रसंगवशात् केली आहे. " श्रीभारत नंदनवन । विद्वज्जनांचें क्रीडास्थान " गोपाळकवीचा हा अभिप्राय कोणास मान्य होणार नाहीं? अनुशासनपर्वामध्यें (अ. ४०) कवि म्हणतो—

१ गोपाळकवीनें भारताशिवाय रचलेलीं तीन प्रकरणें मजपाशीं आहेत. [अ] महालयामाहात्म्य, अध्याय २०; [ब] मल्हारीमाहात्म्य, अ. ८; [क] व्यंकटेशमाहात्म्य, अ. १०.

२ प्रस्तुत भारताची प्रत शके १७२० सालीं 'नथु भागवतानें' लिहून घेतली

भारत कथारत्नांचें भांडार । निर्मळदशे क्षीरसागर ।
प्रमेय सुगंधाचा सुंदर । मलयागिरी त्रिलोकीं ।। १ ।।
श्रवणें सर्वेंद्रियां तृप्तता । सायुज्यमुक्ती चढे हाता ।
तेवींच जन्ममरणवार्ता । स्वप्नांतरीं नाढळे ।। २ ।।
इति भारतसमुद्र । जेथें जन्मला चातुर्यचंद्र ।
साहित्यकिरणें हा समुद्र । श्रोते चकोर तोषती ।। ३ ।।

आपलें भारताचें ग्रथन व पुराण चाललें असतां श्रोत्यांना तें कसें मानवलें, याविषयीं बोलतांना कवि बोलतोः--

प्रफुल्लित साहित्यकमळें । घमघमीत अर्थपरिमळें ।
सज्जनभ्रमर भक्तिमेळें । आमोद घेती आवडीनें ।। १ ।।
येणें परमानंद निरंतर । विसरले विषयव्यवहार ।
सार्वकाळ प्रेमें उद्गार । हरिहरस्मरणाचें ।।२।। [अनुशासन.अ.१]

द्रोणपर्वाला बराच मोठा उपोद्घात जोडला आहे. देवाला प्रथमच कवीनें विनविलें आहे कीः—

ताम्रनाणें कनकाचळा । थिल्लरोदकें गंगाजळा ।
सन्मुख मार्तंडमंडळा । दर्पण जेवीं दाविजे ।। १ ।।
तेवीं हे माझी आर्षवाणी । नित्य रुळो तुझ्या चरणीं ।
मज मूढाचिया वदनीं । कवित्ववैभव सांठवीं ।। २ ।।

पुढें कवीनें खालील कवींस नमन केलें आहेः—

व्यासवाल्मीकिवसिष्ठ । जैमिनी गौतम श्रेष्ठ ।
श्रीधर शंकराचार्य वरिष्ठ । गौडपाद कपिलऋर्षी ।। १ ।।
प्राकृत कवि ज्ञानदेव । सिंधूसारिखें बुद्धिवैभव ।
एकनाथ जनार्दन स्वयमेव । जातवेदाही मुक्तेश्वर ।। २ ।।

यांत भारतकर्ता मुक्तेश्वरही आहे. मुक्तेश्वरीभारत गोपाळकवीनें श्रीधराप्रमाणें काळजीपूर्वक वाचल्याचें दिसतें. मुक्तेश्वरानें सभापर्वांत नारदनीति, उद्योगपर्वांत विदुरनीति व भीष्मपर्वांत भगवद्गीता नांवाची कृष्णनीति अशा तीन नीतींचा उल्लेख (स०अ०१) केला आहे. गोपाळकवीनें उद्योगपर्वामध्यें (अ. ५) असेंच सांगितलें आहे. मोरोपंतानें या तीनही नीति आपल्या भारतांत गाळल्या असून मुख्य कथाभागावरच लक्ष दिलें आहे. श्रीधर-